


मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक ४१ वें.

# सुशिक्षित स्त्री.

हें पुस्तक

प. वा. श्रीयुत शंकर रामचंद्र हतवळणे

यांनीं लिहिलें.

[ द्वितीयावृत्ति. ]

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी.

गिरगांव, मुंबई.

किंमत ०-१०-०. ] सर्व हक्क स्वाधीन. [ जानेवारी १९०९.

# प्रकाशकांचे दोन शब्द.

ार्वे शिक्षणाचा पाया गृहशिक्षण आहे. हें गृहशिक्षण चांगलें ेळण्यास स्त्रिया सुशिक्षित असल्या पाहिजेत. स्त्रिया सुशिक्षित ासल्या ह्मणजे मुलांस अर्थात् भावी पिढीस त्या कसें शिक्षण देऊं कतात आणि सुशिक्षित स्त्रीच्या शिक्षणाला कशीं मधुर फळें येतात, दाखविण्याचा प्रस्तुत पुस्तकांत ग्रंथकारांनीं प्रयत्न केला असून त्यांत बरेच यशस्वी झाले आहेत, हें या पुस्तकाच्या लक्ष्यपूर्वक अव-कनानें वाचकांच्या प्रत्ययास येईल, असा आम्हाला भरंवसा आहे. प्रत दुर्मिळ झालेलें हें उपयुक्त पुस्तक आमच्या भगिनींच्या संग्रहीं ावश्य असावें असें वाटल्यावरून, तें ग्रंथकारांच्या वारसांपासून ंफत घेऊन मुद्दाम प्रसिद्ध केलें आहे. आमच्या ह्या प्रयत्नास ामच्या प्रियभगिनींकडून पूर्ण उत्तेजन मिळेल, अशी उमेद ठगितों.

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीचें
कार्यालय, गिरगांव–मुंबई,
ता. १५ जानेवारी, १९०९.

काशीनाथ रघुनाथ मित्र,
व्यवस्थापक.

# ग्रंथकर्त्यांची प्रस्तावना.

आपलीं मुलें चांगलीं निपजावीं अशी आपली इच्छा आहे, तर सुविचार कोणते हें त्यांनां समजून त्याप्रमाणें त्यांचें आचरण असलें पाहिजे. अशा सुविचारांचा संग्रह करण्याच्या उद्देशानें '**सद्बोधमंदिर**' ह्या नांवाची पुस्तकमाला लिहिण्याचा आम्हीं विचार केला आहे. या पुस्तकाच्या पहिल्या भागांत स्त्रियांच्या कर्तव्यांविषयीं व दुसऱ्या भागांत गृहशिक्षणाविषयीं म्हणजे आईबापांच्या कर्तव्यांविषयीं विचार करण्याचा हेतु आहे. त्यांपैकीं हा पहिला भाग आहे. ह्यास '**सुशिक्षित स्त्री**' हें नांव दिलें आहे.

नुसत्या नीतीविषयींच्या प्रश्नांचा विशेष विचार करून इष्ट हेतु सिद्धीस जाण्याचा संभव कमी आहे. मनुष्य नीतिमान् असून गृहशिक्षण, सामाजिक सुधारणा, राज्यव्यवहार वगैरे बाबतींत त्याचे विचार कदाचित् कोते असतील; व त्यामुळें जितका फायदा होणें इष्ट आहे तितका होणार नाहीं. ह्मणून ह्या निरनिराळ्या बाबतींत सुविचार कोणते हें समजण्यास, व त्यांपैकीं आपल्या स्थितीच्या मानानें जे ग्रहण करण्यासारखे असतील ते घेण्यास कांहीं साधन असावें, ह्या हेतूनें प्रस्तुत उद्योग हातीं घेण्याचें मनांत आलें.

नीतिशिक्षणास अथवा इतर शिक्षणास गृहशिक्षणाचें पाठबळ असलें ह्मणजे विशेष उपयोग होतो; गृहशिक्षणांत स्त्रियांची मातबरी फार असते; तेव्हां स्त्रियांच्या स्थितींत न्यूनता राहील, तर गृहशिक्षणांत व त्यामुळें इतर शिक्षणांत न्यूनता राहण्याचा संभव आहे. ह्यासाठीं स्त्रियांविषयीं, ह्मणजे त्यांचीं कर्तव्यें कोणतीं, त्यांनीं मुलांचें संगोपन कसें करावें, त्यांनां शिक्षण कसें द्यावें, व त्यांचे विचार कसे असावे, ह्याविषयीं प्रथम विचार करणें अवश्य आहे. हें समजून प्रकृत भाग प्रथम हातीं घेतला.

स्त्रियांच्या डोळ्यांपुढें कित्ता असल्यानें सुविचार ग्रहण करण्यास सोपें पडेल, व हे विचार गोष्टीच्या रूपानें कळले असतां ते वाचण्यास त्यांनां कंटाळा येण्याचा संभव कमी आहे, असें वाटल्यावरून वरील योजना करण्याचा यत्न केला आहे.

मॉरल टेलस ( नीतिकथा ) ह्मणून इंग्रजींत एक ग्रंथ आहे, त्याचा प्रस्तुत पुस्तकास बराच उपयोग झाला आहे, हें येथें सांगणें अवश्य आहे.

धुळें,
जुलई १८९०.

शंकर रामचंद्र हतवळणे.

# सुशिक्षित स्त्री.

एका गांवीं जनार्दनपंत नांवाचे एक गृहस्थ रहात होते. सर्व लोक त्यांनां भाऊसाहेब असें ह्मणत असत. त्यांचे वाडवडील उत्तर हिंदुस्थानांतील संस्थानांपैकीं एका संस्थानांतील मूळचे राहणारे होते. भाऊसाहेब यांनां लहानपणीं चांगलें शिक्षण मिळालें होतें. त्यांनीं संस्थानांत बरेच दिवस नोकरी केली. शेवटीं त्यांनां मोठ्या हुद्याचें काम मिळालें. ते प्रामाणिक असून कामांत चोख असल्यामुळें संस्थानिकाची त्यांच्यावर बहाल मर्जी असे. भाऊसाहेब निस्पृह असल्यामुळें कांहीं लोकांस अप्रिय झाले होते. भाऊसाहेबांवर सरकारची मर्जी असावी, हें दरबारांतील लोकांस बरें न वाटून त्यांनीं त्यांच्यावर कांहीं कुभांड रचिलें. संस्थानिक हा अत्यंत चंचल वृत्तीचा होता. त्यामुळें त्यानें भाऊसाहेबांस कामावरून दूर केलें व त्यांनां जें इनाम दिलें होतें तेंहि जप्त केलें. पुढें भाऊसाहेबांस संस्थानांत राहण्याचें न आवडून ते आपली पत्नी आनंदीबाई, व मुलगा पुरुषोत्तम यांनां घेऊन कलकत्ता, लखनौ, प्रयाग, काशी, दिल्ली, आग्रा, जयपुर, पुष्कर, फरदपुर व वेरुळ येथील लेणीं वगैरे पुष्कळ शहरें व क्षेत्रें पाहत पाहत मुंबईस येऊन राहिले. कांहीं दिवसांनीं त्यांच्या मनांत इंग्लंडदेशाचा प्रवास करण्याचें आलें. त्यांनां प्रवास करण्याची लहानपणापासूनच फार हौस असे. ती केवळ मौजेसाठीं नसून प्रवासापासून निरनिराळे आचारविचार व कारखाने यांचें परीक्षण करावयास सांपडून जी माहिती उपलब्ध होते, व जें एका प्रकारचें शिक्षण मिळतें, त्यासाठीं होती. ज्या ज्या वेळेस भाऊसाहेब प्रवास करीत, त्या त्या वेळेस ते आनंदीबाईस आपल्याबरोबर घेऊन जात. इंग्लंड-देशाचा प्रवास मोठा खरा, परंतु आनंदीबाईची इच्छा फार असल्यामुळें त्यांनीं पत्नीला व मुलाला बरोबर घेऊन जाण्याचा निश्चय केला. सांप्रत इंग्लंडदेश सर्व जगभर गाजत आहे. कोणता कसाहि मनुष्य असला, तथापि त्याला तेथ

थारा मिळतो. ज्या ठिकाणीं तीन हजार कपाशीच्या गिरण्या असून त्यांत लाख लोक काम करित आहेत; जगांत जो कापूस पिकतो त्यापैकीं निम्मे खपतो; ज्या ठिकाणीं पंधराशें लोंकरीचे कारखाने असून त्यांत सव्वा लाख लोकांचा उदरनिर्वाह होत आहे; ज्याला लक्ष्मीनिवास व स्वा सुखाचें माहेरघर असें समजतात; तो देश पाहण्याची इच्छा असणें स्वाभ आहे. मागील सर्व व्यवस्था करून भाऊसाहेब आगबोटींत बसले. ही बराच वेळ सुरक्षित चालली होती. परंतु कप्तान दारूच्या अमलांत असल्य ती भलत्या मार्गानें जाऊं लागली व बुडेल अशी भीति उत्पन्न झ समोरून इंग्लंडाहून दुसरी एक आगबोट येत होती. तिच्यावरील कप्त ही गोष्ट दिसून येतांक्षणींच त्यानें बुडणाऱ्या बोटींतील माणसें आपल्या बे घेण्यासाठीं ताबडतोब होड्या पाठविल्या. ज्याला त्याला प्रथम जाण्याची झालेली, ह्मणून होड्यांत बसण्यासाठीं लोकांची धांदल उडाली. या ग भाऊसाहेबांबरोबर जो ब्राह्मण होता तो सामानाचें बोचकें व आनंद यांसह पुढें गेला. भाऊसाहेब मुलाला घेऊन मागाहून येत होते. ब्रा निसटला तो आनंदीबाईसह होडींत बसला. ती होडी सुरक्षितपणें पोहोंच भाऊसाहेबांस धक्काबुक्की करणें बरें न वाटल्यामुळें त्यांनां मागें रहावें ला भाऊसाहेब ज्या बोटींत होते तींत भरभर भरभर पाणी येत आहे पाहिल्यावर पूर्वीच्या होड्या परत आल्या नाहींत. आनंदीबाईंनीं बक्षी देण्याचें कबूल केलें, परंतु कोणी हिंमत धरीना. ती बोट वाऱ्यानें ढक ढकलत गेली, व तिचें पुढें काय झालें हें समजलें नाहीं. बोट बुडाली अस असें समजून दुसऱ्या बोटीवरच्या कपतानानें आपली बोट हांकारिली, ती बंदरांत येऊन पोहोंचली. अशा प्रकारें आनंदीबाईवर दुःखाचा प्रसंग ये गुदरला. आतां जावें कोठें व करावें काय, ही विवंचना त्यांनां उत्पन्न झा शेवटीं त्यांनां सुचलें कीं, पुण्यांत आपली मानलेली एक बहीण आहे, ति येथें कांहीं दिवस राहून मग पुढील व्यवस्था करावी. हा विचार मनांत ये त्या पुण्यास आल्या व बहिणीच्या घरीं उतरल्या. त्या बहिणीचें यशोदाबाई होतें.

यशोदाबाईचा पति निवर्तल्यास कांहीं वर्षें होऊन गेलीं होतीं. त्य मिळकत पुष्कळ होती. शिवाय, सालीनाहि त्याचें बरेंच उत्पन्न होतें. यशोदा

स्वभावानें जात्या चांगल्या होत्या; परंतु त्यांचा नवरा ज्याप्रमाणें रंगेल व चैनी होता, त्याप्रमाणें त्याहि कांहीं अंशीं तशा बनल्या होत्या. त्यांला सुशील स्त्रियांचा सहवास नसे. मोठ्या शहरांतून चांगल्या गोष्टी दृष्टीस पडतात व वाईटहि दृष्टीस पडतात. अशा शहरांत सुधारणा करण्यास जशीं साधनें असतात, तशा नीति बिघडविण्यासहि पुष्कळ गोष्टी असतात. यशोदाबाईला कोणत्याहि गोष्टीची कमतरता नव्हती. त्याचप्रमाणें कोणत्याहि प्रकारचा प्रतिबंध नसल्यामुळें त्या आपला काळ घरीं अथवा बाहेर स्वच्छंदानें घालवीत. यामुळें त्यांनां स्वतःची सुधारणा करण्यास अथवा मुलांनां शिक्षण देण्यास सवड नसे. त्यांला बहुतकरून सकाळीं उठण्यास उशीर होई. उठल्यानंतर वेणीफणी, स्नान, तुळशीला पाणी व जेवणखाण इतकें आटोपतें, तों बारा वाजून जात. मग शेजारिणींबरोबर इकडल्यातिकडल्या गप्पा मारल्यावर त्या तास दोन तास झोंप घेत असत. निजून उठल्यावर घरांत उगीच फेरफटका करून त्या कांहीं वेळ करमणुकीसाठीं कादंबऱ्यांसारखे ग्रंथ वाचित बसत. संध्याकाळीं कधीं तुळशीबाग अथवा बेलबाग, कधीं पर्वती अथवा विठ्ठलवाडी, कधीं नानाचा बाग अथवा चिमणबाग इकडे, अथवा दुसरीकडे फिरून आल्यावर जेवणखाण करीत. नंतर पुनः मैत्रिणींबरोबर नाटकें पहाणें, सोंगट्या खेळत बसणें, संगीताच्या चालीवर ह्मणणारा कथेकरी असल्यास बोवांच्या कथेस जाणें, किंवा अशाच प्रकारच्या निरुपयोगी कामांत त्यांचा वेळ जाई. ज्या स्त्रियांचा वेळ असा जातो, त्यांनां मुलांकडे लक्ष्य देण्यास सवड सांपडणें कठीण. परंतु स्त्रिया अथवा पुरुष चैनी असले, तथापि, त्यांनां आपलीं मुलें तशीं असावीं असें वाटत नसतें. ह्मणून मुलांच्या शिक्षणासाठीं व विशेषेंकरून आपलें समाधान होण्यासाठीं यशोदाबाईनीं शिक्षक ठेविला होता. परंतु तो दुसरीकडे काम लागल्यामुळें नुकताच गेला होता. यशोदाबाईला काशी व माई ह्या दोन मुली, व मुलगा बाळ्या अशीं तीन मुलें होतीं. काशी सुमारें तेरा वर्षांची होती, व दुसरीं दोन मुलें अकरा व आठ वर्षांचीं होतीं. काशी दिसण्याला तरतरीत दिसे व हुशार ह्मणून वाखाणलेली होती. तिला थोडें इंग्रजीहि शिकविलें होतें. तिला संगीताच्या चालीवर कविता ह्मणतां येत असत. ती इतिहासांतील तारखा भराभर सांगे, ह्मणून मंडळीला मोठा अचंबा वाटे. माईला यांपैकीं कांहींएक येत नव्हतें. ती दिसण्याला गरीब दिसे, ह्मणून तिला

मठ्ठ समजत व तिलाहि आपण मंद आहों असें वाटे. बाळ्या मोठा खोडकर व हूड मुलगा होता. दुसऱ्या मुलांबरोबर अथवा मोलकरणीबरोबर, अथवा यस्वंपाकीणबाईबरोबर त्यांचें भांडण नाहीं, असा एकहि दिवस जात नसे. त्याला बिचाऱ्याला श्रीगणेशायनमःसुद्धां काढतां येत नसे. तो ज्याचें त्याचें बोलून घेत असे व जो तो त्याला दरडावित असे. ह्मणून त्याचा स्वभाव फारच हट्टी व तिरसट झाला होता. शेजाऱ्यांच्या मुलांबरोबर कलागती होऊन रोजच्या रोज फिर्यादि येत असत, यामुळें यशोदाबाई त्याला नेहमीं रागें भरत, अशा प्रकारें यशोदाबाईची गृहस्थिति होती.

आनंदीबाई चाणाक्ष होत्या. त्यांच्या नजरेस या सर्व गोष्टी येऊन चुकल्या. त्यांनां वाटूं लागलें, आपण नुसतें बसून खावें, त्यापेक्षां या मुलांच्या शिक्षणाचें काम पतकरावें हें बरें; ह्मणजे यशोदाबाईलाहि संतोष होईल व आपलाहि वेळ चांगल्या रीतीनें जाईल. आनंदीबाई सुशिक्षित आहेत व त्यांच्या नांवाप्रमाणें त्यांचा स्वभाव आहे, हें यशोदाबाईला माहीत होतें. ह्मणून आठपंधरा दिवस लोटल्यावर त्यांनीं एके दिवशीं आनंदीबाईपाशीं बाळ्याच्या शिक्षणाच्या संबंधानें गोष्ट काढिली. आनंदीबाईच्याहि मनांत ही गोष्ट होतीच, तेव्हां त्यांनीं ती मोठ्या आनंदानें कबूल केली. यावेळीं काशी व माई तेथेंच होत्या. बाळ्या शेजारीं चाबकानें खांबाला बडवित होता. त्याला आनंदीबाईनीं 'बाळ' ह्मणून प्रेमानें आपल्याकडे बोलाविलें. त्याला 'बाळ्या' ह्या नांवाशिवाय कोणी कधीं हांक मारित नसे; ह्मणून तोहि हांक ऐकतांच कोणाकडे लवकर कधीं जात नसे. परंतु आनंदीबाईचे ते प्रेमाचे शब्द ऐकून तो तिकडे वळून ह्मणाला " तुह्मीं मला शिकवणार काय ? मला फार वेळ लिहित नाहींना बसविणार ? "

यशोदाबाईनीं मुलांच्या शिक्षणासंबंधानें सर्व मुखत्यारी आनंदीबाईकडे सोंपवून त्या आपल्या उद्योगाला लागल्या. आनंदीबाईला मराठी भाषेचें चांगलें ज्ञान असून शिवाय संस्कृत व इंग्रजी ह्या दोन भाषांचेंहि बरेंच ज्ञान होतें. हें त्यांनां नवऱ्यापासून प्राप्त झालें होतें. शिवाय, आल्यागेल्याचा समाचार घेणें, काटकसरीनें संसार करून प्रपंचांत दक्ष असणें, आप्त व इष्टमित्र यांच्याशीं प्रेमानें वागणें व विशेष प्रसंगीं त्यांचा समाचार घेणें, मुलांचें योग्य प्रकारें संगोपन करणें, जसा प्रसंग येईल तशी पाठ देणें, वगैरे गोष्टींचें शिक्षण त्यांनां मिळाल्या-

मुळें त्या सर्वांनां प्रिय होत्या, व पतीलाहि त्यांच्यापासून फार उपयोग होत असे. याच गुणामुळें नवीन स्थितींत अवघड असें त्यांनां कांहीं वाटलें नाहीं.

कविता, इंग्रजी धडे व तोंडपाठ केलेल्या तारखा ह्या आनंदीबाईला केव्हां ह्मणून दाखवीन, व लोंकरीचीं तऱ्हतऱ्हेचीं फुलें त्यांनां केव्हां दाखवीन असें काशीला झालें होतें. आनंदीबाई एकट्याच दिवाणखान्यांत बसलेल्या पाहून काशीनें आपलें सर्व भांडार त्यांच्यापुढें ओतलें. आनंदीबाईनीं हें सर्व ऐकून मात्र घेतलें. त्यांनां अचंबा वाटला नाहीं. हें पाहून काशीला आश्चर्य वाटलें, परंतु ती पुढें कांहीं बोलली नाहीं.

एके दिवशीं काशीनें मुसलमानी राजे, मोंगल बादशहा, व गव्हर्नर जनरल यांनीं हिंदुस्थान देशावर कोठपासून कोठपर्यंत राज्य केलें, हें ओळीनें ह्मणून दाखविलें. छापखाने, आगगाड्या, तारायंत्रें व गिरण्या हीं प्रथम केव्हां सुरू झालीं, हें तिनें सांगितलें. ती ह्मणाली "मावशीबाई, तुमच्या वेळीं अशा तारखा ह्मणून दाखवित असत का? मी या तारखा ह्मणून दाखविल्या त्या वेळेस लोक तोंडांत बोट घालतात!"

ह्यावर आनंदीबाईनीं उत्तर केलें "मी तुझ्याएवढी असतांना मला ह्या तारखा माहीत नव्हत्या, इतकेंच नाहीं, तर आतांसुद्धां कित्येक माहीत नाहींत."

काशीनें विचारलें "तर मग या सर्व गोष्टी निरुपयोगी आहेत का?"

आनंदीबाई म्हणाल्या "नुसत्या तारखा व नांवें पाठ करण्यांत कांहीं अर्थ आहे असें मला वाटत नाहीं. परंतु ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे कीं, अमुक गोष्टी उपयोगी किंवा निरुपयोगी हें त्यांचा उपयोग करणारावर अवलंबून आहे. छापखाने वगैरे केव्हां झाले हें तूं सांगितलेंस; परंतु ते सुरू होऊन बरींच वर्षे लोटलीं, तथापि, त्यांस अवश्य लागणारे पांढरे कागद, या देशांत साधनें असतां अद्याप तयार झाले नाहींत. आतां कुठें नुकतीच कागदाची गिरणी स्थापन झाली आहे; परंतु उत्तम कागद निघण्यास किती वर्षे पाहिजेत हें सांगतां येत नाहीं. दुसरें असें कीं, स्वभाषेंत साधारण ग्रंथांपलीकडे आपली मजल पोंहोंचली नाहीं. विद्वान् लोकांनीं लिहिलेले असे थोडेच ग्रंथ दृष्टीस पडतात. यावरून सुधारणा फार हळूहळू होत आहे व स्वभाषेविषयीं विद्वान् लोकांची अनास्था आहे, हें स्पष्ट होतें. कपाशीच्या गिरण्या व आगगाड्या सुरू होऊन

बरेंच दिवस झाले; परंतु त्या आपणास आपल्या जबाबदारीवर चालवितां येत नाहींत, व ओबडधोबड कापडापेक्षां आपली मजल पलीकडे पोहोंचली नाहीं ! तसंच, कारखाने उभारण्यास जें शिक्षण अवश्य तें अद्याप मिळालं नाहीं. यावरून महत्त्वाच्या गोष्टींसाठीं लोकांस परदेशांवर बरेंच दिवस अवलंबून रहावं लागणार व लोकांच्या अंगीं स्वपराक्रमावलंबनाचा अभाव हा साधारण दोष अद्याप पुष्कळ अंशीं कायम आहे, असं उघड दिसतं. या गोष्टी समजण्यास तारखांचा उपयोग आहे. जी गोष्ट तुला मीं इतिहासाच्यासंबंधानं सांगितली, तीच भूगोलाच्यासंबंधानंहि लागू आहे. तूं आज आठ वर्षं शिकत आहेस; परंतु भूगोलांतील व इतिहासांतील शेंपन्नास नांवं व पांचपंचवीस तारखा तुला तोंडपाठ येतात, किंवा अशाच प्रकारचं तुला दुसरं वरवर शिक्षण मिळालं आहे, यापलीकडे तुला विशेष येत नाहीं, हें तुझं तुला समजून येईल. ”

“ मी आजपर्यंत इतिहासांतील व भूगोलांतील फक्त नांवं पाठ करित असें, व कविता एकामागून एक तोंडपाठ ह्मणून दाखवित असें; परंतु तुह्मीं आतां सांगितलं त्याप्रमाणं मला येईल तर बरं होईल. ”

काशीच्या मनांत नवीन विचारांची थोडी प्रेरणा झाली, हें पाहून आनंदीबाई स्वस्थ बसल्या; कारण, त्यांनां माहीत होतें कीं, जे लोक हुशार असतात त्यांनां फक्त विचारांची दिशा दाखवून स्वतः श्रम करूं द्यावे; त्यांनां अमदींच लहान पोरासारखें जवळ बसवून काम करावयास लावूं नये. असें समजून त्या माईकडे वळाल्या.

माईला प्रत्येकजण ढ समजत असे, ह्मणून तिला कांहींच उद्योग करण्याची हौस नसे. दिवसांतून तिचा बराच वेळ साडी नेसणें व सोडणें, बाहुलीला नटविणें, बोळक्यांची उतरंडी मांडणें, व सागरगोटे खेळणें यांत जात असे. शिकण्याकडे अथवा कांहीं उपयुक्त उद्योग करण्याकडे तिचें लक्ष्य कमी असे.

एके दिवशीं आनंदीबाईंनीं तिला थोडक्यांत आपला वृत्तांत सांगितला. त्यापैकीं आनंदीबाईंनीं आपल्या मुलीच्या मरणाची जी हकीगत सांगितली तिचा मात्र माईच्या मनावर ठसा उमटला. माईनें तिचें नाक, डोळे व वर्ण यांविषयीं सर्व हकीगत विचारली. आनंदीबाईंनीं तिच्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें

दिल्यावर माई ह्मणाली "तुमची मुलगी गोदावरी ही कशी असावी, हें मला पूर्णपणं समजून आलं आहे."

आनंदीबाई सुस्कारा टाकून ह्मणाल्या " बेटा! बायका एके ठिकाणीं जमल्या ह्मणजे नाक, डोळे, शरीराचा रंग, अलंकार व कपडेलत्ते यांवर त्यांचं भाषण सुरू होतं व त्यांवरून त्या दुसऱ्या बायकांची परीक्षा करितात. मनाचे गुण व आचरण यांकडे त्यांचं कमी लक्ष्य असतं. यामुळं त्यांच्याकडून जशी परीक्षा व्हावी तशी होत नाहीं. मी सौंदर्याबद्दल माझ्या मुलीची फारशी प्रशंसा करित नाहीं. कारण, सुंदर असणं ही आपल्या हातची गोष्ट नाहीं. गोदावरीच्या गुणांविषयीं मी बोलत आहें. "

इतकें बोलत असतां आनंदीबाईंच्या डोळ्यांस पाणी येऊन त्यांना मोठा गहिंवर आला. हें पाहून माई ह्मणाली " मावशीबाई, तुह्माला मी आतां प्रश्न विचारणार नाहीं. "

" माई, तूं मला वाटेल तितके प्रश्न विचार; मी माझ्या मुलीच्यासंबंधानं तुला वाटेल तें सांगण्यास तयार आहें. "

" तर मग तुमच्या गोदावरीला मी आवडल्यें असत्यें कीं ताई आवडली असती ? "

" तिला तुह्मी दोघीहि आवडलां असतां. एकावर कमी व दुसऱ्यावर जास्ती प्रेम करणं हा प्रकार कुटुंबांत फार वाईट आहे, व प्रेमासाठीं मुलांची चढाओढ लावणं अथवा त्यांच्यामध्यें मत्सर उत्पन्न करणं हें वर्तन दोषास्पद आहे हें तिला पूर्णपणं माहीत होतं. "

" मावशीबाई, तुमची गोदावरी असती तर तिची अन् माझी चांगली मैत्री जमली असती; परंतु मला वाटतं कीं, आमची ताई फार हुशार आहे, मला कांहींच येत नाहीं, तेव्हां माझ्यापेक्षां ताईचं व तिचं फार जमलं असतं. "

आनंदीबाई म्हणाल्या " माई, आपल्याला कांहीं येत नाहीं असं जर तुला वाटत आहे, तर तुला पुष्कळ येत आहे असं मी समजत्यें; कारण, ज्यांना आपणास कांहीं येत नाहीं असं वाटतं, त्यांची सुधारणा लवकर होण्याचा संभव असतो. ज्यांना आपणास सर्व गोष्टी माहीत आहेत असं वाटतं, त्यांची सुधारणा होणं कठीण असतं. एके दिवशीं ग्रीस देशांतील प्रसिद्ध तत्त्ववेत्ता

साक्रेटीस याच्याकडे कांहीं लोक जाऊन त्याला विचारूं लागले कीं, ' तुह्मी आपणाला अज्ञान असें समजतां, परंतु तुह्मी सर्वांत शहाणे आहां असें देवतेचें ह्मणणें आहे, याचा अर्थ काय ? ' यावर साक्रेटिसानें उत्तर केलें इतर लोक आपणांस सर्वज्ञ समजतात तसें ' मी मला समजत नाहीं; यावरून त्यांची सुधारणा होण्याचा कमी संभव आहे असा देवतेच्या ह्मणण्याचा भाव असावा. ' "

माई ह्मणाली " तर मग मला कांहीं येईल असं तुह्माला वाटतं ? "

" वाटतं कां ह्मणत्येस? माझी पक्की खातरी आहे कीं, तूं श्रम करशील तर वाटेल तें करशील ! "

" तुह्मी ह्मणतां हें खरं, परंतु तुमच्या गोदावरीसारखी मी हुशार व सुशील होईन असं मला मुळींच वाटत नाहीं. ही गोष्ट थोडीशी अशक्य दिसते. बरं तें असो. गोदावरी माझ्याएवढी असतां काय करित असे, कोणतीं पुस्तकं वाचित असे, व कोणते उद्योग करित असे, तें मला सांगा. "

आनंदीबाईंनीं माईच्या ह्या प्रश्नाला उत्तर दिलें " ही सर्व हकीगत मी तुला उद्यां सांगेन. चित्रांचं पुस्तक तुला दाखवीन असं मीं बाळाला कबूल केलं आहे, तो माझी वाट पहात बसला असेल."

अशा प्रकारें स्वतःच्या हुशारीविषयीं काशीची वेडेपणाची समजूत घालवून तिच्या मनास नवीन वळण लावून दिल्यावर, व माईच्या मनांत आपणाला कांहीं येईल अशी आशा उत्पन्न करून दिल्यावर आनंदीबाई बाळ्यास चित्रें दाखविण्याकरितां चित्रबोधाचीं पुस्तकें कपाटांतून काढित होत्या, तों बाळ्यास दम न निघून तो त्या खोलींत आला व चित्रांचें पुस्तक कोठें आहे ह्मणून त्यानें विचारलें. पुस्तक पाहण्यास मागण्याची त्याची ही पहिलीच खेप होती.

आनंदीबाईंनीं बाळ्याच्या अंगावरून हात फिरवून त्याला आपल्याजवळ बसविलें व त्याला कांहीं चित्रें दाखविलीं. त्यांनां माहीत होतें कीं, मुलांनां ऋ, ऌ, छ, झ, ध वगैरे मूळाक्षरें, व श्री, ग्न, थ्व, क्ष, ज्ञ, ज्य, ह्य वगैरे जोडाक्षरें प्रथमच काढावयाला लावून त्यांनां कंटाळा आणणें व तीं काढतां न आलीं ह्मणजे, अथवा र, ञ, ङ्, ष, क्ष वगैरे अक्षरांचा बरोबर उच्चार करण्यासाठीं उरस्फोड करूनहि तीं त्यांनां बरोबर उच्चारतां न आलीं

ह्मणजे, अथवा ‘ शांताकारं भुजगशयनं ’ ह्मणतां आलें नाहीं ह्मणजे संताप करून घेणें, अथवा त्यांनां धोपाटित सुटणें, यांत शहाणपणा नाहीं. मुलें वर्ष सहा महिने उशिरां वाचण्यास लिहिण्यास अथवा ह्मणण्यास शिकलीं असतां फारसें अहित आहे असें नाहीं. प्रथम या गोष्टींविषयीं त्यांच्यामध्यें आवड उत्पन्न करणें, ही महत्त्वाची गोष्ट आहे.

ज्या वस्तूंपासून मुलांनां मौज वाटून थोडा बोध होतो त्या वस्तु त्यांनां प्रथम देणें चांगलें, असें समजून आनंदीबाईनीं कांहीं जिनसा विकत घेण्याचें मनांत आणिलें. जरी यशोदाबाईला मुलांनां स्वतः शिकविण्याचा मनापासून कंटाळा होता, तरी आपल्या मुलांनां लिहितांवाचतां यावें अशी त्यांची फार इच्छा होती. या कामासाठीं लागेल तो खर्च करण्यालाहि त्यांची तयारी होती. हें समजून आनंदीबाईनीं प्रथम चित्रांचीं पुस्तकें व पत्ते आणिले. मुलांनां चित्रें पाहण्याची व पत्ते खेळण्याची मोठी हौस असते.

जीं जनावरें, पक्षी, अथवा झाडें मुलांच्या पाहण्यांत येतात किंवा त्यांनां स्वल्पायासानें दाखवितां येतात, त्यांचीं चित्रें आनंदीबाईनीं पैदा केलीं. तीं कशाचीं आहेत, हें त्यांवर मोठ्या अक्षरांनीं लिहिलेलें होतें व त्यांचे ठळक ठळक भाग अक्षरांनीं दाखविले होते. पत्त्यांवरहि नांवें मोठ्या अक्षरांनीं लिहिलीं होतीं. बाळयास या चित्रांचा व पत्त्यांचा नाद लागत चालला. तो उठल्याबसल्या पत्ते व चित्रें चाळित असे. यामुळें पुष्कळ अक्षरें रोजच्या रोज शेंकडों वेळां त्याच्या नजरेखालून जाऊं लागलीं व त्यांपैकीं कांहीं त्याला येऊं लागलीं. जेवढीं येत नसत, तेवढीं आनंदीबाई कागदावर काढून भिंतीवर डकवून ठेवीत. अशा रीतीनें कांहीं दिवस लोटल्यावर छापखान्यास सुट्टीचा दिवस पाहून सर्व मुलांनां छापखाना दाखविण्यास आनंदीबाई घेऊन गेल्या. तेथें छापण्याचा कारखाना पाहून बाळयाला मोठें कौतुक वाटलें. शेजारील खोल्यांतून कांहीं खिळे जुळलेले व कांहीं सुटे पडले होते. ते पाहून तो कांहीं उचलून घ्यावयास लागला. इतक्यांत आनंदीबाई ह्मणाल्या “ बाळ ! तूं वेडा का आहेस ? दुसऱ्याच्या जिनसांनां विचारल्याशिवाय हात लावणं चांगलं नाहीं. ”

“ तें काय आहे ? ” ह्मणून विचारल्यावर आनंदीबाईनीं त्याला खिळ्यांचा उपयोग काय आहे तो समजावून सांगितला. तेव्हां बाळया ह्मणाला “ तुह्मीं ते मला घेऊन देत असलां तर मी घरीं येतों. ”

आनंदीबाईनीं खिळे घेऊन देण्याचें कबूल केलें. कारण, हें त्यांच्या मनांत कर्तव्यच होतें. दुसरे दिवशीं बाळ्यानें पुन्हा गोष्ट काढिल्यावर आनंदीबाई त्या तीनहि मुलांस एका कारखान्यांत घेऊन गेल्या. हा कारखाना नवीनच स्थापन झाला होता. त्यांत मुलांचे निरनिराळ्या प्रकारचे खेळ, लहान यंत्रें, हत्यारें, चित्रें, वीं वगैरे जिनसा होत्या. त्या दिसण्याला सुबक असून थोड्या किंमतींत मिळण्यासारख्या व उपयुक्त होत्या. त्या पाहत पाहत बाळ्या व माई इकडेतिकडे थोडा वेळ हिंडलीं; परंतु त्यांच्या मनाजोगी जिन्नस त्यांनां सांपडली नाहीं. बाळ्या ह्मणाला "मला इथें कांहींएक मौज वाटत नाहीं. इथें चावूक नाहीं, संत्री नाहीं, किरकिरें नाहीं, बाजा नाहीं, घोडा नाहीं, कांहीं एक नाहीं!"

माई ह्मणाली "या जिनसा काय हिडिस! इथं बाहुली नाहीं, गवळण नाहीं किंवा कांहीं नाहीं! हत्यारं घेऊन काय कराचं आहे? आह्मांला का सुतार बनायचं आहे? मावशीबाई ह्मणाल्या 'मौज दृष्टीस पडेल' ह्मणून मी इत्यें ह्मटलें; परंतु इथें तर कांहींच नाहीं!"

अशा प्रकारें मुलांनीं कारखान्यांतील जिनसांवर चरचरीत टीका केली. आनंदीबाईनीं ती सर्व ऐकली न ऐकल्यासारखें केलें. इतक्यांत एक गाडी बाळ्याच्या दृष्टीला पडली. गाडीला घोडा नव्हता, ह्मणून तोच स्वतः घोडा होऊन आपणाला मारित मारित गाडी ओढित चालला. आनंदीबाईनीं बाळ्याला अक्षरें जुळून लिहितां यावीं ह्मणून मोठमोठाले खिळे विकत घेतले. माईकरितां शिवण्याचें यंत्र, दोरा व सुया हीं घेतलीं. तीं अशासाठीं कीं, तिला शिवणकलेचा नाद लागावा. स्त्रियांस ही कला येणें फार अवश्य आहे. हें शिक्षण त्यांनां मिळाल्यापासून प्रपंचांत फार उपयोग होऊन भूषण असतें, असें आनंदीबाईस अनुभवावरून समजून आलें होतें. बाळ्या व माई यांच्याकरितां जिनसा विकत घेतलेल्या पाहून काशी ह्मणाली "मावशीबाई, माझ्याकरितां नाहीं का कांहींच घेत?"

काशीला चित्रें काढण्याचा थोडासा नाद होता हें आनंदीबाईस माहीत होतें; ह्मणून तिच्याकरितां कांहीं नकाशे, चित्रें व चित्रकलेचें शिक्षण देण्यास जीं साधनें लागतात तीं, असें सर्व सामान त्यांनीं कारखान्यांतील नोकराबरोबर पाठवून देण्यास दुकानदारास सांगितलें. हें चाललें असतां "मला हें पाहिजे,

मी हें खाणार, " असे शब्द लांबून ऐकूं आले. तेव्हां काशी ह्मणाली " मावशीबाई, तो पहा बाळ्या कारखान्यांतील मनुष्याबरोबर झोंबी घेत आहे, व त्याच्या हातांतून कांहीं हिसकावून घेत आहे. "

हें पाहून आनंदीबाई तिकडे लवकर गेल्या. बाळ्या टोमाटोचें बीं खाण्याच्या बेतांत आहे असें त्याच्या दृष्टीला पडलें.त्यांनीं त्याचा हात धरिला व सांगितलें " बाळ, हें बीं आहे. हें, जमीन खणून तींत पेरिलें असतां चांगलें फळ येतें व तें खाण्याला रुचकर लागतें. बीं खाल्लें तर गोड लागत नाहीं. तुला पाहिजे असल्यास खाऊन पहा. "

त्यावरून बाळ्यानें तें लागलीच तोंडांत टाकिलें व तोंड वेडेंवांकडें केलें. तो रागावून ह्मणाला " मावशीबाई, हें नको, तें नको, असें ह्मणून तुह्मी मला कांहींच देत नाहीं, तर मला आतां कांहींच नको ! "

आनंदीबाईंनीं त्याची समजूत घालून टोमाटोचें बीं, एक लहान कुदळ व खोरें अशा जिनसा विकत घेतल्या. मुलें जी जी चमत्कारिक वस्तु पाहतात ती तीं मागत सुटतात, असा साधारण नियम आहे. त्याप्रमाणें मुलांनीं पुष्कळ जिनसा मागितल्या. त्यांपैकीं कांहीं घेऊन देण्याविषयीं आनंदीबाईस मोह उत्पन्न झाला होता; परंतु पूर्वींच ज्या घेतल्या होत्या, त्यांपेक्षां आणखी जास्त घेणें त्यांनां प्रशस्त वाटलें नाहीं. कारण, मुलांच्या मनाप्रमाणें आणखी निरनिराळ्या जिनसा घेऊन त्यांचें प्रेम संपादन करणें त्यांनां बरें वाटलें नाहीं. नवीन नवीन जिनसा फार घेऊन दिल्या असतां मुलांची तृप्ति न होऊन पुनः नवीन जिनसा ते मागतील अशी भीति असते, हें त्यांनां माहीत होतें. मुलांमध्यें उद्योगाविषयीं आवड उत्पन्न करणें व स्वतंत्र आणि उपयुक्त काम करण्याविषयीं त्यांनां गोडी लावणें, हा त्यांचा मुख्य हेतु होता. हा हेतु मनांत आणून व मुलांच्या मनाची स्थिति लक्ष्यांत आणून त्याप्रमाणें त्यांनीं बहुतेक जिनसा विकत घेतल्या होत्या. बाळ्यानें कांहीं चमत्कारिक अथवा खाण्याचा पदार्थ मागितला असतां तो त्याला कोणी घेऊन देत नसे, इतकेंच नाहीं, तर जो तो त्याला दाबित असे; ह्मणून तो कधीं हट्ट धरून, कधीं लुबाडून, अथवा कधीं चोरून घेत असे. परंतु या वेळेस आपण मागितलेल्या कांहीं जिनसा आनंदीबाईंनीं घेऊन दिल्या, हें पाहून त्याला फार आनंद झाला. त्यानें आनंदीबाईचा हात धरिला व शेजारीं

एक स्टूल होतें तें पुढें करून ह्मणाला " मावशीबाई, तुह्मी यावर थोडा वेळ बसा. मी सर्व कारखाना पाहून लवकर येतों. "

काशी इकडे तिकडे पाहत फिरत असतां बाळमित्र व इसापनीति हीं पुस्तकें तिच्या दृष्टीस पडलीं. तीं चाळून पाहून ती आनंदीबाईस ह्मणाली " मावशीबाई, हीं पुस्तकं तुह्माला आवडणार नाहींत असं मला वाटतं; कारण, हीं गोष्टींचीं पुस्तकं दिसतात. "

आनंदीबाईनीं उत्तर केलें " नुसत्या नांवावरून पुस्तकांची परीक्षा करूं नये. कादंबरीचं अथवा गोष्टींचं पुस्तक एवढ्यावरून तें टाकून देणं चांगलं नाहीं; त्यांतील विषय उपयुक्त व व्यवहारास लागू आहे किंवा नाहीं व भाषा सुबोध व सभ्यपणाची आहे किंवा कसं, हें पाहिलं पाहिजे. मराठी भाषेंत असलीं पुस्तकं फारच थोडीं दृष्टीस पडतात. हीं मी तुह्मांला घेऊन देणार होत्यें, परंतु बाळाच्या धांदलींत मला त्यांचं विस्मरण पडलं. तूं त्यांचं नांव काढलंस हें चांगलं केलंस. "

हें बोलणें चाललें असतां बाळ्या धावत धावत त्यांच्याकडे आला. तें पाहून आनंदीबाईला वाटलें कीं, त्याच्या मनांत कांहीं जिन्नस घेण्याचें आलें असावें; परंतु तसा कांहीं प्रकार नव्हता. बराच वेळ झाल्यामुळें त्याला कंटाळा येत चालला होता, व घरीं जाऊन जमीन खणून तींत टोमाटोचें बीं केव्हां पेरीन, असें त्याला झालें होतें. घरीं जाऊन पोहोंचतांच त्यानें कोट व टोपी हीं मोलकरणीचे अंगावर फेंकून दिलीं व तो आनंदीबाई माजघरांत यशोदाबाईशीं बोलत उभ्या होत्या तिकडे गेला. तेथें कांहीं वेळ उभा राहिल्यावर तो ह्मणाला " मावशीबाई, बियांचा पुडा मीच घेऊन आलों आहें. पाण्याची झारी व कुदळ आली का ? मीच तपास करणार होतों, परंतु नोकरांपाशीं किंवा घरांतील दुसऱ्या माणसांपाशीं तूं कांहीं मागत जाऊं नकोस, असें तुह्मीं मला परवां सांगितलें, म्हणून मी कोणापाशीं बोललों नाहीं. "

बाळ्या इतक्या नम्रपणानें कधींहि बोलला नव्हता; ह्मणून त्याच्या या वर्तनाचें यशोदाबाईस फार आश्चर्य वाटलें, व आपण सांगितलेली गोष्ट ऐकून त्याप्रमाणें बाळ्या वागला हें पाहून आनंदीबाईलाहि फार आनंद झाला. चाकर

नोकर अथवा घरांतील मंडळी ह्यांजबरोबर बाळ्याचे नेहमीं तंटे होत. त्यांनीं त्याचें म्हणणें ऐकिलें नाहीं ह्मणजे हा हट्ट धरून बसे. तसे प्रसंग वारंवार येऊं नयेत व त्याला जी संवय लागली होती ती हळूहळू नाहींशी व्हावी, ह्मणून आनंदीबाईनीं बाळ्याला ताकीद दिली होती; परंतु त्याच्यापासून कबूल करून घेतलें नव्हतें. कित्येक आईबाप वारंवार मुलांपासून एखादी गोष्ट न करण्याविषयीं कबूल करून घेतात. अज्ञानामुळें वचन देण्यास मुलांची जितकी तयारी असते, तितकी तें मोडण्याविषयींहि असते. यामुळें वचनाचें महत्त्व किती आहे हें त्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं. असें होणें फार वाईट आहे, हें आनंदीबाईला माहीत होतें. मुलांनां उद्योग नसला ह्मणजे तीं रस्त्यांत जाऊन मुलांबरोबर खेळतात व कलागती करितात, किंवा चाकरनोकरांबरोबर तंटे करितात; ह्मणून त्यांनीं मुलांच्यामागें निरनिराळ्या प्रकारचे उद्योग लावून दिले. चाकरनोकर वगैरे आशिक्षित लोकांच्या सहवासानें मुलांनां हांजीहांजी करून घेण्याची संवय लागते. आपणांस पुष्कळ गोष्टी माहीत नाहींत, हें मोठ्यांच्या सहवासानें त्यांनां कळून येऊन त्यांच्यांतील ताठरपणा कमी होतो हें लक्ष्यांत आणून आनंदीबाई काशी वगैरे मुलांनां इतर मुलांबरोबर अथवा चाकरांबरोबर कारणाशिवाय सहवास ठेवूं देत नसत. त्यांनीं मुलांच्यामागें अशा रीतीनें उद्योग लावून दिले होते, कीं, क्षणोक्षणीं त्यांच्यावर नजर ठेवण्याचें कारण न पडतां तीं काय करित आहेत हें मात्र आपणास समजावें. मुलांनीं एखादी देण्यासारखी वस्तु मागितली असतां ती त्यांनां त्या लागलीच देत असत; ह्मणून कोणतीहि वस्तु लागली असतां यशोदाबाईचीं मुलें प्रथम आनंदीबाईजवळ मागत. बाळ्यानें झारी व खोरें मागितल्याबरोबर आनंदीबाईनीं तीं त्याला तावडतोब दिलीं व तोहि लागलीच खणावयास लागला. यशोदाबाईच्या घराचे पिछाडीस मोठें आवार होतें. त्यांत झाडें पुष्कळ होतीं व एक मोठी विहीर असून रहाटगाडगेंहि होतें; परंतु त्याची व्यवस्था नीट नव्हती. जागा पुष्कळ, विहिरीला पाणी पुष्कळ, व काम करण्यास नोकरचाकर पुष्कळ. इतकीं साधनें असतांहि रोजच्यारोज भाजीपाला व फुलें विकत घ्यावीं लागत, यांत नवल नव्हतें. कारण, यजमानिणीचेंच घरांत लक्ष्य नाहीं, मग चाकर माणसें असल्या कामांकडे कशाला लक्ष्य देतील? तीं फक्त तिच्या पुढें पुढें करून एरव्हीं स्वस्थ बसतील, हें उघड आहे.

शिमगा व ताबूत ह्या दिवसांत लहान मुलांची व अज्ञान लोकांची फारच धांदल असते. ह्या दिवसांत ठिकठिकाणीं जितकी चळवळ असते, तितकी दुसऱ्या दिवसांत बहुतकरून नसते. ह्या दिवसांत शहर जितकें दणदणून जातें, तितकें दुसऱ्या दिवसांत जात नाहीं. यात्रा, रथोत्सव, दसरा वगैरे कारणांमुळें मेळा जमून शहर गजबजून राहतें; परंतु ती धांदल पुष्कळ अंशीं सौम्य प्रकारची असते. ह्या दिवशीं गडबड असते परंतु ती निराळ्या प्रकारची असते. या गडबडीत अचकटविचकटपणा अथवा बीभत्सपणा प्रायः नसतो, किंवा दांडगाईचा प्रकारहि फारसा नसतो. ताबुताच्या दिवसांत सोंगें घेऊन नाचणें, हें कित्येक मुसलमान लोकांनासुद्धां पसंत नाहीं. ताबूत तयार करणें व ते मिरविणें हेंसुद्धां त्यांपैकीं कित्येकांस संमत नाहीं. हें करणें धर्मकृत्य आहे असें कांहींनां वाटत नाहीं. असें असून हिंदु लोकांनीं सोंगें घ्यावीं, शहरांतून नाचत बसावें व तमासगीर जमवावे, आणि स्वतःचा तमाशा लोकांनां दाखवून आपलें हंसूं करून घ्यावें, यासारखा मूर्खपणा तो कोणता ? स्वतःचीं हजारों दैवतें असतां ताबूत दैवत ह्मणून समजावें, फकीर व्हावें, रेवड्या उधळाव्या व तमाशा पहावा, हें वेड नाहीं काय ? तमाशे करणारे पुष्कळ असले ह्मणजे तमासगिरांनीं विचार करूं नये का ? तमासगिरांपैकीं पुष्कळ समंजस आहेत, त्यांनीं ह्या गोष्टीचा विचार करणें अवश्य आहे. जर ताबूत करून ते मिरविणें हा धर्म आहे असें मुसलमान लोक मानित असतील, तर ते मानोत; परंतु घरीं सोंगें असतां हिंदु लोकांनीं आणखी सोंगें घेऊन आपला वेडेपणा जगास कां दाखवावा, हें समजत नाहीं. मुसलमान लोकांच्या दुसऱ्या कांहीं चांगल्या चाली असतां त्यांचा स्वीकार न करणें, व धिंगाणा करण्याच्या त्यांच्या चालींचें अनुकरण मोठ्या हौसेनें करणें, बरें आहे का ? सोंगें घेऊन धिंगाणा करण्याची तरी चाल त्यांची मूळची असेल असें वाटत नाहीं. ह्या चालीला हिंदु लोकांकडून सहाय्य मिळून ती बलवत्तर होत गेली असावी, असें वाटतें. ताबुताच्या दिवसांत जो धिंगाणा हिंदु लोक करितात, त्याचें कौतुक समंजस मुसलमान करित असतील असें वाटत नाहीं. कारण, त्यांपैकीं जे धार्मिक आहेत त्यांची वृत्ति शांत व गंभीर असते. ते गंभीरपणानें जातात व गंभीरपणानें परत येतात. ताबुतांस तमाशाचें रूप आणण्याचें श्रेय हें प्रायः आमच्या लोकांनीं घेतलें आहे. अझूनहि आह्मीं या बाबतींत विचार करूं नये

का ? आतां जर विचार करूं नये तर करावा तरी केव्हां ? मोठा मेळा एकत्र जमणें चांगलें; परंतु नाचण्यासाठीं अथवा तमाशा पहाण्यासाठीं तो नको आहे. शहरांत चळवळ व हालचाल पाहिजे; परंतु तमाशा करण्यासाठीं व आपलें हंसूं करून घेण्यासाठीं नको आहे. जर आपणच मोठ्या हौसेनें तमाशा पाहतों, तर मुलांस ह्याची गोडी वाटेल ह्यांत काय नवल आहे ? आपल्या चांगल्या कृतीपेक्षां वाईट कृतीचें अनुकरण मुलें तेव्हांच करितात; सौम्य गोष्टींपेक्षां धिंगाण्याचें त्यांनां मोठें कौतुक वाटतें, व सौम्य गोष्टींपेक्षां विलक्षण गोष्टींचा ठसा त्यांच्या मनावर लवकर उमटतो.

ताबुताच्या संबंधानें जसा प्रकार सांगितला, तसा, किंबहुना जास्ती मूर्खपणाचा प्रकार शिमग्याचे दिवसांत दृष्टीस पडतो; परंतु ह्याबद्दलहि समंजस लोकांत कांहीं कैवारी दृष्टीस पडावे,हें आश्चर्य आहे. अंगाला राख फांसणें, मातीनें अंग भरविणें, गुलालानें कपडे व अंग लाल करणें, लोकांच्या घरच्या गोवऱ्या व लांकडें चोरणें, कमेटीचे खांब उपटणें,व कंदील फोडणें, दुसऱ्यांच्या सामानाची नासधूस करणें, तांबेच्या तांबे रंग उडवून कपडे व अंग खराब करणें, शंखध्वनि करून घसा कोरडा करून घेणें, अचकटविचकट शब्द उच्चारून जिव्हा विटाळणें, मातृत्रयी अथवा पितृत्रयी ह्यांचा उद्धार करणें अथवा करवून घेणें, व तमाशे करण्यांत अथवा पाहण्यांत पुरुषार्थ मानणें, तात्पर्य, ज्या गोष्टी रानटी लोकांस देखील शोभत नाहींत, किंवा जें आचरण पशुवत् आहे असें आपण एरव्हीं समजतों व त्याचा तिटकारा करतों, त्या गोष्टी व तें आचरण ह्या वेळीं करण्यास आपणास हौस वाटावी, ह्या गोष्टी झाल्या नाहींत ह्मणजे शिमगा गाजला नाहीं असें समजून आपण खेद मानावा, व आपल्या घाणेरड्या कृतीचें अनुकरण मुलांनां करावयास लावावें व तीं चटोर निघालीं ह्मणून मागाहून रडगाणें गात बसावें, हें वर्तन शहाणपणाचें आहे असें कोणी ह्मणेल का ?

हे सर्व विचार आनंदीबाईच्या मनांत घोळत असत. वरील बहुतेक प्रकार धर्माच्या नांवानें होत आहेत हें समजून त्यांनां आश्चर्य वाटे, व हिंदु लोकांच्या मनाची स्थिति फार निकृष्ट झाली आहे हें पाहून त्यांनां अत्यंत खेद होई. लोकांनीं सण करूं नयेत किंवा विश्रांति घेऊं नये, असें त्यांचें मत नसे. सण करावा, विश्रांति घ्यावी व आनंदोत्सव करावा; परंतु त्याला मर्यादा आहे!

सर्व कांहीं रीतीनें करावें. पशुवत् आचरण करणें ही रीत नाहीं, ही मर्यादा नाहीं, किंवा हा आनंदहि नाहीं! संक्रांत, दसरा, दिवाळी वगैरे सणांच्यासंबंधानें नांव ठेवण्यासारखें कांहीं नसतें. मग शिमग्याचे दिवसांत आपल्या लोकांनीं आपलें मनुष्यपण कां विसरावें, व ह्याविषयीं अद्याप विचार कां करूं नये, ह्याबद्दल राहूनराहून आनंदीबाईंना नवल वाटत असे. इतर बहुतेक सण व शिमगा ह्यांविषयीं विचार करतां, शिमग्याचा सण व इतर बहुतेक सण हे मूळचे एकाच लोकांचे असावेत असें संभवनीय वाटत नाहीं. हिंदुस्थान देशांत आर्य लोक येण्यापूर्वी मूळचे रानटी लोक राहत असत. भिल्ल, खोंड, सोंठल वगैरे ते मूळचे रानटी लोक होत. शिमगा हा सण मूळच्या या लोकांचा असून आर्य लोकांपैकीं कांहीं अज्ञान लोकांनां तो पसंत वाटून प्रचारांत येत येत तो रूढ झाला असावा, व बहुजनसमाजास पसंत पडल्यामुळें त्याचा शास्त्रांत प्रवेश झाला असावा. ज्या लोकांस सौम्य गोष्टीपासून आनंद होतो व जे लोक दिवाळी, दसरा वगैरे सौम्य प्रकारच्या सणांत आनंद मानतात, तेच लोक धिंगाणा करण्यांत व रानटी लोकांप्रमाणें आचरण करण्यांत आनंद मानित असतील, हें कमी संभवतें. शिमग्याचा सण हा मूळचा आहे असें जरी घेऊन चाललें, तरी तो मूळचा आहे एवढ्याच केवळ कारणावरून त्यांचें अवलंबन करणें व त्यांतील बीभत्स व मूर्खपणाचा प्रकार न मोडणें, हा असमंजसपणा आहे असें आनंदीबाईस वाटे.

वरील सर्व विचार त्यांच्या मनांत येण्यास एक चमत्कारिक कारण उत्पन्न झालें. त्या यशोदाबाईंच्या घरीं आल्यावर व त्यांच्या मुलांच्या शिक्षणाचें काम हातीं घेतल्यावर थोड्या दिवसांनीं शिमग्याचा सण आला. पौर्णिमेच्या दिवशीं आकाश निरभ्र होतें. चांदणें शुभ्र पडलें होतें. ठिकठिकाणीं होळ्या पेटल्या होत्या; या होळ्यांभोंवतीं उनाड मुलें जमा होऊन मोठ्यानें शंखध्वनि करित होतीं; जाणाऱ्यायेणाऱ्याच्या नांवाचा उद्धार चालू होता. कांहीं लोक पागोटीं घालून व कांहीं तसेच होळ्या पाहण्याकरितां घराबाहेर पडले होते. अशी रस्तोरस्तीं एकच गर्दी चालू होती. यशोदाबाईंच्या घरची होळी संध्याकाळींच झाली होती व त्या जेवणखाण करून आपल्या शेजारणीच्या घरीं गेल्या होत्या. आनंदीबाई माडीवर पुस्तक वाचित होत्या, काशी व माई निजल्या होत्या. परंतु बाळ्या जागा होता. कारणें, त्याला होळ्या पाहण्याची फार इच्छा होती. तो, आई बाहेर

जाण्याची वाट पाहत होता. आनंदीबाई नुकत्याच आल्यामुळें त्याला त्यांचा विशेषसा धाक नव्हता. खालून वर व वरून खालीं, असें त्याचें भ्रमण चालू होतें. इतक्यांत त्याच्या दारावरून मुलांचा मेळा चालला. मुलांचा आरडाओरडा ऐकून बाळ्या बाहेर आला. त्याला पाहतांच मुलांनीं ध्वनीवर ध्वनि चालविला. या मेळ्यांत बाळ्याचे खेळगडी होते. त्यांपैकीं एकानें त्याचा हात धरून त्याला खालीं ओढिलें. दुसऱ्यानें त्याला गचांडी देऊन एका मुलाच्या अंगावर लोटून दिलें, तेव्हां तो बाळ्याच्या अंगावर चवताळून आला. बाळ्या जात्याच द्वाड असे. त्याच्या खाण्यापिण्याविषयीं चांगली व्यवस्था असल्यामुळें, व घरांतील माणसांचा अथवा शाळेचा त्याला यत्किंचित् धाक नसल्यामुळें त्याच्या वयाच्या मानानें पाहतां त्याचें शरीर मजबूत होतें. मुलगा अंगावर आल्याबरोबर त्यानें धिंगामस्तीस सुरुवात केली. परंतु मुलें पुष्कळ असल्यामुळें त्याचा इलाज चालला नाहीं. मुलांनीं त्याला ओढित नेलें. “ मी आईला विचारून आलों नाहीं, मावशीबाई मला रागें भरतील, ” असें त्यानें सांगितलें; परंतु व्यर्थ ! मुलांना बाळ्याच्या आईची अथवा मावशीबाईची भीति बाळगण्याचें कारण नव्हतें. त्यांनीं त्याला ओढित नेलें. बाळ्याच्या मनांत जावयाचें होतें, ह्मणून त्यानेंहि नंतर फारसे आढेवेढे घेतले नाहींत. नंतर मुलांचा मेळा होळ्या पाहत पाहत मोठा रस्ता सोडून गल्लींतून चालला. बोळांत गेल्यावर मुलांनीं पुनः दांडगाई करण्यास सुरुवात केली. त्यांपैकीं चौघांनीं एका मुलाला उचलून नदीचा रस्ता धरिला. त्यांच्याबरोबर आणखीहि कांहीं मुलें गेलीं. बाकीच्या मुलांनां हें पसंत पडलें नाहीं. गल्लींत दोनतीन गाढवें उभीं होतीं. त्यांपैकीं एकावर एक मुलगा बसला व बाकीचे बिचाऱ्या गाढवास मारित मारित मागून चालले. पाळीपाळीनें बहुतेक मुलगे गाढवावर बसले. बाळ्याची पाळी आल्यावर तोहि गाढवावर बसला; परंतु बसतां बसतां खालीं पडला, तेव्हां मोठा हंशा पिकला. मोठ्या मुलांनीं बाळ्याला उचलून पुनः गाढवावर बसविलें. बाळ्या चालला असतां मुलांनीं धूळ उडविण्यास आरंभ केला. अशा रीतीनें मुलांनीं बराच वेळ दांडगाई केली. शेवटीं तीं आपआपल्या घरीं गेलीं. बाळ्याहि मागल्या वाटेनें घरांत आला व निजला.

वरील कांहीं प्रकार एका गृहस्थाच्या दृष्टीस पडला होता. हा गृहस्थ यशोदाबाईच्या पतीचा स्नेही होता. हा प्रकार पाहून त्याला फार वाईट वाटलें.

दुसरे दिवशीं त्यानें यशोदाबाईस ही सर्व हकीगत कळविली. ती ऐकून तिला फार राग आला. तो गृहस्थ गेल्यावर यशोदाबाईनीं बाळ्याला बोलाविलें. बाळ्या आल्यावर त्यांनीं त्याच्या थोबाडींत दिली. नंतर झाडाचा फोक काढून दोनतीन फोक त्याच्या पाठीवर ओढिले. बाळ्या मोठ्यानें ओरडूं लागला, परंतु यशोदाबाई फार रागावल्या असल्यामुळें त्याला सोडविण्याची कोणाची छाती झाली नाहीं. बाळ्याचें ओरडणें ऐकून आनंदीबाई खालीं आल्या. पाहतात, तों बाळ्या घामाघूम होऊन जमिनीवर पडला आहे व त्याचे अंगावर वळ उठले आहेत, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. आनंदीबाईनीं बाळ्यास प्रथम उठवून दूर केलें; नंतर त्या यशोदाबाईस ह्मणाल्या "काय हा अविचार ? बरं तर बरं, नाहीं तर छडी वर्मीं लागून मुलाची काय स्थिति झाली असती !"

यशोदाबाई रागांतच होत्या. त्यांनीं उत्तर केलें "तुह्माला ह्या पोराची कृति माहीत नाहीं; नाहीं तर, तुह्मी असं बोललां नसतां. असला पोरगा असण्यापेक्षां नसलेला पुरवला ! चांगलीं मुलं असलीं तर बरं, नाहीं तर, असलीं मुलं असून काय करायचं आहे ? आज हा गाडवावर बसला; उद्यां लोकांचीं घरं जाळील. हा काय करील ह्याचा नेम सांगवत नाहीं ! ह्याला कोणाचा धाक नाहीं." असें बोलून यशोदाबाईनीं घडलेली सर्व हकीगत सांगितली.

यशोदाबाईनीं सांगितलेली हकीगत ऐकून आनंदीबाईला वाईट वाटलें. त्या ह्मणाल्या "यशोदाबाई, तुह्मी ह्मणतां हें सर्व खरं आहे; परंतु मुलांस अविचारानं शिक्षा करणं चांगलं नाहीं. त्यांनां धोपटित सुटणं हें तर फारच वाईट आहे. मुलांनां धाक असावा, त्यांनां जरब असावी, ह्या गोष्टी खऱ्या आहेत; परंतु ह्याला तरी मर्यादा आहे व ह्या सर्व रीतीनंच झाल्या पाहिजेत. दुसरं असं कीं, मुलांनां शिक्षा करण्यापूर्वीं त्यांचा स्वतःचा दोष कितपत आहे, ह्याविषयीं विचार केला पाहिजे. ज्या ठिकाणीं त्यांचा स्वतःचा दोष आहे, त्या ठिकाणीं त्यांनां शिक्षा करणं बरोबर आहे; परंतु ज्या ठिकाणीं सामाजिक स्थितींतील दोषांमुळं त्यांच्या हातून अपराध झाला आहे, त्या ठिकाणीं त्यांनां धोपटित सुटण्यांत अर्थ नाहीं. रथ ओढणं हें पुण्यकर्म आहे व हें करणं चांगलं आहे, असं समजून मोठालीं माणसं ओढावयास लागतात, तर मुलांनांहि तीच इच्छा होणं स्वाभाविक आहे. पोरस्वभावाप्रमाणं बाललीला करण्याची मुलांनां हौस वाटणं स्वाभाविक आहे. तुह्मी दांडगाई करा असं सांगावयास नको. रथ

ओढावयास लागलं असतां धक्काबुक्की अथवा हिसकाहिसक व्हावयाचीच, व ह्यांत कौतुक वाटून त्यांच्या हातून थोडीशी दांडगाई होणं हें आश्चर्य आहे असं नाहीं; तसं न होणं हें मात्र आश्चर्य होय. त्याचप्रमाणं ताबुताचे अथवा शिमग्याचे संबंधानं गोष्ट आहे. शिमग्याच्या दिवसांत बीभत्स प्रकार करण्यांत अथवा मूर्खपणाचं आचरण करण्यांत कित्येक मोठ्या माणसांनां हौस वाटते, निदान तीं कानाडोळा करतात, अथवा ह्याबद्दल आपणांस वाईट वाटतं असं दाखवित नाहींत; ह्मणून मुलांनां हौस वाटते व तीं दांडगाई करतात ह्यांत आश्चर्य नाहीं. बाळानं काल जो अपराध केला, त्याला तो कारण नसून आपली सामाजिक स्थिति कारण आहे. ही स्थिति सुधारली पाहिजे, ह्मणजे असले अपराध होण्याचे प्रसंग कमी येतील; किंवा त्यालाच वाईट वाटलं ह्मणजे त्याच्या हातून तो होण्याचा संभवच कमी होईल. आपली सामाजिक स्थिति सुधारेल अशी आशा नाहीं. ही स्थिति सुधारण्यास लोकमतांत बदल झाला पाहिजे. लोकमत ह्मणजे समाजांतील बऱ्याच व्यक्तींचं मत होय. हें मत बदलण्यास काल लोटला पाहिजे. हें मत बदलणं एकट्यादुकट्याचे स्वाधीन नाहीं. परंतु ज्यानं त्यानं आपल्या मुलांविषयीं विचार करणं व त्यांनां वाईट वाटविणं ही गोष्ट स्वाधीनची आहे. हें प्रत्येकास करतां येण्यासारखं आहे. मुलांनां धोपटित सुटण्यांत अर्थ नाहीं. मार खाऊन खाऊन तीं कित्येक वेळां कोडगीं होतात. मार खाण्याचं भय नसलं, ह्मणजे तीं मूर्खपणाचं आचरण करण्यास पुनः प्रवृत्त होतात, व जें कार्य व्हावयाचं तें होत नाहीं, किंवा क्षणिक असतं. ज्या गोष्टींमुळं त्यांची वृत्ति चंचल होते व त्यांनां मूर्खपणाचं आचरण करावंसं वाटतं, त्या गोष्टी त्यांच्या नजरेपुढं असूं नयेत. असं होण्यासारखं नसेल, तर त्या गोष्टींविषयीं त्यांचे मनांत तिरस्कार उत्पन्न झाला पाहिजे. असं झालं ह्मणजे, त्यांचं त्यांनां वाईट वाटून निरंतरचं कार्य होण्याचा संभव असतो."

यावर यशोदाबाई म्हणाल्या "तुमची समजूत काय असेल ती असो. मुलांनां मार मिळाल्याशिवाय तीं वठणीवर येत नाहींत. मार मिळण्याची भीति त्यांनां असली पाहिजे. बाळ्यासारख्या मुलांनां वाईट वाटणं ही गोष्ट कठीण आहे."

आनंदीबाई म्हणाल्या "मारण्यापासून कधींच उपयोग होत नाहीं असें मी ह्मणत नाहीं. मुलांनां भीति असूं नये, असंहि माझं ह्मणणं नाहीं. परंतु

पुष्कळ वेळां असं घडून येतं कीं, ज्या गोष्टीबद्दल मारावयाचं अथवा भीति असावयाची, त्या गोष्टीचा तिटकारा न वाटतां उलट मारणाराविषयींच तिटकारा उत्पन्न होतो. असं होणं चांगलं नाहीं, इतकंच नाहीं, पण वाईट आहे. वाईट गोष्टीबद्दल तिरस्कार उत्पन्न व्हावा व मुलाची सुधारणा व्हावी अशी आपली इच्छा असते; मारणाराविषयीं तिटकारा वाटावा अशी आपली इच्छा नसते. "

यशोदाबाई म्हणाल्या " तुह्मी ह्मणतां हें सर्व खरं दिसतं; परंतु लहान मुलांनां स्वतः वाईट वाटून तीं निवळल्याचं मला अनुभवावरून माहीत नाहीं. मग तुमच्या अनुभवास कसं आलं असेल कोण जाणे ! "

" तुमच्या उलट माझा अनुभव आहे. लहान मुलांनां वाईट कर्माविषयीं वाईट वाटत नाहीं असं नाहीं. इतकंच कीं, वाईट कर्माविषयीं त्यांचे मनांत तिटकारा उत्पन्न करणं तो युक्तीनं केला पाहिजे."

आनंदीबाईच्या ह्या भाषणावरून यशोदाबाईची खात्री झाली नाहीं. आनंदीबाईनीं सुचविलेल्या उपायावर त्यांचा भरंवसा पटला नाहीं. तथापि असें ह्मणणें त्यांनां चांगलें दिसलें नाहीं. ह्मणून " तुह्माला जें योग्य दिसेल तें तुह्मी करा, " असें बोलून त्या अंग धुवावयास गेल्या.

आनंदीबाईनीं आपणास सोडविलें नसतें, तर आपणास आईच्या हातचा फार मार खावा लागला असता, ही गोष्ट मनांत येऊन बाळयाच्या मनांत आनंदीबाईविषयीं प्रेम उत्पन्न झालें. आनंदीबाई त्याला घेऊन वर गेल्या. बाळयानें हूं का चूं केलें नाहीं. तो मुकाट्यानें त्यांच्या मागून गेला व त्या दिवशीं शांत रीतीनें राहिला. अशा रीतीनें दोनतीन दिवस गेले.

परंतु ही स्थिति सदोदित राहील, असें आनंदीबाईस वाटलें नाहीं. ह्मणून काय उपाय करावा ह्या विचारांत त्या होत्या. शेवटीं त्यांनां एक उपाय सुचला व तो करण्याचें त्यांनीं मनांत आणिलें. त्यांनीं तीन चित्रें काढविलीं. एक बाळ्या गाढवावर बसून चालला आहे व मुलें गाढवास मारित मारित त्याच्या मागून चाललीं आहेत; दुसरें, तो गाढवावर बसून चालला असतां मुलें त्याच्या अंगावर धूळ उडवित आहेत; व तिसरें, तो गाढवावरून खालीं पडत आहे व मुलें त्याला उचलून पुनः बसवित आहेत. हीं तिन्ही चित्रें आनंदीबाईनीं तीन

ठिकाणीं टांगून ठेविलीं. एक ओसरीवर, दुसरें माजघरांत व तिसरें माडीवर. हीं चित्रें पाहून बाळ्याला त्या दिवसाची आठवण होत असे. ओसरीवरील चित्रावर "बाळ्या, गाढव" असें काशीनें लिहिलें होतें; व कोणीं विचारलें ह्मणजे सर्व हकीगत ती सांगत असे. यामुळें, व घरांतील कांहींजण 'बाळ्या गाढव' असें ह्मणत यामुळें, त्याला वाईट वाटे. त्याला या गोष्टीचा राग येत असे; परंतु त्याचा इलाज चालत नसे. त्याला त्वेष येई, परंतु "आह्मी तुला कुठं गाढव ह्मणतों? बाळ्या, गाढव पहा असं आह्मी ह्मणतों; ह्याबद्दल तुला वाईट कां वाटतं?" असें त्याला हिणवीत; ह्मणून बिचाऱ्यास उगीच बसावें लागे. अशा रीतीनें कांहीं दिवस लोटले. आपणास गाढव ह्मणावें हें बाळ्यास आवडलें नाहीं; ह्मणून त्यानें हीं चित्रें काढून टाकण्याविषयीं आनंदीबाईला सांगितलें.

बाळ्याला बरेंच वाईट वाटलें आहे असें पाहून आनंदीबाईंनीं तीं चित्रें काढून टाकिलीं. परंतु ज्या ज्या वेळेस तो मूर्खपणा करी, त्या त्या वेळेस तीं चित्रें त्या पुनः टांगून ठेवीत.

एके दिवशीं यशोदाबाईंच्या मैत्रिणींनीं बागेंत जेवणाचा बेत केला. तेथें यशोदाबाईला जावयाचें होतें, ह्मणून त्या पोषाक करून जाण्याच्या बेतांत होत्या. इतक्यांत माई त्यांच्याकडे धावत धावत गेली व ह्मणाली "आई, आई, मीं चोळीला कशी टीप भरली आहे ती पहा, व मग बाहेर जा."

इतक्यांत बाळ्या हातांत झारी घेऊन पळत आला व आईचा पदर धरून ह्मणाला "आई, अगोदर परसांत चल. मीं हातानें खणून टोमाटोसाठीं कसा छानदार वाफा तयार केला आहे-पहा, कसा मी लाल होऊन गेलों आहें व घामाच्या धारांनीं निथळून गेलों आहें."

हातपाय मातीनें काळे झालेले, तोंड लाल व सर्वांगांतून घामाच्या धारा चालल्या आहेत, असें बाळ्याचें रूप पाहून यशोदाबाई मागें सरल्या; कारण, त्यांनीं उत्तम पोषाक केला होता. त्या ह्मणाल्या "बाळ्या, दुरून बोल. अंगाला झोंबूं नकोस."

इतक्यांत टांगा दारापुढें आला आहे असें सांगण्यास काशी दिवाणखान्यांत आली. तिलाहि दुसरीं चित्रें ठेवून आपण काढलेलीं चित्रें आपल्या आईस दाखविण्याची इच्छा होती. माई ह्मणाली "ताई, दम धर. आईला अगोदर माझें शिवणकाम पाहूं दे, मग तूं आपलं काम दाखीव."

यशोदाबाई माईचें काम पाहत क्षणभर आनंदानें उभ्या राहिल्या; आपणासाठीं मैत्रिणी वाट पाहत बसल्या असतील याचें त्यांला भान राहिलें नाहीं. इतक्यांत टांगेवाला वर येऊन गर्दी करूं लागला. त्याची ती गडबड ऐकून यशोदाबाई चपापल्या व मनांत ह्मणाल्या " काय मी वेडी; मला उशीर झाला नाहीं का ? रमाबाई व राधाबाई मला नांवं ठेवणार नाहींत का ? मला लवकर गेलं पाहिजे. "

परंतु मुलांनां पाहून त्या गोंधळल्यासारख्या झाल्या. त्या पुनः मनांत ह्मणाल्या " मुलं आज किती आनंदांत दिसत आहेत. आपलं काम मला दाखविण्याची त्यांनां उत्कंठा असून तें मला पाहण्याचीसुद्धां फुरसत नाहीं. त्यांनां घरीं टाकून मीं बागेंत जेवण्यासाठीं जाणं मला शोभतं काय ? लोक मला नांवं नाहीं का ठेवणार ? बरं, मला त्यांशिवाय जेवण गोड लागेल का ?"

हे विचार मनांत घोळत असतां, मैत्रिणी नांवें ठेवतील ही गोष्ट लक्ष्यांत येऊन त्या जावयास लागल्या. हें पाहून बाळ्यानें हिरमुसल्यासारखें तोंड केलें. तें पाहून यशोदाबाई ह्मणाल्या " बाळ्या, तूं आनंदीबाईपाशीं ऐस, मी आज लवकर येईन."

यशोदाबाई गेल्यावर मुलें आपआपल्या उद्योगास लागलीं. मुलांनां नवीन खेळ, नवीन चित्रें, अथवा नवीन पोषाक, या योगानें एकदोन दिवस आनंद होतो; परंतु तेंच तें त्यांच्या दृष्टीस पडल्यामुळें त्यांनां त्याचा कंटाळा येतो व त्यांचा आनंद व त्यांची गोडी हीं कायम कशीं ठेवावीं ही पंचाईत पडते. परंतु संवयीच्या योगानें ही अडचण बऱ्याच अंशीं दूर होते. मुलांनां उद्योग करण्याची गोडी लागावी ह्मणून आनंदीबाईनीं कांहीं दिवस मुलांसाठीं निरनिराळीं कामें हुडकून काढिलीं, व जेव्हां त्यांनां गोडी लागत चालली, तेव्हां उद्योग नसला ह्मणजे मनास कसा त्रास होतो हें त्यांनां समजावें, ह्मणून त्यांनां मधून मधून त्या उद्योगाशिवाय ठेवीत. त्यांनां माहीत होतें कीं, मोठीं माणसें थोडा वेळ स्वस्थ बसतात, परंतु मुलांनां उगीच स्वस्थ बसणें ही मोठी शिक्षा वाटते.

कित्येक अज्ञान स्त्रिया मुलांनीं वस्त घेतल्याबरोबर ती त्यांच्या हातची हिसकावून घेतात, त्यांनां रागें भरतात, शिव्या देतात अथवा मारतात.

यामुळें मुलांची वृत्ति क्षुब्ध होते व तीं सांगितलेलें ऐकत नाहींत, हें त्यांनां कळत नाहीं. आनंदीबाई तसें करित नसत. ज्या वस्तु अथवा गोष्टी त्याज्य असतील त्या मुलांच्या नजरेस न पडतील, अशी त्या व्यवस्था करीत. त्यामुळें त्यांनां वारंवार दाबण्याचे व त्यांनीं न ऐकण्याचे प्रसंग कमी येऊं लागले. काशी व माई या समजूतदार होत्या, ह्मणून त्यांनां रागें भरण्याचे प्रसंग वारंवार येत नसत; परंतु बाळ्या मोठा हूड व झोड होता. तो वाटेल त्याची वस्त लुबाडून घेत असे, ह्मणून आनंदीबाईनीं त्याच्या स्वत:साठीं निराळ्या वस्तु घेऊन दिल्या व त्या त्यांस कधीं हात लावित नसत. काशी व माई यांनीं आनंदीबाईचा कित्ता उचलला. त्याहि बाळ्याच्या जिनसांला केव्हांहि हात लावित नसत. यामुळें बाळ्याला आपल्या जिनसांस जपण्याची व दुसऱ्याच्या जिनसांस विचारल्याशिवाय हात न लावण्याची संवय लागत चालली. आपलें व दुसऱ्याचें, असा भेद त्याला समजूं लागला. ह्या गोष्टी मुलांनां कळणें फार महत्त्वाचें आहे. सहिष्णुता व पराङ्मुखता हें कांहीं अंशीं सद्गुणांचें सार होय. हे गुण तरी मुलांचे स्वभावाप्रमाणें समजावयाचे. जीं मुलें थंड, मंद अथवा आळशी असतात त्यांच्यामध्यें सहिष्णुत्व हा मोठासा गुण समजतां येत नाहीं; परंतु जीं तरतरीत, अचपळ व सळो का पळो करून सोडणारीं असतात, त्यांच्यामध्यें सहिष्णुत्व व पराङ्मुखता असणें हा मोठा गुण आहे. कारण, त्यांनां सहन करण्याचे जितके प्रसंग येतात तितके थंड मुलांनां येत नाहींत.

बाळ्या बाहेर जाण्यास फार उत्सुक असे; परंतु आनंदीबाई त्याला शांतपणें उत्तर देत कीं "तुला बाहेर नेलें ह्मणजे तूं न विचारतां दुसऱ्याची जिन्नस उचलून घेतोस, व मला दे, मला दे असं ह्मणतोस; ही तुझी संवय जोंपर्यंत जाणार नाहीं तोंपर्यंत तुला बाहेर घेऊन जाणं बरोबर नाहीं."

हूडपणापासून आपणाला गैरसोय होते, व आपणाला आनंद वाटावा अशी जर आपली इच्छा आहे तर आपणाला कांहीं नियम पाळले पाहिजेत, व आपणहि आपलें कर्तव्य केलें पाहिजे, हें बाळ्याला थोडथोडें समजूं लागलें. हें शिक्षण सामाजिक शिक्षणाचा ओनामा आहे. ज्या वेळेस ही गोष्ट बाळ्याच्या लक्ष्यांत येऊन त्याप्रमाणें त्याचें वर्त्तन दिसून येऊं लागलें, त्या वेळेस प्रतीति पाहण्यासाठीं आनंदीबाई त्याला बाहेर घेऊन जात. बाहेर

निरनिराळे पदार्थ त्याच्या दृष्टीस पडत; परंतु पूर्वीप्रमाणें त्याचा द्वाडपणा नसे, व हें मी घेऊं का, हें पाहूं का, असें विचारल्याशिवाय तो कोणत्याहि जिनसेला हात लावित नसे.

कांहीं दिवसांनीं आनंदीबाईनीं बाळ्याकरितां एक पुस्तक विकत घेतलें. त्यांत इमारतींचीं, यंत्रांचीं वगैरे चित्रें होतीं. तीं चित्रें पाहण्याची बाळ्याला मोठी हौस वाटे; परंतु एका घटकेंत तीं सगळीं केव्हां पाहून टाकीन असें त्याला होई. यामुळें एकाहि चित्राचें स्वरूप त्याच्या लक्ष्यांत येत नसे; ह्मणून आनंदीबाई त्याला रोज एक एक चित्र दाखवीत. त्याला चित्राचें नांव समजून घेण्यासाठीं मधूनमधून माईस किंवा काशीस विचारावें लागे. त्या बहुतकरून सांगत, परंतु केव्हां केव्हां कंटाळा करीत. यामुळें त्याला वाटूं लागलें कीं, आपणास वाचतां आलें पाहिजे. ह्मणून तो आनंदीबाईस ह्मणाला "मावशीबाई, तुह्मी मला वाचण्यास शिकवाल तर मी मोठ्या आनंदानें शिकेन."

मुलाची शिकण्याची इच्छा व आनंदीबाईसारखी शहाणी व आस्थेवाईक शिक्षक असल्यावर काय कार्य होणार नाहीं? थोडेच दिवसांत बाळ्याला साधारण वाचतां येऊं लागलें. तें पाहून घरांतील मंडळीला व यशोदाबाईच्या मैत्रिणींनां आश्चर्य वाटलें. आनंदीबाईचा शिक्षणप्रकार त्यांनां पसंत नसे; चित्रें, यंत्रें व हत्यारें विकत घेणें, कारखान्यांत जाणें वगैरे गोष्टी त्यांनां विलक्षण दिसत. हीं सर्व सोंगें आहेत असें त्या ह्मणत. आनंदीबाई मुलांशीं प्रेमानें वागत हा त्यांनां मूर्खपणा वाटे. त्या ह्मणत "यशोदाबाईस वेड लागत चाललं आहे; हीं मुलं कांहीं दिवसांनीं डोक्यावर बसतील. मुलांच्या इतक्या नादानं चालणं बरोबर नाहीं."

आह्मीं वर सांगितलेंच आहे कीं, आनंदीबाई बाळ्यास चाकरनोकर अथवा अशिक्षित लोक ह्यांबरोबर सहवास ठेवूं देत नसत. परंतु यामुळें त्यांनां वाईट वाटे.

बाळ्याची शेंडी बरेच दिवसांत न विंचरल्यामुळें तिच्या जटा झाल्या होत्या. यशोदाबाईला मुलाची शेंडी विंचरणें, मुलींची वेणी घालणें, मुलांनां स्नान घालणें, वगैरे गोष्टींचा मोठा कंटाळा असे. बाळ्याची शेंडी विंचरण्याचें अथवा मुलींची वेणी घालण्याचें कारण पडलें, तर त्या त्यांचे केश खसाखसा विंचरीत. यामुळें मुलेंहि त्यांच्याकडे जाण्यास कंटाळा करीत. हें काम बहुतकरून

यशोदाबाईंची एक मामेबहीण करित असे; परंतु पूर्वीप्रमाणें मुलें तिच्याकडेहि जात नसत, ह्मणून तिला वाईट वाटत असे. एके दिवशीं बाळ्याला तिनें बोलावून ह्मटलें "बाळ्या, चल ये इकडे, तुझ्या आनंदीबाईंची परवानगी असेल तर मी तुझी शेंडी विंचरत्यें."

यशोदाबाईंची ही मामे बहीणहि थोडीशी शिकलेली होती. तिचें नांव वेणूबाई. आनंदीबाई येण्यापूर्वी वेणूबाईच मुलांची व्यवस्था पाहत असत व त्यांचा मुलांनां थोडासा लळाहि होता. परंतु आपणापेक्षां आनंदीबाईंचें प्रस्थ जास्त असावें हें त्यांनां बरें वाटलें नाहीं; ह्मणून मुलांची व्यवस्था पूर्ववत् करावयास लागावें या हेतूनें त्यांनीं वर सांगितल्याप्रमाणें बाळ्याला केश विंचरण्यासाठीं हांक मारिली व प्रथम आनंदीबाईंची निंदा करण्यास प्रारंभ केला. बाळ्याला ह्या निंदेचा हेतु जरी समजला नाहीं, तरी वेणूबाईपेक्षां आनंदीबाई विशेष प्रेमानें वागवितात हें त्याला माहीत होतें, ह्मणून त्याला त्यांच्या ह्मणण्याचा राग येऊन त्यानें उत्तर केलें " तुमच्यापेक्षां आनंदीबाई पुष्कळ बऱ्या आहेत. तुम्ही माझे केश विंचरूं नका; मला वाटेल तर मीच विंचरीन ! " असें ह्मणून तो तडक आपल्या आईकडे गेला.

बाळ्याची मुद्रा रागीट दिसत होती, ह्मणून यशोदाबाईंनीं काय झालें ह्मणून विचारिलें. आनंदीबाई तेथें होत्या, ह्मणून बाळ्या थोडासा गोंधळल्यासारखा झाला. परंतु आनंदीबाईंच्या कानांवर थोडेसे शब्द आले होते, ह्मणून त्यांनीं त्याच्या रागाचें कारण ताडिलें व बाळ्यास वेणूबाईकडे जाऊं देण्यास आपण सवड दिली हें बरें केलें नाहीं, असें त्यांला वाटूं लागलें.

हा सर्व प्रकार ऐकून वेणूबाईस अधिकच वाईट वाटलें, व त्यांनीं आनंदीबाईंस घरांतून घालविण्याचा विचार मनांत आणला. त्या शेजारणींपाशीं बोलत असत "घरांत यजमानीण काय त्या आनंदीबाई ! मुलींनां वाटेल तेव्हां त्या बाहेर घेऊन जातात, वाटेल तेव्हां परत येतात व त्यांनां वाचावयास व लिहावयास शिकवितात. अशा कृतीनं त्या शिरजोर होतील, सासुसासऱ्यांचं ऐकणार नाहींत, फार काय, नवऱ्याचीसुद्धां भीड धरणार नाहींत. आनंदीबाई घरांत शिरल्यापासून मुली बिघडत चालल्या आहेत ! त्यांचं ठीक चिन्ह दिसत नाहीं."

खरोखर पाहतां, अशा स्थितींत राहण्यापेक्षां आपण कोठें तरी जावें हें बरें, असें त्यांनां वाटे; परंतु जावें कोठें, असा विचार मनांत येऊन व यशोदाबाईंच्या

घरासारखें घर मिळावयाचें नाहीं ही गोष्ट मनांत येऊन, त्यांनीं आनंदीबाईसच घालवून देण्याचा विचार केला. ही गोष्ट आनंदीबाईस माहीत नव्हती. त्यांचा रोजचा क्रम चालू होता. एके दिवशीं काशी व माई पुस्तक वाचित होत्या व आनंदीबाई ऐकत होत्या. इतक्यांत यशोदाबाई तेथें आल्या. आईस पाहून मुली थांबल्या. कारण, त्यांनां वाटलें कीं, आईस कदाचित् ऐकण्याचा कंटाळा येईल; परंतु यशोदाबाईनीं त्यांनां वाचावयास सांगितल्यावरून त्या मोठ्या आनंदानें वाचूं लागल्या. यशोदाबाई तें लक्ष्यपूर्वक ऐकत होत्या. मुलींमध्यें सुधारणा झालेली पाहून त्या ह्मणाल्या " आनंदीबाई, मी तुमची फार ऋणी आहें. काशी इंग्रजी चांगलं वाचत्ये. माईस मी इतके दिवस मंद समजत होत्यें, परंतु तसा प्रकार नसून तिच्या शिक्षणाची प्रथमपासून मीं योग्य तजवीज ठेविली असती, तर ती खरोखर चांगलं शिकली असती. "

हें ऐकून दोन्ही मुली ह्मणाल्या "आई, मावशीबाई एकूण तुला आवडतात?"

'मावशीबाई खरोखर'—हे शब्द मुलींच्या तोंडांतून निघतांच यशोदाबाई ह्मणाल्या "आनंदीबाई, पाहिलंतना, तुह्मांवर माझ्या मुलींचं किती प्रेम आहे तें? परंतु याबद्दल मला बिलकूल वाईट वाटत नाहीं."

हें ऐकून आनंदीबाईस संतोष झाला; परंतु मुलांचें प्रेम आईबापांपेक्षां दुसऱ्यावर जास्त असणें ही गोष्ट इष्ट नाहीं; शिवाय, ही गोष्ट पुष्कळ आईबापांस आवडत नाहीं; ह्मणून त्यांनीं यशोदाबाईच्या मनांतील मत्सरभाव दूर केला. आपण व यशोदाबाई एके ठिकाणीं असतां आपणापेक्षां मुलांचें लक्ष्य आईकडे विशेष असावें, ह्मणून त्यांनीं मुलींस चित्रकाम व शिवण काम यशोदाबाईस दाखविण्यास सांगितलें. असें करण्याचा हेतु यशोदाबाईस समजला किंवा नाहीं हें सांगतां येत नाहीं. कारण, सभ्यपणामुळें कित्येक वेळां मनांतील विचार बोलून दाखवितां येत नाहींत. हे विचार कालांतरानें कळून येतात.

मुलांचें काम पाहून यशोदाबाईस समाधान वाटलें. जों जों त्यांचें लक्ष्य मुलांकडे लागत चाललें, तों तों त्यांच्याविषयीं मुलांचें प्रेम वाढत चाललें. यामुळें घरीं राहून जें सुख होतें, त्याचा त्यांनां थोडाथोडा अनुभव येत चालला, व मैत्रिणींबरोबर उगीच भटकत फिरण्याचा कंटाळा वाटूं लागला.

यशोदाबाईंत जो हा बदल झाला, त्याचें कित्येकांनां आश्चर्य वाटेल. कित्येक ह्मणतील कीं, अद्याप आमच्या स्त्रियांची स्थिति सुधारली नाहीं, तेव्हां आनंदीबाईंचे अंगीं कांहीं विलक्षण सामर्थ्य असल्याशिवाय मुलांमध्यें व यशोदाबाईमध्यें असा बदल होणार नाहीं. आमचें ह्मणणें काल्पनिक आहे, असेंहि कित्येकांनां वाटेल ! परंतु थोडा विचार केला असतां, अथवा थोडा अनुभव घेतला असतां, यांत कांहीं विलक्षण अथवा काल्पनिक नाहीं, असें दिसून येईल. इतकेंच कीं, हल्लीं जो शिक्षणप्रकार अथवा संगोपनप्रकार चालू आहे, त्यांत थोडासा बदल केला पाहिजे. आनंदीबाईंनीं कांहीं विलक्षण उपाय योजिले, असें नाहीं. काशीची स्मरणशक्ति चांगली होती, यामुळें पाठांतर करण्याकडे तिचें लक्ष्य असे. पाठ केलेल्या गोष्टी सदोदित सारख्या कायम राहत नाहींत, यामुळें ज्ञान वरवर असतें व वरवर माहितीचा चांगला उपयोग होत नाहीं. अशा प्रकारची माहिती मिळविण्याविषयीं मुलांची इच्छा जितकी कमी असेल तितकें चांगलें. हें समजून आनंदीबाईंनीं काशीची विचारशक्ति जागृत केली. त्या तिच्याकडून करमणुकीचीं परंतु बोधपर पुस्तकें वाचून घेत असत. थोर कवींच्या निवडक उक्ति, थोर पुरुषांच्या व स्त्रियांच्या चरित्रांतील उत्तम वेंचे व पुरुषांच्या भाषणांतील निवडक वेंचे हे तिला नेहमीं वाचून दाखवून त्यांचा अर्थ समजून सांगत.

माई वाचावयास, लिहावयास अथवा शिवावयास बसली असतां आनंदीबाई सर्व काम एकीकडे ठेवून तिच्याकडे लक्ष्य देत. तिनें थोडेंसें चांगलें वाचलें असतां त्या तिला शाबासकी देत. अशा रीतीनें उत्तेजन देत देत त्यांनीं माईस इतकें भासविलें कीं, एखाद्या गोष्टींत यश संपादन करण्यास विलक्षण बुद्धि असली पाहिजे, असेंच केवळ नाहीं.

एके दिवशीं गोगलगाय भिंतीवर चढत होती. ती वर जाई व खालीं घसरे. तिच्याकडे आनंदीबाई पाहत बसल्या ह्मणून माईहि पहावयास लागली. हा क्रम आनंदीबाईंनीं पांचसहा दिवस चालविला. सहावे दिवशीं गोगलगाय भिंतीवर बारा फूट गेली होती. तें पाहून माई ह्मणाली "मावशीबाई पहा, ही गोगलगाय किती उंच गेली आहे!"

त्यावर आनंदीबाईंनीं उत्तर केलें "माई, तूंच पाहिलंसना, गोगलगाय घसरत खालीं येत होती, तथापि ती तशीच नेट धरून रोज थोडीथोडी वर जात

जात सहावे दिवशीं बारा फूट वर गेली ! ह्यावरून तुला ही गोष्ट कळून येईल कीं, गोगलगाईसारख्या यःकश्चित् प्राण्यास रोज थोडेंथोडें जाऊन शेवटीं पुष्कळ वर जातां येतें, तर मनुष्य कितीहि मंद असला तथापि तो जर रोज थोडेंथोडें स्थिरपणें काम करील तर त्याला शेवटीं यश आल्यावांचून रहाणार नाहीं ! मग, ज्याला बुद्धि आहे तो जर स्थिरपणें काम करील, तर त्याच्या हातून मोठमोठालीं कृत्यें होतील हें सांगावयास नको ! "

गोगलगाईसारख्या प्राण्यांचीं उदाहरणं ज्या ज्या वेळेस दिसून येत त्या त्या वेळेस आनंदीबाई माईच्या अथवा दुसऱ्या मुलांच्या मनांत कांहीं नवीन कल्पनेचा अंकूर उत्पन्न करीत. त्यांना माहीत होतें कीं, योग्यकालीं प्रत्यक्ष उदाहरणें दाखविल्यानें नवीन कल्पना चांगली ठसते, व अशा रीतीनें शिक्षण देण्याविषयीं यत्न करणें हें फार श्रेयस्कर असतें.

माईस एक वाईट खोड असे. ती ही कीं, लिहावयास लागली असतां ती वांकून बसत असे. ही गोष्ट आनंदीबाईच्या लक्ष्यांत आली. ही संवय पुष्कळ मुलांस असते. ही संवय वाईट आहे, असें समजून त्या माईस ह्मणाल्या "माई, वांकून कधीं लिहूं नये."

हें ऐकून बाळ्या ह्मणाला " मावशीबाई, कां बरें ? "

काशी ह्मणाली "अरे, वांकून बसण्यानं पोंक येतं. नाहीं हो मावशीबाई ?"

आनंदीबाई म्हणाल्या "वांकून बसण्याची अथवा लिहिण्याची संवय असली तर पोंक येतं हें तर खरंच; परंतु वांकून लिहित न बसण्याचं दुसरं कारण आहे."

काशीनें विचारिलें " दुसरं कारण कोणतं ? "

आनंदीबाई ह्मणाल्या "पाण्यानं अंग स्वच्छ होतं, हें तुम्हांला माहीत आहे. त्याचप्रमाणं हवेनं शरीराच्या आंतील भाग स्वच्छ होतो. पोटांत हवा गेली असतां घाणेरडा अंश जाऊन आंतील भाग स्वच्छ होतो. पाण्यानं बाहेरचा व हवेनं आंतला भाग स्वच्छ होणं, हें हवा व पाणी ह्यांपासून मोठं कार्य होतं."

काशीनें विचारिलें " पण हवेचा आणि वांकून बसण्याचा काय संबंध ?"

आनंदीबाई ह्मणाल्या "माझं बोलणं संपलं नाहीं, तोंच तूं प्रश्न विचारण्यास सुरुवात केलीस."

हें ऐकून काशी थोडीशी लाजली. नंतर आनंदीबाई ह्मणाल्या " हवेचा व वांकून बसण्याच्या सवईचा निकट संबंध आहे. पाण्यानं अंग स्वच्छ होतं, परंतु पुष्कळ पाण्याची जरूरी असते. त्याचप्रमाणं हवेनं आंतला भाग स्वच्छ होतो, परंतु पोटांत पुष्कळ हवा गेली पाहिजे. वांकून बसल्यानं कमी हवा पोटांत जाते. "

" ती कशी ? "

" हा पहा स्पंज. हा दाबला, तर ह्यांत जास्त पाणी राहील, किंवा नं दाबतां ताठ ठेविला तर पाणी जास्त राहील ?"

" ताठ ठेविला तर जास्त पाणी राहील. "

" हीच गोष्ट तंतोतंत आपल्या शरीरासहि लागू आहे. ज्या इंद्रियांच्या योगानं आपण श्वासोच्छ्वास घेतों तीं फुफ्फुसं होत. हीं फुफ्फुसं स्पंजासारखीं असतात. ज्याप्रमाणं स्पंज दाबला नाहीं ह्मणजे त्यांत जास्त पाणी राहतं, त्याप्रमाणं फुफ्फुसं दाबलीं नाहींत ह्मणजे त्यांत जास्त हवा राहते व त्यामुळं रक्त चांगलं शुद्ध होतं. ह्मणून लिहितांना किंवा दुसरं काम करतांना वाकूं नये, ताठ बसून काम करणं चांगलं. निजतांनाहि उरावर पडून निजूं नये असं ह्मणतात, त्याचंहि हेंच कारण आहे."

एके दिवशी मंडळी बसली असतां आनंदीबाईनीं मुलांनां पुढील हिशेब विचारला. " समजा, एक वाटसरू रोज पांच कोस जातो व चार कोस परत माघारा येतो; तेव्हां त्यानें दहा दिवसांत किती प्रवास केला? "

या प्रश्नाचें उत्तर काशीला व बाळ्याला सांगतां आलें नाहीं. माईनें हळूच आनंदीबाईच्या कानांत सांगितलें. तें बरोबर होतें. त्यावरून आनंदीबाईनीं असे आणखी प्रश्न विचारले. त्यांपैकीं बहुतेकांचीं उत्तरें माईनें बरोबर सांगितलीं. काशीला तितकीं सांगतां आलीं नाहींत. त्यावरून आनंदीबाईस कळून आलें कीं, माईस गणित शिकविलें असतां त्यांत तिची बरीच मति चालेल.

वर ज्या प्रकारचे हिशेब सांगितले,त्या प्रकारचे हिशेब मुलांस शिकविण्याचें महत्त्व थोड्याच आईबापांस माहीत असतें, ह्मणून ते त्यांकडे तादृश लक्ष्य देत नाहींत. मुलांनीं हिशेब शिकावेत, परंतु मुलींनां शिकून काय करावयाचें आहे ? असा त्यांचा समज असतो. परंतु हें शिक्षण गणिताशिक्षणाचा पाया असून

या योगानें मुलांची बुद्धि विकास पावते, हें त्यांच्या लक्ष्यांत न येऊन त्यांचें त्याकडे दुर्लक्ष्य होतें.

मुलांच्या बुद्धीचा विकास व्हावा, परंतु मुलींच्या बुद्धीचा विकास होऊन काय करावयाचें आहे ? मुलें व्यापारी व्हावयाचीं असतील तर त्यांनीं हिशेब शिकावेत, एरव्हीं त्यांनां काय करावयाचें आहे ? अशी आनंदीबाईची समजूत नव्हती. व्यवहारांत पुरुषांनां व स्त्रियांनां हिशेबाचें कारण वारंवार पडतें, हें त्यांनां अनुभवावरून माहीत होतें. ह्मणून त्यांनीं माईस थोडेंसें गणिताशिक्षण दिलें. माईची गति गणितांत होऊं लागली, तेव्हां आनंदीबाई माईस ह्मणाल्या " ज्या गोष्टी तुझ्या ताईस कठीण वाटतात त्या ज्या अर्थी तुला समजतात, त्या अर्थी तिला ज्या कठीण वाटत नाहींत त्या कांहीं दिवसांनीं तुला समजूं लागतील, हें उघड आहे. "

यावर माईनें कांहींच उत्तर केलें नाहीं.

नंतर काशी ह्मणाली " मावशीबाई, आईच्या मैत्रिणी मला हुशार ह्मणतात, परंतु माईनें ज्या प्रश्नांचीं उत्तरं दिलीं त्यांचीं मला देतां आलीं नाहींत. माईला कांहीं यायचं नाहीं, असं मला वाटत होतं; परंतु तिची बुद्धि स्थिर आहे. तिला समजावयास थोडा उशीर लागतो, परंतु एखादी गोष्ट तिला समजून सांगितली असतां ती ती विसरत नाहीं; तींत ती आपली मति चालविते. "

आनंदीबाईनीं कांहींएक उत्तर दिलें नाहीं. उभयतां बहिणींमध्यें मत्सरभाव उत्पन्न न होतां त्या एकमेकींस मदत करतील, व परस्परांविषयीं उभयतांचें मन शुद्ध राहील, अशा प्रकारें उभयतांचे उद्योगाविषयीं त्यांनीं योजना केली.

आनंदीबाई बाळ्यास शेजारपाजारच्या मुलांत फारशा मिसळूं देत नसत. या वयांत मुलांनां फारसें कळत नसतें. मनाचें आकलन करणें व दुसऱ्यां-बरोबर आपण सहवास केला असतां आपलें कर्तव्य काय, वगैरे गोष्टी त्यांनां माहीत नसतात; ह्मणून त्यांनां कारणाशिवाय एकत्र ठेवणें प्रशस्त नसतें. तीं परस्परांपासून जितकीं दूर असतील, तितकें चांगलें. ज्या वेळेस तीं सारख्या वयाचीं नसतात, किंवा त्यांचे व्यवसाय भिन्न असतात, त्या वेळेस तर होतां होईल तितकें करून त्यांनां दूर ठेवणें इष्ट असतें, हें आनंदीबाईस माहीत होतें; ह्मणून त्यांनीं त्याप्रमाणें व्यवस्था ठेविली होती. यामुळें घरांत

बाळ्याचेसंबंधानें कलागती येण्याचे व त्यामुळें त्याला आईच्या हातचा मार खाण्याचे प्रसंग कमी येऊं लागले. बाळ्याच्या मागें बागेचा उद्योग होताच. त्याला आतां वाचतां येऊं लागलें होतें, ह्मणून तो कांहीं वेळ वाचित असे. आनंदीबाई त्याला बाळमित्र व इसापनीतींतील गोष्टी सांगत असत. गोष्टींच्या द्वारें बोध करण्यास मोठें साधन असतें. कोणत्या गोष्टी सांगावयाच्या व त्यांचें पर्यवसान काय, हें मात्र लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. गोष्टी सांगावयाच्या त्या केवळ करमणुकीकरितां नसून बोध करण्यासाठीं सांगावयाच्या, हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. एकदा मुलें जमलीं असतां आनंदीबाईनीं त्यांनां एक गोष्ट सांगितली. ती अशी:—

" हैदराबाद येथें अमीरखां या नांवाचा एक गृहस्थ राहत असे. तो घरचा श्रीमंत असून त्याला शिकारीचा फार नाद होता. एके दिवशीं तो आपल्या मित्रमंडळीसह शिकारीस गेला. तेथें त्याच्या दृष्टीस एक हरिण पडतांच त्यावर त्यानें गोळी घातली. परंतु गोळी चुकून हरिण निसटलें. हरणाला मारल्याशिवाय घरीं परत जावयाचें नाहीं, असा अमीरखां यानें निश्चय केला व तो बरोबर कुत्रें घेऊन हरणामागें लागला. त्याच्याबरोबरची मंडळी मागें राहिली. बराच वेळ झाला, तथापि हरिण सांपडलें नाहीं, ह्मणून खांसाहेबाची तब्यत गेली. खांसाहेब हरणामागें जात असतां समोरून येत असलेला रामा नांवाचा एक मुलगा त्यांनां दिसला. रामाच्या मुद्रेवरून तो शांत परंतु दृढनिश्चयी मुलगा असावा, असें दिसत होतें. 'तूं हरिण पाहिलेंस का?' ह्मणून खांसाहेबानें रामाला विचारिलें. रामानें हरिण पाहिलें होतें, व तें कोठें लपून राहिलें होतें हेंहि त्याला माहीत होतें. ह्मणून त्यानें 'होय' ह्मणून सांगितलें. अमीरखां ह्मणाला 'तर मग सांग लवकर ?' त्यावर रामानें उत्तर केलें ' मीं हरिण पाहिलें आहे व तें कोठें आहे हेंहि मला माहीत आहे; परंतु तें सांगणें मला बरें वाटत नाहीं.' हें रामाचें उत्तर ऐकून खांसाहेबाची मर्जी गेली. त्यानें रामावर चाबूक उगारला; परंतु रामा शांत उभा राहिला. हें पाहून खांसाहेबास अधिकच राग आला. तो ह्मणाला 'सांग,नाहीं तर तुला चाबकानें मारतों !' रामानें गंभीरपणें उत्तर केलें ' साहेब, तुह्मी कांहीं करा, परंतु मी विश्वासघात करणार नाहीं. हरिण गरीब प्राणी आहे. कसाहि प्रसंग आला, तथापि विश्वासघात करूं नये. कारण, विश्वासघात करणें अधमपणाचें काम आहे, असें माझ्या बापानें मला सांगितलें.

आहे.' हें ऐकून खांसाहेब संतापला व ह्मणाला 'तुला कसें बरें वाटत नाहीं तें पाहतों!' असें ह्मणून त्यानें रामाच्या पाठीवर दोनचार चाबूक ओढिले. परंतु रामानें कांहीं उत्तर केलें नाहीं. ह्मणून खांसाहेब आणखी मारण्याच्या बेतांत होता, इतक्यांत मागील मंडळी तेथें येऊन पोंहोंचली व त्यांपैकीं एका सुज्ञ मनुष्यानें खांसाहेबाची फजिती करून रामास सोडविलें."

कांहीं दिवस लोटल्यावर आनंदीबाईंनीं बाळ्यास आणखी एक गोष्ट सांगितली. ती अशी:—

"कोंकणांत गुहागर येथें एक सुखवस्तु गृहस्थ राहत होता. त्याला कृष्णा ह्मणून एक मुलगा होता. कृष्णाला साधारणपणें थोडेंसें शिक्षण मिळालें होतें, परंतु शिकण्याकडे त्याचें फारसें लक्ष्य नव्हतें. त्याला पोहतां येत असे. वेळ सांपडला ह्मणजे तो समुद्रावर जात असे. त्याच्या मनांत खलाशी होऊन दूरदेशीं जावें, अचाट कृत्यें करून पैसे मिळवावे, व शेफर्ड कंपनीस धुळीस मिळवावें, असें आलें. ही गोष्ट बापाला समजतांच त्याला फार वाईट वाटलें. त्यानें कृष्णास सांगितलें कीं 'साहसकर्में करून उदयास येणें हें आपणासारख्या गरीब लोकांस नको. मध्यम स्थितीसारखी दुसरी उत्तम स्थिति नाहीं. तुला कोणत्याहि गोष्टीचें कमी नाहीं. कायद्याचा अथवा वैद्यकीचा अभ्यास कर, अथवा धंद्याचें शिक्षण देण्यासाठीं मुंबईंत एक नवीन विद्यालय स्थापन झालें आहे त्यांत जाऊन अभ्यास कर.' परंतु बापाचें ह्मणणें कृष्णाला रुचलें नाहीं. त्यानें बाहेर जाण्याविषयीं आईपाशीं गोष्ट काढिली. आईचाहि रुकार त्याला मिळाला नाहीं. तेव्हां त्यानें गुपचुप पळून जाण्याचा निश्चय केला. त्याचा मित्र जहाजांत बसून वेंगुरल्यास जाणार होता, त्यानें 'प्रवासाबद्दल कांहींएक पडणार नाहीं' अशी कृष्णाला लालूच दाखविली. कृष्णाच्या मनांत जाण्याचें आलें. परंतु बंदर सोडून तो गेला नाहीं, तोंच तुफान झालें व मरतों कीं काय, असें त्याला वाटलें. त्याचें तारूं जेमतेम पुढच्या बंदराला लागलें. तेथून कृष्णा घरीं परत आला. कांहीं दिवसांनीं त्याच्या मनांत पुनः वेड शिरलें. आईनें व बापानें त्याला पुष्कळ प्रकारें सांगितलें, परंतु कांहीं केल्या त्याच्या डोक्यांतील तें वेड जाईना. मुलाचें चिन्ह ठीक नाहीं, हें मनांत येऊन कृष्णाच्या बापास फार वाईट वाटे. आपण मिळविलेली अब्रू व कवडी कवडी करून जोडलेला पैसा

हा पोरगा घालविणार, हें समजून त्याला पराकाष्ठेचें दुःख होई. जर त्याला कमजास्त बोलावें, तर तो उठून निघून जाईल व लोकांचें हंसूं होईल, याबद्दल त्याला भय वाटे. अल्प वयांत आपण त्याचें लग्न करून दिलें नसतें तर बरें होतें, असेंहि त्याला वाटूं लागलें. कारण, पोरीची वाट काय करावी, ही विवंचना त्याच्या मनांत उभी राही. कांहीं दिवस जाऊं दिल्यावर कृष्णानें आईपासून कांहीं निमित्त करून पैसे घेतले व तो जहाजांत बसून निघून गेला. परंतु पूर्वींप्रमाणें त्याला तुफान लागून जहाज बुडण्याच्या बेतांत आलें. सर्वांची पांचांवर धारण बसली. कांहींनीं पाण्यांत उड्या टाकिल्या, त्यांत कृष्णानेंहि उडी टाकिली. ज्याला जिकडे वाट फुटली तिकडे तो पोहत गेला. या वेळेस कृष्णाला बापाच्या ह्मणण्याची आठवण झाली; परंतु उपयोग काय ! कृष्णाचें काय झालें, हें त्याच्या आईबापांस समजलें नाहीं. आज येईल, उद्यां येईल, या आशेवर बापानें तीन वर्षें काढिलीं. शेवटीं त्याची निराशा होऊन व भावी स्थिति लक्ष्यांत येऊन तो दिवसेंदिवस खचत चालला व पुढें थोड्याच दिवसांनीं मरण पावला. ”

या दोन गोष्टींपैकीं बाळ्यास पहिली गोष्ट आवडली, हें पाहून खरा निश्चय व दुराग्रह अथवा हट्ट यांमध्यें भेद काय, हें बाळ्याला समजून सांगण्याचा आनंदीबाईनीं विचार केला. बाळ्याचा स्वभाव हट्टी असे, हें आह्मीं मागें सांगितलेंच आहे; परंतु तो आनंदीबाईपाशीं हट्ट करित नसे. कारण, ज्या गोष्टी त्याला आवडत नसत त्या आनंदीबाई त्याला करावयास लावित नसत. ज्या त्याला आवडत असत त्याच करावयास सांगत. असें करण्यांत आनंदीबाईचा हेतु हा होता कीं, प्रथम त्याला हट्ट करण्याचे प्रसंग कमी येऊन त्याची वाईट खोड जावी. बाळ्याला चांगली संवय लागावी ह्मणून त्याच्यापुढें त्या चांगल्या व नवीन गोष्टी ठेवीत.

आनंदीबाईनीं बाळ्याला खरा निश्चय व हट्ट यांमध्यें भेद काय आहे हें त्याच्या लक्ष्यांत येण्यासाठीं त्याला वरील दोन्ही गोष्टी सांगितल्यावर त्या ह्मणाल्या “ बाळ, तुला रामाचं करणं बरं वाटतं, का कृष्णाचं करणं बरं वाटतं ? ”

बाळ्यानें उत्तर केलें “ मावशीबाई, मला पहिली गोष्ट फार आवडली. हरिण कोणीकडे गेलें हें रामानें त्या दुष्ट खांसाहेबास सांगितलें नाहीं हें फार

चांगलें केलें. रामानें मार खाल्ला, परंतु त्याच्या मनांत जें सांगावयाचें नव्हतें तें त्यानें सांगितलें नाहीं; ह्मणून तो फार चांगला मुलगा. मावशीबाई तुह्माला नाहीं का तो आवडत ?"

आनंदीबाई ह्मणाल्या "रामा मला आवडतो; परंतु तूं जें कारण सांगितलंस त्यासाठीं नाहीं!"

बाळ्या आवेशानें म्हणाला "काय! तो तुह्माला आवडत नाहीं? त्यानें गरीब प्राण्याचा जीव वांचविला, स्वतः मार खाल्ला, परंतु विश्वासघात केला नाहीं. इतकें असूनहि तो तुह्माला आवडत नाहीं?"

काशी आणि माई यांनांहि स्वस्थ रहावेना. त्या दोघींनीं एकदम विचारलें "मावशीबाई, बाळ्यानं जें उत्तर दिलं तें तुम्हाला आवडलं नाहीं?"

आनंदीबाई म्हणाल्या "मला बाळाचं उत्तर आवडलं नाहीं, असं मी ह्मणत नाहीं. तुम्ही प्रथम स्वस्थ बसा व मी काय म्हणत्यें तें सर्व ऐकून घ्या."

आनंदीबाईच्या तोंडचे हे शब्द ऐकून बाळ्या आनंदानें म्हणाला "मग माझें उत्तर तुम्हाला आवडलें?"

आनंदीबाई म्हणाल्या "होय, रामा मला आवडतो; परंतु गरीब प्राण्याचा विश्वासघात करणं मला आवडत नाहीं असं तो म्हणाला, म्हणून मला आवडतो. त्याच्या मनांत जें सांगावयाचं नव्हतं, तें त्यानं सांगितलं नाहीं, म्हणून तो चांगला मुलगा असं मी समजत नाहीं. कोणत्याहि मनुष्याचं कृत्य बरं किंवा वाईट हें समजण्यापूर्वीं, त्याचा निश्चय होण्यास कोणतीं कारणं आहेत हें मी समजून घेत्यें. एखादं कृत्य करणं बरं किंवा वाईट वाटतं, हें योग्य कारण नाहीं. नुसतं बरं वाटतं किंवा वाटत नाहीं या ह्मणण्यांत अर्थ नाहीं. बरं वाटण्यास अथवा न वाटण्यास काय कारणं आहेत हें समजलं पाहिजे."

बाळ्या म्हणाला "रामानें जें कारण सांगितलें तें बरोबर होतें व त्याचें वर्तन धैर्याचें होतें; तेव्हां तो चांगला मुलगा आहे."

आनंदीबाई म्हणाल्या "होय. योग्य कारण असून जे निश्चयी असतात त्यांची नेहमीं प्रशंसा करणं योग्य आहे; परंतु जे आपण अमुक कृत्य कां करतों, याचीं कारणं न सांगतां आह्मांला हें करणं बरं दिसतं, एवढं ह्मणून करावयास लागतात, त्यांचं वर्तन तिरस्कारास पात्र असतं."

यावर काशी म्हणाली " बाळ्या, ऐकलंस ना ? तूं नेहमीं ह्मणत असतोस कीं, मी हें करणार, मी तें करणार; मला हें आवडत नाहीं, तें आवडत नाहीं; याच बोलण्याचा मला नेहमीं राग येतो. "

यावर आनंदीबाई म्हणाल्या " काशी, तुला नेहमीं राग येतो म्हणून बाळ कारण सांगत नसेल. तुला नेहमीं राग येणार नाहीं, तर तो कदाचित् केव्हां केव्हां कारण सांगेल. "

बाळ्या ह्मणाला " होय. माझें कारण नेहमीं बरोबर असतें; परंतु तें सांगणें मला आवडत नाहीं. "

आनंदीबाई ह्मणाल्या " तर मग तुझ्या बहिणीस तुझें कृत्य नेहमीं आवडत नाहीं, यांत तिचा दोष नाहीं. "

बाळ्या म्हणाला " नाहीं. पण मला कारण सांगत बसणें आवडत नाहीं. क्षुल्लक गोष्टींमध्यें काय कारण सांगायचें आहे? दुपारीं जेवण झाल्यावर घोडा घोडा खेळूं, चेंडू खेळूं, आपण आतां चित्रें पाहूं, यांत कारण काय सांगायचें आहे ? "

आनंदीबाई म्हणाल्या " तूं ह्मणतोस तें खरं आहे. क्षुल्लक गोष्टींत निश्चय करण्यांत शहाणपणा नाहीं; परंतु शहाणे लोक क्षुल्लक गोष्टींत हेटकपणा करित नाहींत."

बाळ्या ह्मणाला " मावशीबाई, आई, ताई, व वेणुबाई मला हट्टी ह्मणत असत; परंतु तुह्मी आल्यापासून मी हट्ट करतों का? वेणुबाई मला नेहमीं रागें भरत असत, माझ्या अंगावर येत असत, म्हणून मी हट्ट करित असें. तुह्मी माझ्याशीं गोड बोलतां, ह्मणून मी तसें वागतों. "

आनंदीबाई म्हणाल्या " बाळ ! मनुष्यांला काय, किंवा पशुपक्ष्यादि प्राण्यांला काय, वागविण्याचे दोन प्रकार आहेत. प्रेमानं व सक्तीनं. ज्यांनां विचार आहे अथवा जे गरिबीनं वागतात, त्यांनां प्रेमानं वागविणं हें चांगलं. ज्यांनां बिलकूल विचार नाहीं, अथवा जे विचाराचा उपयोग करित नाहींत, त्यांनां प्रथम गोडीनं वागवून पहावं; परंतु त्यापासून जर उपयोग होत नाहीं असं दिसून येईल, तर त्यांनां सक्तीनं वागविणं जरूर आहे."

यावर बाळ्या म्हणाला " मला जुलमानें वागवून घेणें आवडत नाहीं."

आनंदीबाई म्हणाल्या " तर मग तुला विचारानं वागलं पाहिजे; म्हणजे तुला कोणी सक्तीनं वागविणार नाहीं व हट्टी म्हणणार नाहीं. तूं क्षुल्लक गोष्टीसाठीं हट्ट धरून बसतां कामा नये."

" पण अमुक गोष्ट विचाराची अगर अविचाराची हें मला कसें समजावें ?"

" हें तुला समजायचं नाहीं हें खरं आहे; परंतु हें तुझ्यापेक्षां वडील माणसांना समजतं; म्हणून तीं सांगतील तें तूं ऐकत जा. तुझं हित कशांत आहे हें त्यांनां चांगलं समजतं. त्यांचं ऐकिलं असतां तुझं कल्याण आहे. तूं कृष्णासारखा भलत्याच कामांत आपलाच हट्ट धरून बसलास तर तुला सुख होणार नाहीं."

" पण वेणुबाई मला नेहमीं नेहमीं गाढव म्हणतात. मी गाढव आहें का ? गाढवाला देखील नीट वागविलें तर तें चांगलें असतें. बरें मावशीबाई, याविषयीं मी तुम्हाला गोष्ट वाचून दाखवूं का ? तीं कोणत्या पुस्तकांत आहे हें मला माहीत आहे."

असें म्हणून बाळ्यानें टेबलावरील एक पुस्तक उघडून गोष्ट वाचिली व तो म्हणाला " मावशीबाई ! मी गाढव आहें का ? बरें तें असो. वेणुबाईंनीं मला सांगितलें कीं, तुझ्या केंसांच्या जटा झाल्या आहेत व पाय फुटले आहेत; तेव्हां तुझे केंस विंचरण्यास व पाय घासण्यास आईनें सांगितलें आहे. मला तिच्याकडे जाणें आवडत नाहीं; परंतु आईची इच्छा आहे म्हणून मी जातों. तुम्ही येतां का ? पहा मी कसा गप्प बसतों तो."

आपल्या उपदेशाचा आपल्या शिष्याच्या मनावर कितपत ठसा उमटला आहे, हें पाहण्याकरितां आनंदीबाई बाळ्याबरोबर गेल्या. वेणुबाई होत्या तेथें जाऊन बाळ्या स्वस्थ उभा राहिला व म्हणाला " वेणुबाई, हा मी फणी घेऊन आलों आहें."

बाळ्या पुढें बसला, तेव्हां वेणुबाईंनीं त्याचे केश खसाखसा विंचरले; परंतु बाळ्या कांहींएक बोलला नाहीं. हें यशोदाबाईंनीं पाहिलें. त्या म्हणाल्या " वेणुबाई, अंमळ हळू कां नाहीं विंचरीत ? तुम्हीं माझे केश इतके जोरानं विंचरले असतेत, तर मला बरं वाटलं नसतं."

वेणुबाईंनीं उत्तर केलें " तुमच्या केशांची गोष्ट निराळी आहे. बाळ्याच्या केशांची गुंतागुंत झाली आहे."

असें ह्मणून त्यांनीं बाळ्याचे केश पूर्ववत् विंचरले. तथापि बाळ्या चकारशब्द बोलला नाहीं. तो आनंदीबाईकडे पाहून ह्मणाला "मावशीबाई, झालें ना? मीं दम धरला ना?"

हे शब्द ऐकून आनंदीबाईस संतोष झाला. त्यांनीं बाळ्याचा हात धरून त्याला यशोदाबाईजवळ नेलें व म्हटलें "आज बाळाचं वर्तन तुह्मीं पाहिलं ना? याला आज खाऊला पैसे द्या."

जो बाळ्या नुसता अंगाला हात लाविला असतां माकडासारखी हातभर उडी मारणारा, नुसती फणी केशाला लागल्याबरोबर थैमान करून सोडणारा, व कोणी त्याचे पाय घासावयास लागलें असतां ओरडण्यानें घर दणाणून टाकणारा, त्या बाळ्याचें आज शांत वर्तन पाहून यशोदाबाईस आश्चर्य वाटलें. बाळ्याची मुद्रा पाहून त्या आनंदीबाईस ह्मणाल्या "आनंदीबाई, आज बाळ्यास खाऊस पैसे तर मिळतीलच; शिवाय, मुंबईहून हपूसचे आंबे आणिले आहेत त्यांपैकीं प्रथम दोन त्याला मिळतील." असें म्हणून त्यांनीं एका नोकरास आंबे आणण्यास सांगितलें व त्या बाळ्याकडे वळून ह्मणाल्या "बाळ्या, वेणुबाई असं कां करिते? तुला स्वतः नाहीं का केश विंचरतां येत?"

बाळ्या ह्मणाला "आई, मला केंस विंचरतां येतात, पाय घासतां येतात, अंघोळ करितां येते; हें सर्व मीं करावें असें मला वाटतें."

"तर मग आनंदीबाईंची हरकत आहे कीं काय?"

आनंदीबाई ह्मणाल्या "छे, छे, असं कसं होईल? माझी मुळींच हरकत नाहीं; इतकंच नाहीं, तर बाळाला जी जी गोष्ट करितां येण्यासारखी आहे, ती ती त्यानं स्वतः करावी, अशी माझी इच्छा आहे. क्षुल्लक कामासाठीं कारणावांचून दुसऱ्याला त्रास देऊं नये, हें त्याला कळूं लागलं आहे. तो स्वतःवर जितका अवलंबून राहील तितकं चांगलं, असं त्याला माझं सांगणं आहे. परंतु तो ह्मणाला कीं, तुह्मीं त्याला वेणुबाईकडे जाऊन शेंडी विंचरून घेण्यास सांगितलं, त्यावरून मीं त्याला जाऊं दिलं. कारण, आईबापांनीं सांगितलेली गोष्ट साधारण असो अथवा महत्त्वाची असो, ती मुलांनीं ऐकिली पाहिजे. मग ती त्यांनां आवडो अथवा न आवडो. अमुक गोष्ट सांगावयाची अगर न सांगावयाची हा विचार आईबापांचा आहे व त्याप्रमाणं बाळाकडून करविणं हें माझं

कर्तव्य आहे, असं मी समजत्यें. तुमच्या आज्ञेप्रमाणं चालण्याविषयीं आज त्यानं होऊन गोष्ट काढिली. त्याप्रमाणं न चालणं ह्मणजे आईच्या इच्छेप्रमाणं न वागण्यास त्याला उत्तेजन देणं होय. यदाकदाचित् तुह्मीं त्याला सांगितलेली गोष्ट मला पसंत पडली नाहीं, तर दुसरे वेळीं मी तुमची एकांतांत गांठ घेऊन तुह्माला त्या बाबतींत सांगणं शहाणपणाचं होईल. परंतु प्रथम त्याच्याकडून हुकूम पाळविणं ही महत्त्वाची गोष्ट आहे. जे लोक आईबाप, गुरु, देव व सत्पुरुष यांची आज्ञा न पाळण्याविषयीं मुलांनां उत्तेजन देतात ते दोषास पात्र आहेत असं मी समजत्यें."

आनंदीबाईचें हें कळकळीचें भाषण ऐकून यशोदाबाई कांहीं वेळ स्तब्ध राहिल्या. काय बोलावें हें त्यांनां सुचेना. आपण आपल्या पोटच्या पोरासाठीं कळकळ बाळगित नाहीं इतकी आनंदीबाई बाळगितात, हें मनांत येऊन त्यांची वृत्ति गोंधळल्यासारखी झाली. शेवटीं त्या आनंदीबाईस ह्मणाल्या " आनंदीबाई, मी तुमची फार ऋणी आहें. बाळ्याचा स्वभाव फार हट्टी असे; तो नेहमीं लोकांचं बोलून घेई; जो तो त्याला पाण्यांत पाही; त्याच्याएवढीं दुसरीं मुलं कशीं हुशार; तो नऊ वर्षांचा—तरी त्याला ओनामा काढण्याची पंचाईत. तेव्हां हा मुलगा चांगला निघेल असं मला वाटत नसे. माझी स्वतःची स्थिति तुह्मी पाहतच आहां. घरांत दोन पैसे आहेत, परंतु आह्मांनीं डोकं उठविलं आहे. आस्थेचं मनुष्य कोणी जवळ नाहीं. जीं माणसं आहेत त्यांचा यत्न लुबाडण्याविषयीं आहे. पदरीं माणसं न ठेवावीं, तर पसारा मोठा आहे. शिवाय, नांवलौकिकाप्रमाणं वागलं पाहिजे. मुली काय-त्या दोन दिवसांच्या सोबती. त्यांचीं लग्नं झालीं ह्मणजे त्या दुसऱ्याच्या घरीं जायच्या. मग त्यांच्यांवर आपली सत्ता नाहीं. घरच्यांची तशी स्थिति झाल्यापासून कसं होईल, काय होईल, याविषयीं मला नेहमीं काळजी असे! परंतु बाळ्या मोठा झाल्यावर आपणास काळजी राहणार नाहीं; आपण पंढरपुर, काशी, गोकुळवृंदावन वगैरे ठिकाणीं यात्रा करून स्वस्थ बसूं, असं मला प्रथम वाटत असे; परंतु बाळ्या मोठा होत चालला तों निराशा होत चालली. हा हिरवट पोर आपणाला विचारणार नाहीं, असं कधीं कधीं मनांत येऊन वाईट वाटत असे; परंतु माझ्याविषयीं आतां त्याचं प्रेम पाहून मला संतोष होतो. हें प्रेम तुह्मीं उत्पन्न केलं, तेव्हां तुमचे मजवर फार उपकार आहेत! गोष्ट साधारण असो अगर

महत्त्वाची असो, तिच्याविषयीं सर्व मुखत्यारी तुमच्याकडे. बरं, पण बाळयाच्या संबंधानं अलीकडे वेणुबाईची वृत्ति अशी कां आहे हें मला समजत नाहीं."

इतक्यांत वेणुबाई तेथें आल्या व यशोदाबाईस ह्मणाल्या "तुह्मी नाहीं का मला बाळ्याचे केश विंचरण्यास सांगितलं ?"

त्यावर यशोदाबाई ह्मणाल्या "वेणुबाई, मी काय बोलल्यें त्याचा तुह्माला अर्थ समजला नाहीं. बरं, तें असो. आज तुह्माला मी स्पष्ट सांगत्यें, कीं, मुलांच्या संगोपनासंबंधानं आनंदीबाईंचे व माझे विचार अगदीं एक आहेत. कदाचित् आह्मां उभयतांच्या सांगण्यांत जर कांहीं फरक पडला, तर आनंदीबाईंच्या ह्मणण्याप्रमाणं घरांतील माणसांनीं चाललं पाहिजे."

हें ऐकून वेणुबाई मनांत चडफडत रागावतच निघून गेल्या. नंतर यशोदाबाई बाळ्याकडे वळून ह्मणाल्या "बाळ्या, आजपासून आंघोळ करणं, शेंडी विंचरणं वगैरे कामं तूं आपलीं आपणच करित जा."

आईच्या तोंडचे हे शब्द ऐकून बाळ्याला फार आनंद झाला व तो कांहीं बोलणार, इतक्यांत यशोदाबाई त्याला ह्मणाल्या "बाळ्या, तूं काय बोलणार हें मी समजल्यें; परंतु तूं माझे आभार मानण्यापूर्वी आनंदीबाईंचे मान !"

आईची आनंदवृत्ति पाहून बाळ्याला आनंद झाला व आईनें आपणास आंबे दिले व तिनें आपणास जवळ बोलाविलें, हें सांगण्यासाठीं तो काशी व माई ह्यांच्याकडे धावत गेला.

कांहीं दिवस लोटल्यावर यशोदाबाईंची आनंदवृत्ति पाहून आनंदीबाई ह्मणाल्या "आज मी तुह्माला एक विनंति करणार आहें. ती माझ्या स्वतःच्या संबंधानं नसून काशी व बाळ यांच्या वतीनं आहे."

असें ह्मणून त्यांनीं एक चिठ्ठी पुढें केली. या चिठ्ठींतील मजकूर काशीनें सांगितला होता, व बाळ्यानें लिहिला होता. काशीच्या अंगीं मजकूर जुळवून लिहिण्याचें सामर्थ्य कितपत आलें आहे, व बाळ्याचें अक्षर कसें काय आहे हें यशोदाबाईंस दाखवावें, व अदबीनें कांहीं गोष्ट मागावयाची असल्यास प्रत्यक्ष न मागतां चिठ्ठीच्या द्वारें विनंति करावी, हें शिक्षण मुलांनां मिळावें या हेतूनें आनंदीबाईंनीं ही चिठ्ठी लिहविली होती. चिठ्ठींतील मजकूर वाचून यशोदाबाईंस फार आनंद झाला. यशोदाबाईंची प्रसन्न मुद्रा पाहून

आनंदीबाई म्हणाल्या " आम्ही कांहीं दिवसांपूर्वीं एका दुकानांत गेलों होतों. तेथें टोमाटोचं बीं बाळाच्या दृष्टीस पडलं. तो तें घेऊन खावयास लागला. त्यावरून त्याला मीं सांगितलं, कीं, ' हें पेरल्यावर चांगलं फळ येतं, तें मग खाण्यालाहि चांगलं लागतं, व त्याची भाजीहि चांगली होते. नुसतं बीं खाल्लं असतां गोड लागत नाहीं' तो म्हणाला ' मी तें पेरीन आणि मग आपण फळाची भाजी खाऊं.' त्यावरून मीं त्याला तें बीं घेऊन दिलं व लहान खोरं व कुदळ हींहि घेऊन दिलीं. पुढं त्याच्याकडून जमीन चांगली तयार करवून तींत तें पेरविलं; परंतु रोजच्येरोज तें किती वर आलं आहे, हें पाहण्याचा त्याला नाद लागेल व तो रोज मला विचारून त्रास देईल, असं वाटून त्याच्याकडून वांगी, मेथी, कोथिंबीर व मिर्च्या वगैरेचे वाफे तयार करविले. बाळ्याला एकट्याला काम करण्याचा कंटाळा येईल, ह्मणून नोकरांकडून आणखी वाफे तयार करविले. त्यांत माईनं तुळशी, गुलछबु, मोगरा वगैरे झाडं लाविलीं आहेत; शिवाय तिनं घोसाळं, पडवळं, कारलीं व भोंपळे ह्यांचेहि वेल लाविले आहेत. काशीला टापटीप फार आवडते, ह्मणून तिच्याकडून कुंड्यांत निरनिराळ्या प्रकारचीं रंगीबेरंगी झाडं लाविलीं आहेत. कुंड्यांवर तिनं सुबक अक्षरांनीं चिठ्या मारिल्या आहेत. त्या तिनं सारख्या अंतरावर ठेविल्या असून एका जातीच्या दोन अशा समोरासमोर ठेविल्या आहेत. ऊन कमी झालं ह्मणजे तुमचीं तिन्हीं मुलं प्रथम झाडाखालचा अथवा वाफ्यांतील केरकचरा काढून जागा साफ करितात. नंतर नोकरांनीं पाणी लावून कुंडींत सोडल्यावर मुलं झारीनं आपापल्या वाफ्यांस व झाडांस पाणी घालितात. मधूनमधून मी त्यांनां मदत करित्यें. या योगानं त्यांचा वेळ चांगल्या प्रकारं जाऊन त्यांनां करमणूक होते व वेताबाताचा व्यायामहि होतो. दुसरं असं कीं, लहानाचं मोठं करण्यास अंगीं उतावीळपणा उपयोगीं नाहीं, व कांहीं गोष्टी वेळच्या वेळेवर काळजीपूर्वक कराव्या लागतात, वगैरे गोष्टींचं शिक्षण आपोआप मिळून पुढं त्या शिक्षणाचा प्रपंचांत फार उपयोग होतो. बागेंत जीं झाडं, वनस्पति, भाजीपाला वगैरे आहेत त्यांची यादी तयार करून ठेविली आहे. झाडांचा उपयोग काय, वनस्पतींचा उपयोग काय, असे प्रश्न विचारण्यास मुलांनां कारणं उत्पन्न होऊन त्यांचीं उत्तरं देण्यास मला संधि सांपडते व त्यांच्या मनांत ज्या ज्या कल्पना भरवून

देणं इष्ट आहे त्या त्या भरवून देण्यास सवड सांपडते. काशीनं कांहीं झाडांचीं चित्रं काढून ठेविलीं आहेत. तेव्हां यावरून तुमच्या लक्ष्यांत येईल, कीं, मुलांनीं श्रम करून जें काय केलं आहे, तें तुह्माला दाखविण्याची त्यांनां इच्छा असणं स्वाभाविक आहे, व आज तसं करण्याचं त्यांच्या मनांत आहे."

ही हकीगत ऐकून यशोदाबाईस फार आनंद झाला. त्या कांहीं बोलणार, तोंच आनंदीबाई ह्मणाल्या "माझी हकीगत अद्याप संपली नाहीं, परंतु तुह्माला कंटाळा येईल कीं काय अशी मला भीति वाटते."

यशोदाबाई म्हणाल्या "तुह्माला अशी भलतीच शंका तरी कशी आली, याचं मला आश्चर्य वाटतं!"

आनंदीबाई म्हणाल्या "खरोखर पाहतां शंका येण्याचं कारण असूं नये; परंतु मी जी हकीगत सांगणार ती मनोरंजक नाहीं असं मला वाटतं. वहुतेक स्त्रियांची प्रवृत्ति मनोरंजक विषयांकडे फार असते; मग त्यापासून कांहीं एक उपयोग झाला नाहीं तरी हरकत नाहीं, व त्यांत वेळ व्यर्थ गेला तरी हरकत नाहीं. ह्यावरून मनाचं रंजन करूं नये, असं मी ह्मणत नाहीं; परंतु उपयुक्त विषयाकडे लक्ष्य देण्याची व तत्वदृष्ट्या विचार करण्याची मनास संवय पाहिजे. ही संवय फक्त पुरुषांस असावी व स्त्रियांस नसली तरी चालेल, असं समजणं बरोवर नाहीं. आमच्या स्त्रिया पोरकट व निरुपयोगी गोष्टींत आपला वेळ न घालवितां त्या संसारांतील उपयुक्त गोष्टींकडे लक्ष्य देतील, तर त्यापासून त्यांनांच उपयोग आहे असं नाहीं, तर त्यांच्या मुलांबाळांनां व त्यामुळं इतरांनांहि उपयोग होईल. खऱ्या हिताकडे लक्ष्य देणाऱ्या फारच थोड्या स्त्रिया दृष्टीस पडतात; कित्येकींनां तर अशा उपयुक्त गोष्टी ऐकण्याचासुद्धां कंटाळा वाटतो; मग त्याप्रमाणं वर्तन करण्याचं तर नांवच नको! ही गोष्ट केवळ स्त्रियांसच लागू आहे असं नाहीं. पुष्कळ पुरुष देखील असेच दृष्टीस पडतात. चमत्कार हा कीं, ज्यांनां खरोखर या गोष्टी समजाव्या, त्यांपैकीं कित्येकांची अशीच शोचनीय स्थिति दृष्टीस पडते, ह्मणून मला शंका वाटली."

यशोदाबाई म्हणाल्या "आनंदीबाई, तुम्ही म्हणतां तें खरं आहे. माझा स्वभाव अंमळ आळशी आहे, त्याप्रमाणं माझ्या मैत्रिणींचाहि आहे. काम करण्याचा आह्मांला कंटाळा वाटतो. कांहीं विशेष मौज नसेल तर ऐकावंसं अथवा पहावंसं

वाटत नाहीं. या सर्व गोष्टी जरी खऱ्या आहेत, तरी अलीकडे माझ्या मनाची चलबिचल झाली आहे. घटकेंत वाटतं, आपण कांहीं उपयुक्त पुस्तक वाचावं, कांहीं उपयुक्त काम करावं; पण पुनः असं वाटतं, व्यर्थ शीण कां करावा? आपणांस काय करायचं आहे? घरांत पैसे आहेत तोंपर्यंत खावं, प्यावं, नि स्वस्थ असावं. परंतु मुलांची हल्लींची स्थिति पाहून पुनः वाटतं, कीं, ही स्थिति अशी चालेल, तर आपणासारखी भाग्यशाली कोण आहे? मुलांच्या कल्याणाशिवाय आह्मां स्त्रियांनां आणखी दुसरी कोणती गोष्ट प्रिय आहे? त्यांच्या हिताकडे लक्ष्य न देतां आपण आपल्याच सुखावर नजर द्यावी, हा शहाणपणा नाहीं. ही गोष्ट माझ्या मनांत येऊन माझे विचार बदलत आहेत. आतां माझं लक्ष्य मुलांकडे थोडंथोडं लागत चाललं आहेत. तेव्हां तुह्मीं मुलांच्या संबंधानं गोष्ट सांगितली असतां मला कंटाळा वाटणार नाहीं इतकंच नाहीं, तर उलट आनंद होईल."

आनंदीबाई ह्मणाल्या "बरं तर, मलाहि ती हकीगत सांगण्यास आनंद वाटतो, व ती आतां मी सांगतेंच. अलीकडे आपल्या स्त्रियांनां शिक्षण द्यावं असं पुष्कळांस वाटूं लागलं आहे; परंतु हें शिक्षण काय द्यावं, याविषयीं मात्र बराच वाद आहे. मी आतांच ती सर्व हकीगत सांगत बसत नाहीं. आजपर्यंत मीं तुमच्या मुलांनां जें काय शिकविलं आहे त्यावरून तुह्माला कांहीं अंशीं कळून आलं असेल. आज तुह्माला फक्त एकच गोष्ट सांगणार आहें. व ती ही कीं, स्त्रियांनां पाकशास्त्राची माहिती चांगली असली पाहिजे, व त्यांच्या अंगीं सुग्रणपणा अवश्य असला पाहिजे. हें शिक्षण त्यांनां लहानपणीं मिळालं नाहीं, तर पुढं त्यांनां कंटाळा येतो. हें शिक्षण श्रीमंतांच्या बायकांनांसुद्धां पाहिजे. घरांत चाकरनोकर असले ह्मणजे बायकांनां काय करायचं आहे, ही समजूत चमत्कारिक आहे. ऐपत आहे ह्मणून स्वयंपाकाची माहिती नसावी किंवा सुग्रणपणा नसावा, हें योग्य नाहीं. नोकरचाकरांस विशेष काळजी असत नाहीं. त्यांचं ढपळशाई काम असतं. यामुळं नेहमीं पदार्थांची नासधूस होऊन नुकसान होतं. ह्मणून ज्यांनां ऐपत आहे त्या स्त्रियांनींसुद्धां स्वयंपाकांत देखरेख ठेवणं अगत्याचं आहे. परंतु ज्या यजमानास अथवा यजमानिणीस कामाची माहिती नाहीं, त्याच्या अथवा तिच्या हातून देखरेख करण्याचं काम बरोबर होणार नाहीं. शिवाय, कांहीं जिनसा अशा आहेत कीं, त्या स्वस्थपणं तयार केल्या पाहिजेत. कामांत

नौकरांचाकरांचं फारसं लक्ष्य नसतं. दुसरं असं कीं, हें शिक्षण स्त्रियांनां मिळाल्यामुळं त्यांचं लक्ष्य प्रपंचांत लागून त्यांच्या अंगीं टापटीप व व्यवस्थितपणा हे गुण येतात. हे गुण स्त्रियांच्या अंगीं असल्यापासून फार फायदा होतो. हें समजून माईस व काशीस निरनिराळ्या प्रकारचीं लोणचीं, गुळांबा, मुरंबा, हलवा, निरनिराळ्या प्रकारचीं पक्वान्नं, निरनिराळ्या प्रकारच्या भाज्या व कोशिंबिरी कशा कराव्या हें मीं शिकविलं आहे. त्यांपैकीं बऱ्याच जिनसांची माहिती काशीस चांगली झाली आहे. आज रात्रीं फराळाचा बेत केला आहे, व काशी स्वतः फराळाच्या जिनसा तयार करणार आहे. मुलांनीं श्रम करून ज्या भाज्या लाविल्या आहेत त्या सर्व फराळाच्या वेळीं तुमच्या दृष्टीस पडतील. हा बेत तुह्माला पसंत आहे का ?"

यशोदाबाई म्हणाल्या "आनंदीबाई, या गोष्टीस माझी पूर्ण संमति आहे. मुलांनीं स्वतः श्रम करून बागेंत लाविलेल्या जिनसा व मुलीनं स्वतः तयार केलेले पदार्थ खाण्याची संधि सांपडावी, यापेक्षां आनंदाची गोष्ट कोणती ? आज कांहीं असो, मी घरीं राहणार !"

हें भाषण संपतें आहे तों यशोदाबाईकडे राधाबाईची कुळंबीण आली. तिला पाहून यशोदाबाईनीं विचारिलें "ठमाऊ, आज या वेळेस तूं कशी आलीस ?"

त्यावर ठमाऊनें उत्तर केलें "बाईसाहेबांनीं तुह्माला जेवण लवकर आटोपून बसण्यास सांगितलं आहे."

यशोदाबाईनीं विचारिलें "आज काय आहे ? कुणी हरदास आला आहे का ?"

"मला तें माहीत नाहीं; परंतु बाईसाहेब व दुसऱ्या बायका नाटकाविषयीं कांहीं बोलत होत्या."

यशोदाबाई म्हणाल्या "होय, होय, बरोबर आहे. ती नाटक मंडळी आज रामराज्यावियोगाचा शेवटचा खेळ करून दुसरीकडे जाणार आहे. आजचा खेळ अखेरचा असल्यामुळं अशी संधि पुनः यावयाची नाहीं. बाहेरगांवचे लोक मुद्दाम पैसे खर्च करून पुण्यांत येतात, व आपण पुण्यांतल्या पुण्यांत असून जाऊं नये हें चांगलं नाहीं, असं तुझ्या बाईसाहेब काल ह्मणत होत्या."

ठमाऊ ह्मणाली "मग वाईसाहेबांस मी काय सांगू?"

हें ऐकून यशोदाबाई थोड्या विचारांत पडल्या. परंतु आपण थोड्याच वेळापूर्वी आनंदीबाईपाशीं काय ह्मटलें, याची आठवण होऊन त्या ह्मणाल्या "ठमाऊ, आज माझा नाटकाला येण्याचा विचार नाहीं, असं बाईसाहेबांस सांग."

यावर आनंदीबाई ह्मणाल्या "यशोदाबाई, तुह्मी आज गेलां नाहीं, तर तुमच्या मैत्रिणींस वाईट तर वाटणार नाहींना?"

यशोदाबाई ह्मणाल्या "त्यांनां वाईट वाटो किंवा न वाटो. नाटक पाहून जो मला आनंद होईल, त्यापेक्षां आज घरीं राहून अधिक आनंद होईल असं मला वाटतं."

इतकें बोलून यशोदाबाई ठमाऊस ह्मणाल्या "ठमाऊ, बाईसाहेबांनां सांग कीं, आज माझं येणं होणार नाहीं. आज मला घरींच राहिलं पाहिजे."

यशोदाबाई नाटकाला येत नाहींत, हें ऐकून राधाबाईस फार आश्चर्य वाटलें. त्यांच्याजवळ दुसऱ्या बायका बसल्या होत्या. त्या ह्मणूं लागल्या "हा सर्व खेळ त्या आनंदीबाईचा आहे. त्या यशोदाबाईच्या घरांत शिरल्यापासून यशोदाबाईची वृत्ति चंचल झाली आहे. आनंदीबाईनीं त्यांनां कांहीं तरी मोहनी घातली असावी."

अशा रीतीनें आनंदीबाईच्या वर्तनावर तेथें बरीच टीका झाली; परंतु आपणास त्या गोष्टीकडे लक्ष्य द्यावयाचें नाहीं. यशोदाबाईच्या घरांत काय प्रकार झाला, ह्याविषयीं आपण विचार करूं.

आनंदीबाईस यशोदाबाईचा रुकार मिळाल्यावर त्या मुलांकडे गेल्या. आईची परवानगी मिळाली व ती आज घरीं राहणार, हें ऐकून मुलांनां फार आनंद झाला. त्यांनीं फराळाची तयारी चालविली. आनंदीबाईची देखरेख होतीच. तेव्हां सर्व व्यवस्था चांगली होती, हें सांगावयास नको. यशोदाबाईनीं आपल्या कांहीं मैत्रिणींस बोलाविलें होतें. सर्व मंडळी आपापल्या ठिकाणीं बसल्यावर टोमाटोच्या भाजीची रुचि केव्हां घेईन, असें बाळ्याला झालें होतें.

मंडळी फराळास बसल्याबरोबर बाळ्यानें प्रथम भाजीचा घांस घेतला, व लागलीच पाण्याचा घोंट घेतला. तें पाहून मंडळीस फार हंसूं आलें. बाळ्या

आनंदीबाईच्या तोंडाकडे पाहूं लागला. तेव्हां त्या ह्मणाल्या "बाळ, तूं थोडा उतावीळपणा केलास. प्रथमच का कोणी भाजी खातो ? भूक लागली असतां मनुष्याचा कोठा रुक्ष असतो. भाजीसारखे पदार्थ प्रथम खाऊं नयेत ! स्निग्ध पदार्थ प्रथम खाऊन नंतर तिखट पदार्थ खावे व पाणी प्यावें हें चांगलं."

फराळाच्या वेळीं प्रथम यशोदाबाईनीं बोलण्यास सुरुवात केली. काशीची सुग्रणता पाहून त्यांनां फार आनंद झाला व काशीची व आनंदीबाईची स्तुति केल्यावांचून त्यांनां राहवेना. त्या ह्मणाल्या " नुसते पदार्थ चांगले तयार केले ह्मणजे संपलं नाहीं, तर ते वाढण्यांतसुद्धां हलगरजीपणा व घामटपणा असूं नये, ही गोष्ट तुह्मीं माझ्या मुलींस शिकविली हें फार चांगलं केलं. पदार्थ वाढण्यावरूनसुद्धां बायकांच्या अंगीं टापटीप किती आहे व त्या घामट आहेत किंवा कसं याची परीक्षा होते."

अशा प्रकारच्या आणखीहि बऱ्याच गप्पा झाल्यावर मंडळीचा फराळ आटोपला व सर्व मंडळी दिवाणखान्यांत बसली. तेथील टेबलावर एक पुस्तक पडलें होतें तें काशी वाचूं लागली. तें स्त्रियांकरितां लिहिलेलें होतें, परंतु त्याची भाषा चमत्कारिक होती; काशीस तें आवडलें नाहीं ह्मणून तिनें तें ठेवून दिलें. हें पाहून आनंदीबाई ह्मणाल्या " अलीकडे स्त्रीशिक्षणाविषयीं बरीच चर्चा होत आहे; परंतु स्त्रियांस समजण्यासारखीं उपयुक्त पुस्तकं लिहिण्याविषयीं विशेष काळजी दिसून येत नाहीं. कित्येक पुस्तकांची भाषा मलासुद्धां समजत नाहीं!"

हें ऐकून बाळयाहि पुढें सरसावून ह्मणाला, " मावशीबाई, मलाहि बालबोधांतील पुष्कळ गोष्टी समजल्या नाहींत."

त्यावरून मंडळी हंसूं लागली. यशोदाबाईस व मुलांस ती रात्र मौजेची वाटली. बाळया संध्याकाळीं जेवण झाल्याबरोबर निजत असे, परंतु तोहि आज बराच वेळ जागा होता.

एके दिवशीं आनंदीबाईनीं बाळयाला चित्रांचें पुस्तक दिलें. तें जर्मन व फ्रेंच लोकांमध्यें झालेल्या लढाईसंबंधाच्या चित्रांचें होतें. बाळया तें पाहत असतां माई तेथें आली; परंतु तो भराभर पानें चाळी, यामुळें तिला बरोबर पाहतां येईना. माईला नेपोलियन बादशहाचें चित्र पाहावयाचें होतें, ह्मणून ती पुस्तक हिसकावून घेऊं लागली. त्यावरून बाळया तें ओढावयास लागला.

अशा रीतीनें नेपोलियन बादशहाचे मधल्यामध्यें हाल होऊन त्याचे तुकडे होतात कीं काय, अशी सर्वांस भीति उत्पन्न झाली; परंतु आनंदीबाईस तें समजतांच त्यांनीं बादशहाची मुक्तता केली व नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें मुलांनां निरनिराळ्या खोलींत बसविलें. आज बाळ्याचा अपराध असतां मावशीबाई बाळ्यास रागें भरल्या नाहींत, व आपला अपराध नसतां आपणास निराळ्या खोलींत बसावयास सांगितलें, ह्मणून माई रुसून बसली. ही संधि पाहून वेणुबाईनीं माईस एक चांगलीशी फणसपोळी दिली व तिची समजूत करून त्या चालत्या झाल्या. मुलांस रुसण्यासहि वेळ लागत नाहीं, व गोडींत येण्यासहि उशीर लागत नाहीं. वेणुबाईनीं माईस जी पोळी दिली होती, ती बाळ्यास देण्याकरितां ती त्याच्याकडे गेली व त्याला ती देऊं लागली. पूर्वीं, बाळ्यास खाण्याची मोठी चटक असे व त्याचें लक्ष्य खाण्याकडे असे; परंतु नवीन उद्योग व नवीन आनंद, यांमुळें आतां खाण्याकडे त्याचें कमी लक्ष्य असे; ह्मणून त्यानें ती पोळी घेतली नाहीं. तो ह्मणाला " मला नको ती पोळी. तूं वेणुबाईस ती परत देऊन टाक. मावशीबाईस ही गोष्ट समजली, तर त्या रागें भरतील. तूं जर परत करशील, तर मावशीबाईस सांगून तुला मी दुसरी छानदार फणसपोळी देईन. माझी पक्की खात्री आहे, कीं, त्या नाहीं ह्मणणार नाहींत ! "

माईच्या डोक्यांतील वेड गेलें होतें. मावशीबाईस न कळतां आपण खाऊची जिन्नस घेतली, ही गोष्ट मनांत येऊन तिनें वेणुबाईस फणसपोळी परत केली. माईनें जी हकीगत सांगितली, ती ऐकून वेणुबाईस फार आश्चर्य वाटलें, व आतां आपला हेतु सिद्धीस नेण्यासाठीं दुसरी कांहीं तरी तोड काढिली पाहिजे, असें त्यांनां समजून आलें.

आदले दिवशीं घडलेली एकंदर हकीगत आणि माईस पोळीबद्दल आपण दिलेलें वचन बाळ्यानें आनंदीबाईस कळविलें. तें ऐकून त्यांनां फार समाधान वाटलें. जें काय पाहिजे, तें बाळ्या मोकळ्या मनानें मागतो, व नाहीं ह्मटलें तरी वेड्यासारखा रुसून बसत नाहीं, हें पाहून आनंदीबाईनीं त्याला उत्तम फणसपोळी दिली. ती, तो व माई मिळून खात असतां त्यांच्या दारापुढें एक तमाशा आला. बाळ्या तो पाहण्यासाठीं खिडकींत बसला.

या तमाशांत एक मुलगा काठीवरून चालत होता. त्याची दृष्टि बाळ्याकडे गेली. काठीवर उभा राहून त्यानें बाळ्यापुढें हात पसरला. मुलगा भुकेनें अगदीं व्याकुळ झाला होता. तें पाहून बाळ्या ह्मणाला " माझ्याजवळ पैसा नाहीं, पोळी आहे; तुला पाहिजे असल्यास देतों."

त्यावरून आनंदीबाईनीं त्याचा हात मागें घेतला व त्या ह्मणाल्या "बाळ, या पोळीनं त्या मुलाच्या भुकेचं कसं निवारण होईल? तुला त्याची करुणा आली असेल तर तूं त्याला कांहीं पैसे दे, ह्मणजे त्याला खरा संतोष होईल."

असें ह्मणून त्यांनीं त्याच्या हातीं पावली दिली. ती त्यानें मुलास दिली. नंतर मुलाच्या बापानें व मुलानें तीन वेळां जोहार केला व ते चालते झाले.

एके दिवशीं आनंदीबाईनीं बाळ्यास नऊ लक्ष चार हजार तीनशें चाळीस; पंधरा हजार तीन; आठशें सात; व पंचावन या रकमांची बेरीज करून आणण्यास सांगितलें. ती त्यानें केली, परंतु त्याचें उत्तर चुकलें होतें; ह्मणून आनंदीबाईनीं त्याला ती पुनः करून आणण्यास सांगितलें. तेव्हां तो हिरमुसल्यासारखें तोंड करून चालता झाला. त्यानें ती पुन्हा केली व आनंदीबाईस दाखविली; परंतु ह्या वेळेसहि त्याचें उत्तर बरोबर नव्हतें. हें पाहून आनंदीबाई ह्मणाल्या "बाळ, तुझं उत्तर चुकलं आहे; ह्यासाठीं फिरून यत्न करून पहा."

हे शब्द ऐकून बाळयास झटका आला. त्यानें कावरीबावरी मुद्रा केली व "मला येत नाहीं!" असें तो ह्मणणार, इतक्यांत आनंदीबाई त्याला ह्मणाल्या " बाळ, तुझा तापटपणा गेला नाहीं! तुला मीं रीत शिकविली आहे. आतां उदाहरण तूं स्वतः केलं पाहिजे. तें तुला करतां येण्यासारखं आहे. दोनदां उदाहरण चुकलं ह्मणून तूं स्वस्थ बसणं चांगलं नाहीं. तुला पुढं पुष्कळ गणित शिकायचं आहे. अद्याप तुला पुष्कळ गोष्टी करायच्या आहेत, यांत दोन नाहीं, अनेक वेळां चुकण्याचा संभव आहे; तर उतावीळपणा करून उपयोग काय! ही बेरीज तुला केलीच पाहिजे. फिरून यत्न करून पहा, ह्मणजे तुला ती खास येईल!"

हें ऐकून बाळ्या पुनः हिरमुसल्यासारखें तोंड करून आपल्या खोलींत गेला. तेथें वेणुबाई आल्या. बाळ्याचें तोंड हिरमुसल्यासारखें पाहून त्या ह्मणाल्या

" बाळ, आज तुला बरं वाटत नाहीं काय? तुझी आई तुला खालीं बोलवित आहे."

वेणुबाईंच्या तोंडचे हे प्रेमाचे शब्द ऐकून बाळ्यास फार आश्चर्य वाटलें. कारण, वेणुबाई त्याच्याशीं अशा प्रेमळ रीतीनें कधींच बोलल्या नाहींत.

आईनें बोलाविलें, असें समजतांच बाळ्या लागलीच खालीं गेला; परंतु यशोदाबाई खालीं नव्हत्या व त्यांनीं त्याला बोलाविलेंहि नव्हतें. तेव्हां तो पाणी पिऊन वर आला. येतां येतां त्याला गणिताची रीत आठवली; परंतु पाटी हातांत घेऊन पाहतो तों बेरीज केलेली त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां त्याला वाटलें, कीं, हें काम वेणुबाईशिवाय दुसऱ्या कोणाचें नसावें. ह्मणून त्यानें रागानें ती बेरीज पुसून टाकिली, व आपण स्वतः ती लक्ष्यपूर्वक करून तो आनंदीबाई-पुढें पाटी घेऊन उभा राहिला. हातचें काम एकीकडे ठेवून आनंदीबाईनीं ती पाटी पाहिली आणि त्याच्या पाठीवरून हात फिरवून त्याला शाबासकी देऊन ह्मटलें "बाळ, पाहिलंस ना, फिरून यत्न करण्यापासून काय नफा आहे तो? तूं त्या वेळेस माझं न ऐकतां डोक्यांत राख घालून आपलाच हेका धरून बसतास, तर आतां तुला जितका आनंद होत आहे तितका झाला नसता!"

वेणुबाईनीं दुरून हा सर्व प्रकार पाहिला, व त्यांनां अधिकच वाईट वाटलें. आनंदीबाईनीं कांहीं गौडबंगाल केलें आहे कीं काय, असें त्यांनां वाटूं लागलें; परंतु त्यांनीं आपल्या मनांतील विचार दोनतीन मैत्रिणींशिवाय दुसऱ्या कोणास कळविले नव्हते. त्या आनंदीबाईस पूर्वींपेक्षां जास्त मान देऊं लागल्या, परंतु त्यांचें वजन कमी कसें करावें या विचारांत त्या रात्रंदिवस असत. त्यांना यशोदाबाईंच्या मैत्रिणींची भरपूर अनुकूलता होती. वेणूबाईनां आपला हेतु सिद्धिस नेण्याची लवकरच संधि सांपडली. ती अशी:—

एके दिवशीं एका मैत्रिणीचा फारच आग्रह पडल्यामुळें यशोदाबाई तिच्या घरीं रात्रीं जेवावयास गेल्या. तेथें आग्रह फारच करण्यांत आला ह्मणून त्यांनीं श्रीखंड वाटीभर जास्त खाल्लें. श्रीखंडावर पाणी पिऊं नये अशी समजूत असल्यामुळें त्या जेवतांना पाणी प्याल्या नाहींत, व नंतरहि पाणी पिण्याचें त्यांनां स्मरण राहिलें नाहीं. रात्रीं त्या घरीं उशिरां आल्या व निजल्या. दुसरे दिवशीं सकाळीं उठल्यावर त्यांच्या पोटांत कळ निघाली. श्रीमंतांच्या बायकांनां

थोडें दुखणें आलें ह्मणजे त्या घाबरून जातात व दुसऱ्यास घाबरवून सोडतात. त्याप्रमाणें यशोदाबाईंनीं या वेळीं केलें. परंतु त्यांनां पाणी पिण्याचा घरगुती सोपा उपाय मुळींच सुचला नाहीं. वेणुबाईंस ही गोष्ट समजतांच त्या वर आल्या व "पोट चोळूं का?" ह्मणून यशोदाबाईंस विचारूं लागल्या. यशोदाबाई हो ह्मणतांच वेणुबाई गडबडीनें खालीं धावत गेल्या व मिरपूड व तेल घेऊन येऊन त्यांचें पोट चोळूं लागल्या; परंतु यशोदाबाईचें पोटदुखणें कांहीं राहिलें नाहीं. नंतर ओवा खाण्यास दिला, हिंग व तूप खावयास दिलें, तथापि गुण आला नाहीं. हें पाहून वेणुबाईनीं यशोदाबाईस विचारिलें "डाक्टरला बोलावणं पाठवूं का?" यावर यशोदाबाईंनीं मान हालवितांच वेणुबाईनीं ताबडतोब डाक्टर विनायकराव यांच्याकडे मनुष्य पाठविला. विनायकराव लागलीच आले. त्यांनीं यशोदाबाईंची नाडी पाहिली; परंतु त्यांनां विशेष असें कांहीं दिसून आलें नाहीं. त्यांनीं सर्व हकीगत विचारून घेतली व "मनुष्य पाठवा ह्मणजे औषध पाठवितों." असें सांगितलें. ते गेल्यावर यशोदाबाईंची घालमेल चालली. त्या ह्मणाल्या "वेणुबाई, आज काशी व माई घरांत नाहींत काय? आनंदीबाई कुठं आहेत? मी आजारी आहें हें त्यांनां नाहीं का कळलं? आज या सर्वांचं झालं तरी काय?"

वेणुबाई ह्मणाल्या "सर्वजणं बाहेर गेलीं आहेत."

"सर्वजणं?"

"मला वाटतं, सर्वजणं बाहेर गेलीं आहेत. मीं फारशी चौकशी केली नाहीं. त्यांच्या कारभारांत पडत जाऊं नको, असं तुह्मीं सांगितल्यापासून मी त्यांच्या-विषयीं पूसतपाससुद्धां करित नाहीं."

यशोदाबाई ह्मणाल्या "आनंदीबाई घरांत सांगून गेल्या आहेत का?"

"त्या मला विचारून गेल्या नाहींत."

खरोखर पाहतां, आनंदीबाई वेणुबाईंस खुद्द सांगून गेल्या नव्हत्या; परंतु ज्या वेळेस त्या घरांत एका नोकरास कळवून गेल्या, त्या वेळेस वेणुबाई तेथें होत्या व आनंदीबाई कोठें गेल्या होत्या हें त्यांनां माहीत होतें. वेणुबाई यशोदाबाईंस ह्मणाल्या "आज सकाळीं तुह्मीं गोंगाट ऐकिला का?"

यशोदाबाईंनीं घाबरून विचारलें "कसला?"

वेणुबाई संथपणें ह्मणाल्या "कांहीं विशेष नाहीं. घाबरण्याचं कारण नाहीं. गाणं व नाचणं याशिवाय दुसरं कांहीं नव्हतं."

"गाणं अन् नाचणं? अन् इतक्या पहांटेस!! वेणुबाई तुह्मीं अर्धवट बोलूं नका. काय असेल तें सर्व सांगा. तुमच्या संशययुक्त भाषणानं माझ्या मनांत भलभलत्या कल्पना येतात."

वेणुबाई ह्मणाल्या "तें सर्व सांगण्याला हरकत नाहीं; परंतु तुह्माला राग येईल कीं काय, अशी मला भीति वाटते. तुह्मी दिवाणखान्यांत आहां, तेव्हां पुढल्या दारीं काय चाललं आहे, हें तुह्माला ऐकूं येणार नाहीं, असं काशी, माई व आनंदीबाई यांनां वाटलं असावं."

"काय ऐकूं जावयाचं व पुढल्या दारीं काय चाललं होतं?"

"कांहीं ह्मणण्यासारखं नव्हतं. एक तमाशा आला होता; त्यांत एक मनुष्य ढोलकं वाजवित होता व दुसरा हातांत पुंगी घेऊन ती वाजवित होता व तालावर नाचत होता. तें पाहून बाळ्या मोठमोठ्यानें उड्या मारित होता."

"पण मी आजारी आहें, असें तुह्मीं त्याला सांगितलं नाहीं का?"

"बाळ्यास सांगितलं; परंतु काशी व माई यांजवळ आनंदीबाई होत्या, ह्मणून मी त्यांजवळ कांहीं बोलल्यें नाहीं; तथापि त्यांनां ऐकूं जाईल असं बोलल्यें."

हें भाषण चाललें आहे, तों माई थेट आईच्या बिछान्यापर्यंत आली. तेव्हां यशोदाबाई तिला ह्मणाल्या "माई, आज तूं घरीं कशी? काशी कुठं आहे? ती वाचित बसली आहे का? माझं पोट दुखत आहे, हें तुह्मांला माहीत नाहीं वाटतं. बरं तें असो. आनंदीबाईपाशीं तुमचं कांहीं काम असल्यास तुह्मांला इथं खोळंबवून ठेवणं बरोबर नाहीं."

या बोलण्याचा अर्थ माईस समजला नाहीं. ती ह्मणाली "आज मावशीबाईशीं आमचं कांहीं एक काम नाहीं. आई, तूं आजारी आहेस हें मावशीबाईस माहीत आहे का? त्यांनां माहीत असतं, तर त्या येण्यास चुकल्या नसत्या."

वेणुबाईच्या सांगण्यावरून यशोदाबाईचें मन आनंदीबाईविषयीं निर्मळ नव्हतें. ज्या मनुष्याविषयीं आपलें मन शुद्ध नसतें, त्याची स्तुति कोणीं केली असतां ती फारच अप्रिय वाटते. त्याप्रमाणें यशोदाबाईस माईचें बोलणें रुचलें नाहीं. त्या उगीच

बसल्या. औषध घेऊन मनुष्य कां आला नाहीं ? ह्मणून त्यांनीं वेणुबाईस विचारिलें. वेणुबाईनीं औषध आणण्यासाठीं डाक्टराकडे दुसरा मनुष्य पाठविला. विनायकराव भला मनुष्य होता. तो लोकांस काळजीपूर्वक औषध देत असे. पैशावर त्याची फारशी नजर नसे, ह्मणून त्याच्या घरीं रोग्यांची गर्दी फार असे. विनायकराव यशोदाबाईच्या घराहून परत आल्यावर त्यानें दवाखान्यांत आलेल्या रोग्यांस वाटेस लाविलें. इतक्यांत यशोदाबाईकडील दुसरा मनुष्य औषध मागण्याकरितां आला.

ह्या नोकरास पाहून विनायकरावांनीं आपल्या दवाखान्यांतील मनुष्यास खालीं जाऊन स्वच्छ पाणी घेऊन येण्यास सांगितलें. नोकर पाणी घेऊन आल्यावर विनायकरावांनीं तें एका बाटलींत घालून तिचें तोंड बुचानें बंद केलें. नंतर तिच्यावर चिठ्ठी मारिली. चिठ्ठीवर "आक्वा प्यूरा फॉर यशोदाबाई. आ वाइन ग्लास एवरी फिफटीन मिनिटस." असे शब्द इंग्रजींत लिहिले होते. हा सर्व प्रकार विनायकरावांचा एक स्नेही तेथें बसला होता, त्यानें पाहिला. त्याच्या मनांतून प्रश्न विचारावयाचा होता; परंतु तो गृहस्थ थोडा वेळ स्वस्थ बसला. यशोदाबाईकडील मनुष्य बाटली घेऊन परत गेल्यावर विनायकरावांचा स्नेही मोठ्यानें हंसून ह्मणाला "तुह्मीं आतां औषध ह्मणून जें दिलें, तें तर नुसतें पाणी होतें ! डॉक्टरसाहेब, ज्या रोगावर स्वच्छ पाणी हें औषध चालतें, असा रोग कोणता आहे ! बरें, स्वच्छ पाणीच पाहिजे होतें, तर तें यशोदाबाईच्या घरीं नव्हतें का ? मग नोकरास इतका वेळ तुह्मीं कां बसवून घेतलें ? "

विनायकराव ह्मणाले "अहो, असें केल्याशिवाय इलाजच नसतो ! या श्रीमंतांच्या बायका किती वेड्या असतात ह्मणून सांगूं. थोडेंसें कपाळ दुखलें, डाक्टराला घेऊन या, पडसें आलें डाक्टराकडे जा, ठेंच लागली डाक्टराला बोलवा, यांना उठल्या बसल्या डाक्टरचें कारण लागतें. यांत आमचें नुकसान नाहीं— परंतु या वेड्या लोकांपुढें इलाज नाहीं. यशोदाबाईचे घरीं गेल्यावर मीं तिची नाडी पाहिली; कारण, नाडी पाहिली नाहीं तर डाक्टर चांगला नाहीं, अशी यांची समजूत आहे. आमच्या धंद्यांत जीं सोंगें शिरलीं आहेत, त्यांपैकीं नाडी पाहणें हें मोठें सोंग आहे. ज्याप्रमाणें परीक्षा करावयाची त्याप्रमाणें केली; परंतु मला कांहीं एक विशेष दिसून आलें नाहीं. नंतर यशोदाबाईस सर्व हकीगत विचारिली. तिजवरून मला उघड दिसून आलें, कीं, त्यांचे खाण्यांत श्रीखंड

जास्त आलें व पाणी न पितां त्या निजल्या. अर्थात्, अजीर्ण झालें आहे व पाणी प्यावयास मिळालें असतां त्यांचें पोटदुखणें बंद होईल; परंतु तुह्माला कांहीं विशेष झालें नाहीं असें मी तेथें बोललों असतों, तर तें त्यांनां पटलें नसतें. याविषयीं मला चारपांच वेळ अनुभव येऊन चुकला आहे. तेथेंच पाणी आणून प्यावयास दिलें असतें, तर अनशें पोटीं, सकाळीं, त्यांतून पोट दुखत असतां पाणी कसें प्यावें ? अशा हजार कल्पना निघून माझें सांगणें पटलें नसतें. ह्मणून वरीं येऊन बाटलींत पाणी घालून व तिच्यावर चिठ्ठी मारून ती मनुष्याबरोबर पाठविली असतां तिला विशेष महत्त्व येऊन असल्या लोकांची समजूत होईल, असें वाटल्यावरून त्याप्रमाणें केलें."

ही गोष्ट ऐकून विनायकरावांचे स्नेह्यास फार हंसूं आलें. तो पुण्यांतील वकिलांपैकीं एक प्रसिद्ध वकील होता. त्यानें आपल्या वैद्याचे संबंधानें आलेला अनुभव सांगितला. पण आपणास त्या अनुभवाशीं कांहीं करावयाचें नाहीं.

डाक्टरसाहेबांकडे जाऊन औषध आणण्यासाठीं जो मनुष्य गेला होता तो परत येत असतां, दारापाशीं त्याची व आनंदीबाईची गांठ पडली. आनंदीबाई घरांत गेल्या व त्यांनीं त्यास लगबगीनें जाण्याचें कारण विचारिलें. तो ह्मणाला " मावशीबाई, आज बाईसाहेबांची प्रकृति फार बिघडली आहे. त्यांनीं तुमची दोनदा आठवण केली होती. मीं डाक्टरसाहेबांकडून औषध आणिलें आहे व तें घेऊन वर चाललों आहें."

हें ऐकून आनंदीबाईस आश्चर्य वाटलें. त्या ह्मणाल्या " मी गेल्यें तेव्हां कांहींएक नव्हतं, व आतां इतक्यांतच काय झालं ?"

औषध काय दिलं आहे तें त्यांनीं पाहिलें, तों 'आक्वा प्यूरा' असें बाटलीवर लिहिलें होतें. नंतर त्यांनीं नोकरास जावयास सांगितलें व त्या मनांत ह्मणाल्या "' आक्वा प्यूरा ! ' हें औषध काय बरें आहे ?" परंतु थोड्याच वेळानें त्यांनां आठवलें, कीं, 'आक्वा प्यूरा' ह्मणजे स्वच्छ पाणी. "पण, इथं स्वच्छ पाणी असतां डाक्टरसाहेबांनीं दवाखान्यांतून नुसतं पाणी पाठविलं याचा अर्थ काय ? यावरून त्यांनीं यशोदाबाईची समजूत घालण्यासाठींच अशी योजना केली असावी," असें त्यांना वाटलें. नंतर त्या लागलींच यशोदाबाईच्या खोलींत गेल्या. यशोदाबाई या वेळीं औषध घेऊन अंथरुणावर पडल्या होत्या. शेजारीं माई व काशी होत्या.

आनंदीबाईनीं त्यांच्या प्रकृतीविषयीं विचारपूस केली, व हें सर्व अजीर्णामुळें झालें आहे, असें त्यांना तेव्हांच कळून आलें.

" बाळ्या कोठें आहे ? " ह्मणून यशोदाबाईनीं विचारिलें. इतक्यांत बाळ्या आरोग्य विषयावर नवीन झालेलें पुस्तक घेऊन तेथें आला. आई अंथरुणावर निजलेली पाहून त्यानें हातांतील पुस्तक एकीकडे ठेविलें, व " तुला बरें वाटत नाहीं का ? " ह्मणून यशोदाबाईस विचारिलें.

यशोदाबाई ह्मणाल्या "बाळ्यां, तूं इतका वेळ कुठं होतास? माझं पोट दुखत आहे, हें तुला माहीत नाहीं का? "

बाळ्या ह्मणाला "आई, मी आरोग्य नांवाचें पुस्तक आणण्यासाठीं गेलों होतों. तूं किनई आजारी आहेस असें मला समजलें असतें, तर मी मुळीं बाहेरच्च गेलों नसतों. मावशीबाई मला नेहमीं सांगत असतात, कीं, आईबाप आजारी असतां मुलांनीं त्यांच्याजवळ असावें."

यशोदाबाईनीं आतां आनंदीबाईकडे वळून ह्मटलें " आनंदीबाई, तुह्मी का बरोबर गेलां होतां ?"

आनंदीबाई ह्मणाल्या "होय. हें पुस्तक घेऊन देण्याचं मीं काल बाळास कबूल केलं होतं. हें फार उपयुक्त आहे. ह्यांतील गोष्टी माई व काशी ह्यांनीं लक्ष्यांत ठेवण्यासारख्या आहेत."

आनंदीबाई असें बोलत आहेत तोंच, काशी व माई ह्मणाल्या " बाळ्या, पाहूं तें पुस्तक कसं आहे तें ? "

बाळ्या तें घेऊन ह्मणाला " आई, तुझ्या करमणुकीकरितां तुला तें मी वाचून दाखवूं का ? "

त्यावर काशी ह्मणाली " बाळ्या, तुला अद्याप चांगलंसं वाचतां येत नाहीं; तूं वाचतांना मधून मधून अडखळतोस. मीच आईला वाचून दाखवित्यें."

तेव्हां माई ह्मणाली " ताई, तूं भरभर वाचतेस व बाळ्या फारच्च सावकाश वाचतो, असं मावशीबाई तुह्मां दोघांनां ह्मणत असतात; ह्मणून मीच आईला वाचून दाखवित्यें."

असें ह्मणून ती बाळ्याच्या हातचें पुस्तक घेणार, तों बाळ्यानें तें आपल्या खाकोटीस मारिलें. यामुळें त्याचा चुरगळामुरगळा झाला.

वाचण्याच्यासंबंधानें मुलांची ही टीका ऐकून व बाळ्यानें पुस्तक खाकोटीस मारलेलें पाहून आनंदीबाई ह्मणाल्या " बाळ, काय हा वेडेपणा ? तूं पुस्तकाचे इतक्यांतच किती हाल मांडिले आहेस ? अशाच प्रकारानं तुह्मां मुलांस वर्षांतून एक एक पुस्तक तीन तीन वेळां घेऊन द्यावं लागतं. बरं तें असो. या पुस्तकापासून तुमच्या आईस सध्या फारशी करमणूक वाटावयाची नाहीं. तुमच्या आईची प्रकृति बिघडली आहे व तिनं औषध घेतलं आहे, ह्मणून सध्या तिला स्वस्थ पडूं द्या. मी तुह्मांला ह्या पुस्तकांतील गोष्टी समजावून सांगेन, मग तुह्मी तें आईला वाचून दाखवा. आतां आपण सर्व दुसऱ्या खोलींत जाऊन बसूं. काशी ह्या ठिकाणीं बसेल व डाक्टरसाहेबांनीं सांगितल्याप्रमाणं औषध देईल. मधून मधून आपणहि समाचार घेत जाऊं. "

इतकें बोलून आनंदीबाई माईला व बाळ्याला घेऊन आपल्या खोलींत गेल्या. जाण्यापूर्वी त्यांनीं यशोदाबाईंचे अंथरुणासभोंवतीं लावलेले पडदे वगैरे सर्व काढून टाकविले व शेकण्यासाठीं शेगडी, टोले वगैरे आणिले होते ते खालीं नेण्यास सांगितलें.

पोटांत पाणी गेल्यावर व कांहीं वेळ डोळा लागल्यावर यशोदाबाईंची प्रकृति पहिल्याप्रमाणें साफ झाली. त्या अंथरुणावर उठून बसल्या व पहातात तों काशी उशाशीं स्वस्थ बसली आहे. हें पाहून त्या म्हणाल्या " काशी, तूं अद्याप बसली आहेस ? अझून वेणीफणी कशी केली नाहींस ? तुह्मी जेवलां नाहीं का ?"

काशीनें उत्तर केलें "मावशीबाईंनीं सांगितल्याप्रमाणं मी व माई आळीपाळीनं तुझ्याजवळ बसलों होतों. बाळ्या दोनचारदा थोडथोडा वेळ बसून गेला. मावशीबाईहि कांहीं वेळ बसून गेल्या. मीं वेणीफणीची गोष्ट काढिली होती, परंतु त्या ह्मणाल्या ' आज कांहीं घाई नाहीं; ती दुपारून होईल.' जेवण्याकरितां वेणुबाईंनीं दोनतीन वेळां हांक मारिली व ' तुह्मी आपलं उरकून घ्या, ह्मणजे घरांतील मंडळीची मोकळीक होईल,' असं त्या ह्मणाल्या; परंतु मावशीबाईंनीं सांगितलं, कीं 'तुमची आई निजून उठल्यावर आपण सर्वजण एकदम बसूं.' आह्मांला तें बरं वाटलं. आई, तूं आतां जेवावयास येतेस ना ? "

मुलींचें हें भाषण ऐकून यशोदाबाईंस संतोष वाटला; परंतु वेणुबाईंनीं सकाळीं त्यांच्या मनांत जें भरवून दिलें होतें त्यामुळें, व आपणापेक्षां आपल्या मुलांवर

आनंदीबाईचें जास्त वजन असावें हें न आवडल्यामुळें त्या ह्मणाल्या " काशी, तुह्मी जेवण उरकून घ्या; आज मी लंघन करणार आहें; परंतु खालीं जाण्यापूर्वी आनंदीबाईकडे जा, व त्या कामांत नसतील तर त्यांना जरा इकडे पाठवून दे. मला त्यांच्याशीं कांहीं बोलायचं आहे. "

काशीच्या निरोपाप्रमाणें आनंदीबाई तेथें आल्या. परंतु आपल्या मनांतील खरे विचार बाहेर प्रदर्शित न करितां यशोदाबाई सभ्यपणानें ह्मणाल्या "आनंदीबाई, तुह्माला एक विनंति आहे व ती तुह्मी कबूल कराल अशी माझी खात्री आहे."

आजपावेतों यशोदाबाईचें असें कधींच भाषण नव्हतें. म्हणून आनंदीबाईस थोडेसें आश्चर्य वाटलें; परंतु सभ्यपणामुळें त्यांना हो ह्मणणें भाग पडलें. यशोदाबाई पुढें ह्मणाल्या "आनंदीबाई, विनायकराव डाक्टर व त्यांची बायको हीं तुह्माला माहीत आहेतच. तुमच्याशीं बोलण्याची विनायकरावांची फार दिवसांपासून इच्छा आहे; परंतु आतांपर्यंत तो योग घडून आला नाहीं. त्यांचा व आमच्या घरच्यांचा फार स्नेह असे. त्यांच्या बायकोचा व तुमचा थोडाबहुत परिचय झालाच आहे. आज तिनें तुह्माला व मला संध्याकाळीं जेवावयास बोलाविलें आहे. मी गेल्यें असत्यें, परंतु आज माझी प्रकृति बरी नाहीं, हें तुह्मी पहातच आहां. यासाठीं तुह्मी एकव्याच जा. तुह्मी गेलां असतां तिला समाधान वाटेल. मुलं मजपाशीं राहिलीं असतां तुमची कांहीं हरकत आहे का?"

हें भाषण ऐकून आनंदीबाईस मोठा अचंबा वाटला. त्यांना मोठें कोडें पडलें. होय ह्मणावें, तर आपणावर असा प्रसंग आल्यापासून आपण आतांपर्यंत कोणाचे घरीं कधींच जेवावयास गेलों नाहीं; इतकेंच नाहीं, तर मुलांशिवाय आपण कधींच बाहेर पडलों नाहीं. बरें, आपल्याला जाणें गोड वाटत नाहीं असें सांगावें, तर यशोदाबाईला वाईट वाटेल. आजपर्यंत त्यांना वाईट वाटेल असें आपण कधींच वागलों नाहीं, व त्यांनींहि आपला असंतोष होईल असें आतांपर्यंत कांहीं एक केलें नाहीं. शिवाय, यांच्या घरीं आतां फार दिवस राहण्याचा आपला विचार नाहीं, तेव्हां थोडक्यासाठीं यांचें मन दुखविणें बरें नव्हे. पण, डाक्टरसाहेबांनीं मुलांस जेवावयास बोलाविलें नसेल, हें मुळींच संभवत नाहीं; तेव्हां 'मुलांस घरीं राहूं द्या' असें सांगण्यांत यशोदाबाईचा खास कांहीं तरी गुप्त हेतु असला पाहिजे. आपणाविषयीं त्यांचा कांहीं तरी गैरसमज झाला असावा

हें खचित ! अशा प्रकारें आनंदीबाईच्या मनांत विचार घोळत होते. शेवटीं, नाहीं ह्मणणें त्यांच्या जीवावर येऊन त्या ह्मणाल्या "यशोदाबाई, तुमच्या मर्जीबाहेर मी नाहीं. मुलं तुह्मांपाशीं असण्यास माझी हरकत नाहीं."

आढेवेढे घेतल्याशिवाय आनंदीबाईनीं आपल्या ह्मणण्यास रुकार दिला, हें पाहून यशोदाबाईस थोडीशी लाज वाटली. कारण, त्यांनां वाटलें, कीं, आनंदीबाईस आपल्या मनांतील हेतु समजला असावा. आपल्या मनांत आनंदीबाईविषयीं भलताच ग्रह झाला, याविषयीं त्यांनां वाईट वाटलें.

आपल्या मुलांवर आनंदीबाईचें जें वजन आहे तें कमी करून त्यांच्या शिक्षणाची सर्व व्यवस्था आपणच आपल्या हातीं घ्यावी, ह्मणजे आपणास विशेष सुख होईल, असें यशोदाबाईला वाटलें, आणि ह्मणूनच त्यांनां विनायकरावांच्या घरीं एकटेंच जाण्यास यशोदाबाईनीं आग्रह केला होता; परंतु मुलांस ज्यांचा विशेष लळा असतो, त्यांपासून त्यांनां जितकें सुख होतें, तितकें दुसऱ्यापासून होत नाहीं, हें यशोदाबाईनां माहीत नव्हतें. कित्येक पुरुष व स्त्रिया बुद्धिमान् असतात; त्यांनां संसाराची काळजी विशेष असते; परंतु आपल्या मुलांनां शिक्षण कसें द्यावें, याचा त्यांनां चांगला अनुभव नसल्यामुळें त्यांच्या हातून चुका होतात, व त्यांचा प्रयत्न प्रथम निर्फल होऊन त्यांनां फार वाईट वाटतें; परंतु यांत वाईट वाटण्याचें अथवा आश्चर्य करण्याचें कारण नाहीं. या बाबतींत उतावळेपणा करून उपयोगीं नसतो.

आनंदीबाई संध्याकाळीं जेवावयास गेल्यावर यशोदाबाईनीं आरोग्य विषयावरील पुस्तक बाळ्यास वाचावयास सांगितलें. बाळ्यानें तें बरेंच चांगल्या रीतीनें वाचलें; परंतु एक वाक्य वाचल्यावर त्याचा अर्थ काय, हें समजण्यासाठीं तो मध्यें मध्यें थोडा वेळ थांबत असे. मधून मधून 'वातावरण ह्मणजे काय?' 'प्राणवायु काय असतो?' असे तो आईस वरचेवर प्रश्न विचारित असे, व जेथें जेथें त्याला समजत नसे तेथें तेथें तो थांबत असे. ही संवय त्याला आनंदीबाईनींच लाविली होती. परंतु ज्यांनां अशा प्रकारच्या गोष्टींचा अनुभव नसतो, त्यांनां यापासून संतोष न होतां उलट त्रास मात्र होतो. त्याप्रमाणें बाळ्या वाचतांना मधून मधून थांबे व वारंवार प्रश्न विचारी, याचा यशोदाबाईस त्रास वाटला. त्या त्रासून ह्मणाल्या "बाळ्या, एकसारखं वाच. मधें मधें मला विचारूं नकोस!"

बाळ्या वाचूं लागला; परंतु वाचतां वाचतां त्याला 'पाणी हें मनुष्याचें जीवन होय; ह्मणून त्याविषयीं काळजी घेणें हें प्रत्येक मनुष्याचें काम आहे.' असें एक

वाक्य आढळलें. त्यावरून तो ह्मणाला " आई, मावशीबाईनीं मला एकदा जीवन या शब्दाचा अर्थ पाणी असें सांगितलें आहे. तेव्हां पाणी हें पाणी आहे, ह्मणजे काय ग ? "

त्यावर काशी ह्मणाली " बाळ्या, जीवन या शब्दाचा एक अर्थ पाणी असा आहे, परंतु या ठिकाणीं जीवन म्हणजे जगण्याचें साधन असा अर्थ आहे. "

यशोदाबाई उतावीळ होऊन ह्मणाल्या " वाचतांना आपण मराठी भाषेंतील एकेका शब्दाचे किती किती अर्थ आहेत याविषयीं विचार करूं लागलों, तर कांहींच वाचन होणार नाहीं बाळ्याला पाहिजे असल्यास तो कोश पाहील किंवा कोणास तरी विचारील. बाळ्या, तूं अर्धा तास वाचतो आहेस, परंतु तुझं अर्धं पानसुद्धां संपलं नाहीं; यामुळं मला फारच कंटाळा आला आहे व तुझं वाचन नको असं वाटूं लागलं आहे. "

आईला आपल्या वाचनाचा कंटाळा आला, हें पाहून बाळ्यास फार वाईट वाटलें, व तो भरभर वाचूं लागला. आपण काय वाचित आहों, हें त्याला कांहींच समजलें नाहीं. तो शब्दचे शब्द सोडून देऊं लागला. लवकर वाचण्याचे नादांत चिन्हांकडे त्याचें मुळींच लक्ष्य नव्हतें. यामुळें सर्व घोटाळा होऊन कोणास कांहींच समजलें नाहीं. तेव्हां यशोदाबाई त्रासून ह्मणाल्या " बाळ्या, पुरे आतां तुझं वाचन ! जा जाऊन नीज आतां. "

हे ऐकून बाळ्यास फार वाईट वाटलें. माई व काशी स्तब्ध बसल्या. कोणी कांहींच बोलेना. शेवटीं यशोदाबाई ह्मणाल्या "काशी, तूं तरी वाच, ह्मणजे कांहीं करमणूक होईल."

शेजारीं तुकारामाचा गाथा पडला होता, तो काशीनें घेतला व आनंदीबाईनीं उत्तम अभंग ह्मणून जो सांगितला होता, तो ती पाहूं लागली. परंतु तिला तो सांपडेना, ह्मणून ती माईस ह्मणाली " माई, तुला तो माहीत आहे का ग ? तो आईस फार आवडेल, असं मावशीबाई ह्मणाल्या होत्या. "

माईला आठवण होऊन तिनें अभंग पाहून काढिला व तो ह्मणून दाखविला. तो अभंग असाः—

**आतां तरी पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥**
**सकळांचे पायां माझे दंडवत । आपुलालें चित्त शुद्ध करा ॥**

हित तें करावें देवाचें चिंतन । करूनियां मन एकविध ॥
तुका ह्मणे लाभ होय तो व्यापार । करा. काय फार शिकवावें ॥

काशीचा गळा फार चांगला होता, हें मागें सांगितलेंच आहे. तिनें हा अभंग फार मधुर स्वरानें ह्मणून दाखविला; त्यामुळें यशोदाबाईस फार समाधान वाटलें. त्यानंतर त्या माईस ह्मणाल्या "माई, तुला कांहीं येत आहे का?"

माईनें होय ह्मणून ह्मटलें व कांहीं ओव्या ह्मणून दाखविल्या.

जन्मा आलीयाचें फळ । कांहीं करावें सफळ ।
ऐसे न करितां निर्फळ । भूमीभार होय ॥
नरदेहाचें उचित । कांहीं करावें आत्महित ।
यथानुशक्ति चित्तवित्त । सर्वोत्तमीं लावावें ॥
हें कांहींच न धरी जो मनीं । तो मृत्युप्राय वर्ते जनीं ।
जन्मा येऊन तेणें जननी । वायांच कष्टविली ॥

माईनें ह्या ओव्या ह्मणून दाखविल्यावर बाळ्या ह्मणाला "आई, मला मावशीबाईनीं जे श्लोक शिकविले आहेत त्यांपैकीं एखादा मी ह्मणून दाखवूं का? तूं मला दसऱ्याचे दिवशीं कंठी, कडीं व मंदील हीं घालावयास दिलींस. त्यावेळेस मी तीं माईस दाखवावयास लागलों. ती रुसली होती, ह्मणून कांहींच बोलली नाहीं. तेव्हां मी तिच्यावर रागावलों. तें पाहून मावशीबाई ह्मणाल्या 'बाळ, मधुर व सभ्य भाषणानें पुरुषाला जी शोभा येते ती डागडागिन्यांनीं येत नाहीं.' असें सांगून त्यांनीं मला एक श्लोक लिहून दिला, व तो पाठ करून नेहमीं लक्ष्यांत ठेव ह्मणून सांगितलें. तो मला चांगला येतो."

यशोदाबाईनीं रुकार दिल्यावर बाळ्यानें तो ह्मणून दाखविला. तो असा:—

सद्रत्न-हार मणि ताइत बाहु दंडा ।
कीं स्नान चंदन फुलें अणि लांब शेंडी ॥
यांनीं खरी घडतसे पुरुषा न शोभा ।
वाणीच भूषण सु-शिक्षित-शब्दगर्भा ॥

मुलांनीं ह्मटलेल्या बोधपर कविता ऐकून यशोदाबाईनीं काशीस विचारिलें "तुह्मांला या सर्वांचा अर्थ येतो का?"

काशी ह्मणाली "आई, मावशीबाईंनीं त्यांचा अर्थ आह्मांला समजून सांगितला आहे. त्यांनीं आह्मांला तुकारामाच्या अभंगांपैकीं कांहीं निवडक अभंग, व दासबोधांतील ओव्यांपैकीं कांहीं निवडक ओव्या लिहून दिल्या आहेत, त्या आह्मी सर्वजण ह्मणत असतों."

माई ह्मणाली "आई, मावशीबाई रोज कांहीं लिहित बसतात; त्यावरून त्यांच्या मनांतून आह्मांला आणखी सांगायचं आहे, असं वाटतं."

हें ऐकून यशोदाबाई ह्मणल्या "मुलींनों! तुह्मांला माझ्या वयांत जास्त येईल असं वाटतं. तुह्मांला ज्याप्रमाणं शिक्षण मिळत आहे त्याप्रमाणं आमच्या वेळीं नव्हतं. मी तुमच्याएवढी असतां स्त्रियांस निराळ्या प्रकारचं शिक्षण मिळत होतं."

आपल्या आईस मावशीबाईंची स्तुति आवडणार नाहीं, हें माईचे लक्ष्यांत न येऊन ती ह्मणाली " आई, त्यावेळीं मावशीबाईसारख्या शिक्षक नसतील, नाहीं बरं?"

मुलांच्या तोंडून आनंदीबाईंची पुनः पुनः स्तुति ऐकून यशोदाबाईंस वाईट वाटलें; परंतु तें त्यांनीं बोलून दाखविलें नाहीं. त्या ह्मणाल्या "होय, कांहीं अंशीं तें खरं आहे. माझ्या वेळीं आनंदीबाईसारख्या स्त्रीशिक्षक नव्हत्या. आह्मांला आरोग्य वगैरे विषय शिकवित नसत, व हल्लीं ज्या प्रकारं नीतिशिक्षण व प्रपंचांत लागणाऱ्या उपयुक्त गोष्टींचं शिक्षण चालू आहे, तो प्रकार माझ्या वेळीं नव्हता. बरं तें असो. माई, आतां रात्र बरीच झाली आहे ह्मणून तूं व बाळ्या निजायास जा. काशी, तूं खालीं जाऊन वेणुबाईला घेऊन ये."

आईची आज्ञा होतांच बाळ्या व माई निजावयास गेलीं व काशी वेणुबाईंस घेऊन वर आली. तेव्हां यशोदाबाई त्यांनां ह्मणाल्या "आज त्र्यंबककर बोवांचं कीर्तन आहे. ते संगीताचे चालीवर फार उत्तम पदं ह्मणतात, अशी त्यांची ख्याति आहे. काशी, तूं कीर्तनास येतेस का? आपण लवकरच परत येऊं."

मुलांस कीर्तनास व नाटकास जाण्याची फार हौस असते. त्याप्रमाणें काशीच्या मनांत आईबरोबर जाण्याचें आलें. परंतु आपण रात्रीच्या बाहेर गेलों, तर आनंदीबाईंस बरें वाटणार नाहीं हें लक्ष्यांत येऊन ती ह्मणाली "आई, उद्यां मावशीबाईंस समजलं तर त्या मला राग नाहीं का भरणार?"

यशोदाबाई ह्मणाल्या "काशी, आनंदीबाई तुला राग भरूं लागल्या, तर माझं नांव सांग."

यावर काशी ह्मणाली "मग आई, बाळ्याला व माईला उठवूं का ? त्यांनां न बोलाविलं, तर तीं उद्यां मजवर रुसतील. ज्या वेळेस कांहीं मौजेची गोष्ट असते त्या वेळेस आह्मी सर्वजणं ती पाहतों. बाळ्या तर, कांहीं मौजेची गोष्ट असली ह्मणजे ती मला दाखविल्याशिवाय राहत नाहीं !"

यशोदाबाई धूर्त होत्या. आपल्या मुलांच्या मनावर आनंदीबाईच्या शिक्षणाचा काय परिणाम झाला आहे, हें त्यांनां कळून आलें; परंतु यावेळीं त्यांचें मन आनंदीबाईविषयीं शुद्ध नसल्यामुळें काशीच्या बोलण्याचा विशेष विचार न करितां त्या ह्मणाल्या "तुला यायचं असेल तर चल, नाहीं तर मी चालल्यें."

काशीनें लागलीच हो ह्मणून सांगितल्यावर यशोदाबाई वेणुबाईस ह्मणाल्या "वेणुबाई, तुह्मी आज घर सांभाळा. आनंदीबाई घरांत नाहींत व मीहि घरीं नाहीं, तेव्हां मुलांवर तुमची नजर असूं द्या. बाळ्या केव्हां केव्हां झोंपेंतून पाणी पिण्यासाठीं उठतो, त्याला थोडं स्वच्छ पाणी द्या. अन् मी परत येईपर्यंत तुह्मी निजूं नका बासनांतून माझं महेश्वरी कोरं लुगडं व काशीची अमदावादी कोरी चिरडी घेऊन या. आज कोरीं लुगडीं नेसून गेलं पाहिजे. कारण, आज गर्दी फार होईल व शिवाशिव होऊन विटाळ होईल."

यशोदाबाई आज काशीसह बाहेर जाणार, हें समजून वेणुबाईस फार आनंद झाला. त्यांनां वाटलें, आनंदीबाईच्यासंबंधानें आपली जी खटपट चालू होती तिचा परिणाम यशोदाबाईच्या मनावर थोडाबहुत तरी झाला आहे, यांत संशय नाहीं. आतां आपल्या मनाप्रमाणें लवकरच गोष्ट घडून येईल. हें मनांत येऊन आनंदाच्या भरांत त्या ह्मणाल्या "आज काशीबाई फार सुंदर दिसत आहेत ! त्या रात्रीच्या आज कीर्तनास जात आहेत हें मोठं नवल आहे."

या भाषणाकडे यशोदाबाईनीं विशेष लक्ष्य दिलें नाहीं. कारण, त्यांनां ठाऊक होतें, कीं, वेणुबाईचा बडबड करण्याचा स्वभावच आहे.

यशोदाबाई गेल्यावर वेणुबाईस आपला बेत सिद्धीस नेण्यास पुष्कळ वेळ सांपडला. बाळ्याला गाढ झोंप लागली होती. माई अर्धवट जागी होती, ह्मणून वेणुबाईनीं तिला उठविलें. नंतर वेणुबाई व दुसऱ्या कांहीं बायका सोंगट्या खेळत बसल्या. माईच्या मनांतून खेळावयाचें नव्हतें. ती ह्मणाली "मावशीबाईनां हें आवडणार नाहीं."

त्यावर दुसऱ्या बायका ह्मणाल्या "पण आनंदीबाईला कोण सांगायला जाणार आहे! अन् तुला आनंदीबाईंचा इतका धाक तरी कशाला पाहिजे?"

यावर माईनें कांहीं उत्तर केलें नाहीं. ती स्वस्थ खेळ पाहत बसली होती. हा खेळ बराच वेळ लांबला. इतक्यांत आनंदीबाई विनायकरावांचे घरून जेवून आल्या. त्यांनीं प्रथम मुलांविषयीं चौकशी केली. बाळ्या व माई हीं निजलीं आहेत व काशी आईबरोबर कीर्तनास गेली आहे, असें त्यांनां घरीं येतांच समजलें. यशोदाबाई मुलीस घेऊन रात्रीच्या बाहेर गेल्या हें पाहून आनंदीबाईस फार वाईट वाटलें. त्या निजावयास गेल्या, परंतु त्यांनां झोंप येईना. त्यांचें मन सारखें भ्रमण करूं लागलें. त्या स्वतःशींच ह्मणाल्या "काय हा यशोदाबाईंचा शहाणपणा! आज सकाळीं प्रकृति बिघडली असून व काल रात्रीं जाग्रण झालं असून पुनः जाग्रण करण्यास त्यांच्या मनांत शंका आली नाहीं, हें आश्चर्य आहे. बरं, आपण गेल्या तर गेल्या, परंतु मुलीला बरोबर घेऊन जायचं! काय हें आईचं शिक्षण! आह्मीं मुलींनां नावं कां ठेवावीं? पण आमचं आचरण कुठं पायाशुद्ध आहे?"

आमच्या स्त्रियांचें लक्ष्य गमतीकडे फार. अलीकडील कीर्तनापासून वस्तुतः मनाला किती बोध होतो? बोध व्हावा ह्मणून किती स्त्रिया कीर्तनास जातात? अलीकडे कीर्तनांतसुद्धां संगीताचें किती बंड शिरत चाललें आहे? नकला करून व ठरीव कोटया सांगून हंसविणारा बोवा जर संगीताच्या चालीवर गाणारा असला, तर मग विचारावयासच नको! बोवाचें एक सात्रक होवो अथवा दोन सात्रकें होवोत, नादी पुरुष व स्त्रिया कीर्तनास आहेतच! नकला करून लोकांस हंसविणें, अथवा संगीताच्या चालीवर गाऊन त्यांचें मनरंजन करणें, हा कीर्तनाचा खरा हेतु नव्हे. या गोष्टी करण्यासाठीं देवालयें हीं स्थलें नाहींत. अनीतीच्या आचरणाविषयीं पराङ्मुखता व तिरस्कार, आणि सन्मार्ग व सदाचार ह्यांविषयीं आसक्ति व प्रेम उत्पन्न करणें, हाच कीर्तनाचा खरा हेतु आहे. हा हेतु ज्या हरिकीर्तनानें सिद्धीस जात नाहीं तें कीर्तन नव्हे, व ती हरिकथाहि नव्हे. कीर्तनाचा खरा हेतु लक्ष्यांत न आल्यामुळें त्याचें मातेरें होईल कीं काय कोण जाणे! लोकांस आवडणाऱ्या व बोध करण्यास साधनीभूत होणाऱ्या अशा संस्था फार थोड्या असतात. कीर्तनाचे द्वारें सद्बोध करण्यास उत्तम साधन आहे;

आणि विद्वान्, शहाणा व प्रेमळ असा बोवा असेल, तर त्याच्या बोधाचा ठसा लोकांच्या मनावर उमटल्याशिवाय राहणार नाहीं; असला मनुष्य समाजास हळूहळू वळण देईल, यांत शंका नाहीं; परंतु हल्लीं कीर्तनास जें भलतेंच वळण मिळत आहे, त्यावरून कीर्तन हें मनोरंजन करण्याचें मात्र साधन होऊन बसेल कीं काय हें सांगवत नाहीं. आमच्यामध्यें ग्रामसमाज, पंचायत वगैरे उपयुक्त संस्था फार दिवस चालल्या होत्या; परंतु अलीकडे त्यांचा लय झाला आहे असें ह्मटलें तरी चालेल. त्याप्रमाणेंच या कीर्तनाचीहि स्थिति होणार असें दिसतें. लोकांचे डोळे वेळेवर उघडत नाहींत. अगदीं लय होण्याची वेळ दिसूं लागली, ह्मणजे पुनरुज्जीवन करण्याचें त्यांच्या मनांत येतें, ही दुःखाची गोष्ट आहे. इत्यादि विचार आनंदीबाईच्या मनांत येऊन त्यांनां झोंप येईना. आपणाविषयीं यशोदाबाईचा भलताच ग्रह झाला आहे, हें मनांत येऊन पतिवियोग व पुत्रवियोग ह्यांची आठवण होऊन आपण पुढें व्यवस्था काय करावी व आतां लोकांच्या घरीं किती दिवस रहावें, वगैरे विचार त्यांच्या मनांत एकामागून एक येऊन त्या फारच अस्वस्थ झाल्या व नानाप्रकारच्या कल्पना उभ्या राहून डोकें तापून गेलें. कांहीं केल्या त्यांनां झोंप म्हणून येईना. शेवटीं त्या अंथरणावरून उठल्या व दिवा लावून भगवद् गीतेंतील वेंचे वाचूं लागल्या. कांहीं वेळानें यशोदाबाई व काशी कीर्तनाहून परत आल्या. आनंदीबाईच्या खोलींत दिव्याचा उजेड पाहून काशी ह्मणाली "आई, मावशीबाईच्या खोलींत दिवा दिसत आहे, यावरून त्या घरीं आल्या असाव्या व कांहीं तरी वाचित बसल्या असाव्या."

आपण सकाळीं आजारी असतां रात्रीच्या वेळीं मुलीस घेऊन बाहेर गेलों, ही गोष्ट आनंदीबाईस कळूं नये अशी यशोदाबाईची फार इच्छा होती. जरी त्या स्वतंत्र होत्या व त्यांनां कोणाचा धाक बाळगण्याचें कारण नव्हतें, तरी आनंदीबाईच्या आचरणामुळें त्यांनां त्यांचा पुष्कळच वचक वाटत असे. आनंदीबाई येण्यापूर्वीं आपण घरीं परत येऊं, असें त्यांनां वाटलें होतें; परंतु त्या दिवशीं कीर्तनास उशिरां प्रारंभ झाल्यामुळें, व बोवांनीं मंडळीचा रंग पाहून हास्यरसाची गर्दी करून सोडल्यामुळें, कीर्तन नेहमींपेक्षां उशिरां आटोपलें. यशोदाबाई काशीस घेऊन आनंदीबाईच्या खोलींत गेल्या; परंतु आनंदीबाई वाचण्याच्या नादांत मग्न झाल्या होत्या.

**न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे॥**

हा श्लोक वाचून

**" कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।**
**मा कर्म फलहेतुर्भू मा ते संगोऽस्त्वकर्मणि॥"**

हा श्लोक त्या पुनः पुनः वाचित होत्या, तों त्यांची दृष्टि यशोदाबाईकडे गेली. त्यांनां पाहून हातांतील पुस्तक दूर ठेवून आनंदीबाई उठून बसल्या. यशोदाबाई ह्मणाल्या " मला वाटलं होतं, कीं, आज बहुतकरून तुमचं येणं होणार नाहीं; डाक्टरसाहेबांची बायको तुह्माला रहाण्याविषयीं आग्रह करील."

आनंदीबाई म्हणाल्या "होय. तुह्मी ह्मणतां तें खरं आहे. डाक्टरसाहेबांनीं व त्यांच्या बायकोनं मला फार आग्रह केला; परंतु रात्रीस दुसऱ्याच्या घरीं राहणं मला बरं वाटलं नाहीं. दुसरं असं, कीं, मुलांच्या आज फार दिवसांच्या सहवासानं त्यांच्याशिवाय मला झोंप येत नाहीं. बाळ व माई यांनां माझ्या-शिवाय चैन पडत नाहीं. तेव्हां मुलांनां टाकून आपण दुसऱ्याच्या इथं फार वेळ रहावं, हें सर्व प्रकारं मला गैर वाटलं, म्हणून मी लवकर आल्यें; परंतु इथं येऊन पहात्यें, तों, बाळ व माई हीं निजलीं आहेत व वेणुबाईस त्यांच्याकडे लक्ष्य देण्यास तुह्मीं ताकीद दिली आहे, असं समजलं. यावरून असं करण्यांत तुमचा कांहीं उद्देश असावा असं समजून मी इथं येऊन निजल्यें; परंतु झोंप न आल्यामुळं वाचित पडल्यें होत्यें."

हें भाषण ऐकून यशोदाबाईस वाटलें, कीं, आपल्या मनांतील हेतु आनंदी-बाईस समजून चुकला असावा. वेणुबाईच्या सांगण्यावरून या साध्वीविषयीं आपला ग्रह वाईट झाला, हा आपला कृतघ्नपणा आहे, असें त्यांनां वाटूं लागलें. त्या मनांत ह्मणाल्या "आपण करतों हें चांगलं करित नाहीं; परंतु वेळ आली ह्मणजे भूल पडून जाते, त्याला इलाज चालत नाहीं; तथापि, पहिल्यापेक्षां माझी बरीच संवय कमी झाली आहे."

आपल्या मनांत चाललेल्या विचारांची आनंदीबाईस कल्पना होऊं नये ह्मणून यशोदाबाईनीं गोष्ट बदलली व त्या आनंदीबाईस ह्मणाल्या " बरं पण, इतक्या रात्रीं तुह्मी काय वाचित होतां?"

आनंदीबाई ह्मणाल्या "नुकतंच एक पुस्तक छापून प्रसिद्ध झालं आहे, त्यांत थोर पुरुषांच्या उक्तींचे वेंचे दिले आहेत. त्यांपैकीं भगवद्गीतेंतील वेंचे मी वाचित होत्यें. त्यांत '**न जायते म्रियते वा कदाचित्**' ह्मणजे ईश्वरास जन्ममरण नाहीं, तो नित्य, शाश्वत व पुराण आहे वगैरे जें ईश्वराविषयीं निरूपण केलें आहे तें वाचून

**'जया मानला देव तो पूजिताहे ।**
**परी देव शोधून कोणी न पाहे ॥**
**जगीं पाहतां देव कोट्यानुकोटी ।**
**जया मानली भक्ति जे तेचि मोठी ॥**
**तिन्ही लोक जेथून निर्माण झाले ।**
**तया देवरायासि कोणी न बोले ॥'**

या रामदासाच्या वचनाची आठवण होऊन खरी स्थिति एक आहे, व सध्या लोकांत प्रचार निराळा असून दुराग्रह आणि अज्ञान यांनीं लोकांचें मन ग्रासून जाऊन धर्माच्या बाबतींत बखेडा झाला आहे. अशी स्थिति असतां मुलांनां धर्मसंबंधीं शिक्षण द्यावयाचं असल्यास कसं द्यावं, या विचारांत मी होत्यें; परंतु या विषयाविषयीं आणखी विचार करून व तुमचं काय ह्मणणं आहे तें ऐकून घेऊन उद्योगास लागणं बरं, असं मला वाटलं. तथापि सध्या त्या पुस्तकांतील वचनांचा बोध करण्यास हरकत नाहीं, असं समजून त्याप्रमाणं मीं मुलांस कांहीं वचनं शिकविलीं आहेत व आणखी कांहीं शिकवावीं असं मला वाटतं. कारण, नरदेहाची खरी योग्यता, सप्रेमभक्ति, हितोपदेशश्रवण, विवेक, चित्तशुद्धि, दृढभाव, मनोनिग्रह, इंद्रियदमन, ईश्वरनिष्ठा व परोपकार हें धर्माचं सार होय. हें साधारणपणं नव्यांस व जुन्यांस मान्य आहे. याविषयींचा उपदेश या वचनांत केलेला दिसून येतो. तेव्हां या वचनांचा उपदेश करण्यास सध्या मला कांहीं हरकत दिसत नाहीं. स्थलपरत्वें कदाचित् यांत कांहीं ठिकाणीं दोष असतील, परंतु त्यांविषयीं सावकाश विचार करण्याचं माझ्या मनांत आहे."

यावर काय उत्तर द्यावें, हें यशोदाबाईस सुचेना. आपण नेहमीं भाकड कथा ऐकतों, त्यापेक्षां जर घटका दोन घटका आनंदीबाईजवळ बसलों, तर विशेष फायदा होईल, असें त्यांनां वाटलें. त्या ह्मणाल्या "बरें पण आनंदीबाई, आह्मी आलों त्या वेळेस तुह्मी दुसरंच कांहीं वाचित होतां."

आनंदीबाई ह्मणाल्या "होय, बरं आठवलं. मी जें मुख्यत्वें तुह्माला सांगणार होत्यें, तें विसरल्यें. **'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन'** हा श्लोक मी वाचित होत्यें. याचा भावार्थ असा आहे कीं, कोणतेंहि काम फलाच्या आशेनं करूं नये. कित्येक वेळां फल मिळेल, कित्येक वेळां मिळणारहि नाहीं; पण फल मिळणार नाहीं, ह्मणून स्वकर्म न करणं हें वेडेपण आहे. तुमच्या भयास्तव, अथवा तुमची मर्जी संपादन करण्याकरितां, अथवा तुमच्यापासून कांहीं प्राप्ति व्हावी या हेतूनं, माझं जें कांहीं कर्तव्य आहे तें मीं न करणं, हा वेडेपणा होय, असा या श्लोकाचा भावार्थ आहे. हें महातत्त्व मुलांच्या मनांवर ठसविणं फार अगत्याचं आहे. कारण, आजपर्यंत मी जें त्यांचं वर्तन पाहत आहें, त्यावरून मी रागं भरेन ह्मणून, किंवा मला आवडणार नाहीं ह्मणून, अथवा मी शाबासकी देईन ह्मणून, तीं पुष्कळ गोष्टी करित असतात; आपलं कर्तव्य समजून फारच थोड्या गोष्टी करितात. परंतु हें चांगलं नाहीं, असं मला वाटतं. कारण, मी आज आहें, उद्यां नाहीं. मी कांहीं त्यांच्या साऱ्या जन्माला पुरल्यें नाहीं. स्वकर्मा-विषयीं एकदा मुलांच्या मनांत आवड उत्पन्न झाली, ह्मणजे मग पदोपदीं त्यांच्या-वर नजर ठेवण्याचं कारण नाहीं. असो. तुह्माला कालच व आजचं जाग्रण झालं आहे, ह्मणून तुह्मी निजा आतां, मीहि झोंप आली तर पाहत्यें. आतां माझं डोकं उतरलं आहे असं मला वाटतं. स्वकर्म या विषयावर एक सुंदर निबंध माझ्या पाहण्यांत आला आहे, तो मी तुह्माला सवडीप्रमाणं वाचून दाखवीन."

यशोदाबाई व काशी हें भाषण लक्ष्यपूर्वक ऐकत होत्या. आनंदीबाईनीं स्वकर्माविषयीं जे विचार सांगितले, ते काशीच्या मनांत घोळूं लागले. आनंदी-बाईच्या कळकळीविषयीं यशोदाबाईची आतां पूर्ण खात्री झाली. आपणापासून कांहीं लाभ व्हावा अशी त्यांची बिलकुल इच्छा नसून, केवळ निष्कामबुद्धीनें आणि प्रेमळ अंत:करणानें आपल्या मुलांची त्या व्यवस्था करित असतां, आपण त्यांच्याविषयीं परोपकारबुद्धि न दाखवितां उलट हलक्या लोकांच्या नादीं लागून त्यांना पाण्यांत पाहतों, याला काय ह्मणावें? लोक तरी आपणाला काय ह्मणतील? हे व अशाप्रकारचे विचार मनांत येऊन यशोदाबाईस फार खेद वाटला, व आपण आपल्या वर्तनाबद्दल आनंदीबाईची क्षमा मागावी, असेंहि त्यांना वाटलें. इतक्यांत बाळ्याचें ओरडणें ऐकूं आलें. तो कां ओरडतो तें पाहून ये, असें त्या काशीस सांगणार, तोंच त्यांना व आनंदीबाईनां पुन: आरोळी ऐकूं आली,

तेव्हां त्या घाबरल्या. प्रथम यशोदाबाईस वाटलें, कीं, बाळ्या झोंपेंत भ्याला असेल. नंतर त्यांनां वाटलें, कीं, कदाचित् त्याला कांहीं चावलेंबिवलें असेल. आनंदीबाईंचा तर्क निराळाच होता; परंतु त्या विचार करित स्वस्थ न बसतां लागलीच उठल्या व दिवा घेऊन बाळ्या जेथें निजला होता तेथें गेल्या. पाहतात, तों तेथें माई मात्र रडत बसली आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. "बाळ कुठं आहे?" ह्मणून माईस विचारल्यावर माईनें भीत भीत उत्तर केलें, कीं, " बाळ्या वेणुबाईंच्या हातून निसटून खालीं पळत गेला व वेणुबाई त्याच्या पाठोपाठ गेल्या."

हें ऐकून आनंदीबाईस भय वाटून त्या बाळ्याच्या शोधार्थ गेल्या. "वेणुबाईंच्या खोलींत बाळ्या नाहीं," असें काशीनें यशोदाबाईस सांगितल्यावर तर यशोदाबाई फारच घाबरल्या. इतक्यांत बाळ्या तेथें आला व त्यानें आपलें अंग धाडकन् बिछान्यावर टाकून दिलें. बाळ्या आला ह्मणून काशीनें यशोदाबाईस सांगितलें, तरी त्या शुद्धीवर आल्या नाहींत !

आतां हा सर्व प्रकार कां व कसा झाला, हें समजण्याविषयीं वाचकांची इच्छा असेल, हें उघड आहे. आह्मीं मागें सांगितलेंच आहे, कीं, वेणुबाईंच्या मनांतून आनंदीबाई नकोशा होत्या, व त्यांनां घालवून देण्याविषयीं त्यांचा सारखा उद्योग चालू होता. वेणुबाईंनीं अनेक उपाय केले, परंतु प्रत्येक मसलत त्यांच्या अंगावरच आली. यामुळें त्यांनां वाईट वाटून त्यांनीं व दुसऱ्या बायकांनीं असें मनांत आणिलें, कीं, आपणांस आनंदीबाई शिकवावयास नको, असें मुलांकडून यशोदाबाईस सांगवावें. आनंदीबाईविषयीं यशोदाबाईचें मन शुद्ध नाहीं, तेव्हां हा उपाय केला असतां आपलें काम होईल, असें त्यांनां वाटलें; परंतु मुलें नेहमीं आनंदीबाईपाशीं असतात, तेव्हां त्यांनां आपलींशीं कशीं करून घेतां येतील, या फिकिरींत त्या होत्या. परंतु आनंदीबाई त्या रात्रीस जेवावयास गेल्यामुळें व यशोबाईहि कीर्तनास गेल्यामुळें, त्यांनां संधि सांपडली. यशोदाबाई गेल्यावर वेणुबाईंनीं आपल्या नेहमींच्या मैत्रिणी जमविल्या व त्या त्यांच्याबरोबर सोंगट्या खेळत बसल्या. बाळ्या हिरवट आहे, तेव्हां तो आपलें ऐकणार नाहीं, असें समजून वेणुबाईंनीं माईस खेळण्यासाठीं उठविलें. कांहीं केल्या माई तें कबूल करीना. शेवटीं इतर बायकांनीं पुष्कळ सांगितल्यावरून ती खेळ पाहत बसली. खेळ चालू असतां मधून मधून बायकांनीं आनंदीबाईंची निंदा चालविली

होतां. त्यांपैकीं एक ह्मणाली " इतक्या दिवस लोकांच्या घरीं राहण्यास हिला लाज कशी वाटत नाहीं? यशोदाबाई भिडस्त ह्मणून बोलत नाहींत, मी असत्यें तर हिला केव्हांच घालवून दिलं असतं! बरं पण, हिनं गरिबीनं रहायचं; परंतु तसं न करितां हिचा घरामध्यें सर्वांवर पगडा."

यावर दुसरी ह्मणाली "मुलींस शिकविण्यासाठीं ही पाहिजे आहे कशाला? हिला येतं आहे काय? आजपर्यंत जें आह्मीं पाहिलं नाहीं, तें ही शिकवित बसते! मुलींनां शिकून काय करायचं आहे? त्यांनां रोजगार का करायचा आहे? त्या उद्यां मोठ्या झाल्या, ह्मणजे नवऱ्यालासुद्धां जाबसाल करण्यास चुकणार नाहींत."

तिसरी ह्मणाली " मुली कुणाच्या आणि हिचा त्यांनां इतका धाक कां?"

अशा प्रकारें वेणुबाईच्या मैत्रिणींनीं आनंदीबाईची बरीच निर्भर्त्सना केली. परंतु माई स्वस्थ बसली होती. शेवटीं वेणुबाई तिला ह्मणाल्या " माई, तुला आनंदीबाईचा इतका धाक कशाला पाहिजे? उद्यांपासून तुमची सर्व व्यवस्था मीच करित जाईन. आनंदीबाई आह्मांलां शिकवावयास नको, असं आईस तूं सांग ह्मणजे झालं."

हें ऐकून माईनें उत्तर केलें "तुह्मी मला भलभलतं शिकवूं नका. मी आईला सांगेन." असें ह्मणून ती स्वस्थ बसली.

हें चाललें आहे, तों आनंदीबाई परत आल्याचें वेणुबाईस समजलें; परंतु त्यांनीं त्यांच्याविषयीं यत्किंचितहि विचारपूस केली नाहीं. त्या मनांत ह्मणाल्या " हिची इतकी प्रतिष्ठा पाहिजे कशाला? आली असेल तर निजल. हिच्या पुढं पुढं करण्याचं मला काय कारण आहे?" असें ह्मणून त्या खेळावयास लागल्या.

वेणुबाईनीं व इतर बायकांनीं माईचें मन वळविण्याविषयीं होती तेवढी पराकाष्ठा केली; परंतु त्यांनां यश आलें नाहीं. बाळ्या आपल्या संवयीप्रमाणें पाणी पिण्यास उठला. वेणुबाईनीं त्याला पाणी प्यावयास दिलें. परंतु माई खेळत बसली आहे हें त्याच्या दृष्टीस पडतांच तो ह्मणाला " माई, तूं अजून निजली नाहींस का? तूं सोंगट्या खेळत बसली आहेस वाटतें? मावशीबाईनां हें समजलें, तर त्या तुला रागें नाहीं का भरणार?"

माई ह्मणाली "बाळ्या, मी खेळत आहें, का उगीच पाहत बसल्यें आहे रे!"

" तूं निजलीस होतीस; मग उठलीस कां?"

"मी निजल्यें होत्यें, परंतु वेणुबाईनीं मला उठविलं व खेळायास चल ह्मणून सांगितलं. मी कवड्यांस शिवल्येंसुद्धां नाहीं. मी उगीच पाहत बसल्यें आहें."

"पण तूं कां रडत आहेस? जर तूं आतां निजशील, तर मी मावशीबाईंस सांगणार नाहीं."

हें भाषण ऐकून त्या बायकांपैकीं एकजण ह्मणाली "काय त्या मावशीबाईंचा दिमाक दाखवितो आहे!"

हे शब्द बाळ्यास सहन झाले नाहींत. तो कांहीं बोलणार, इतक्यांत आपल्या तापटपणाबद्दल आनंदीबाईनीं आपल्याला काय सांगितलें होतें, हें त्याला आठवून आत्मसंयमन करून तो स्वस्थ बसला व निजावयास गेला; परंतु माई रडत आहे असें त्याच्या दृष्टीस पडल्यावर तो पुनः उठून बसला व त्यानें माईस रडण्याचें कारण विचारिलें. माई ह्मणाली "मी निजत होत्यें, परंतु वेणुबाई मला मघांपासून मलभलतं ह्मणण्यास शिकवितात. मावशीबाई शिकवावयास नकोत, मीच तुह्मांला उद्यांपासून शिकवित जाईन असं आईस सांग, असं ह्मणतात! मी असं कधीं ह्मणणार नाहीं, असं मीं सांगितलं; परंतु त्यांनीं माझा पिच्छा पुरवला आहे व त्या मला निजूं देत नाहींत!"

ही हकीगत ऐकून बाळ्यास फार राग आला. वेणुबाई त्याला पूर्वीं शिकवित असत त्या वेळेस त्याला त्यांचा पूर्ण अनुभव आला होता; ह्मणून मावशीबाई नकोत असे शब्द ऐकून तो खवळला व वेणुबाईंस ह्मणाला "तूं भलभलतं आह्मांस शिकवितेस. थांब, मी हें सारें आईला जाऊन सांगतों!" असें ह्मणत तो चटकन उठून जावयास लागला.

यशोदाबाई परत आल्या, हें वेणुबाईंस माहीत नव्हतें. बाळ्या खरोखर आईकडे जाईल व ती दृष्टीस पडली नाहीं तर आनंदीबाईला सर्व प्रकार सांगेल, आणि हें चांगलें होणार नाहीं, असें त्यांनां वाटलें; ह्मणून बाळ्या जावयास निघाला असतां त्यांनीं त्याचा हात धरून त्याला मागें ओढिलें. तो नेटानें पुढें जाऊं लागला, वेणुबाई त्याला मागें ओढूं लागल्या; तो ओरडूं लागला. हें ओरडणें आनंदीबाईस ऐकूं जाईल या भीतीनें वेणुबाईनीं बाळ्याचें तोंड दाबून धरिलें. तेव्हां तो पूर्वीपेक्षां जास्त मोठ्यानें ओरडूं लागला. वेणुबाईंस आतां भीति वाटली. त्यांनीं त्याच्या तोंडावरचा हात काढिला व त्या त्याला समजावूं लागल्या; परंतु तो त्यांच्या हातून निसटून जिन्याकडे पळत गेला. हा अंधेराचा कोठें तरी

पडेल व भलतेंच कांहीं तरी होईल, ह्मणून वेणुबाई त्याच्या मागोमाग गेल्या. बाळ्या जिना उतरून खालीं आला व माजघरांतून पुढील चौकांत गेला. तेथें आनंदीबाईच्या खोलींत दिवा पाहून तो वर गेला व आईला पाहून मागें सांगितल्याप्रमाणें त्यानें आपलें अंग धाडकन् बिछान्यावर टाकून दिलें. यशोदाबाई आल्यामुळें नोकरचाकर जागे झाले होते. त्यांनीं यशोदाबाई आल्याची खबर वेणुबाईस सांगितली. त्यावरून वेणुबाई वर न जातां मागच्या मागें गेल्या. इकडे आनंदीबाई बाळ्याचा तपास करित करित आपल्या खोलींत आल्या व पाहतात तों, बाळ्या व यशोदाबाई अंथरुणावर पडलीं आहेत, असें त्यांच्या दृष्टीस पडतांच त्या घाबरल्या. त्यांनीं पाणी आणून प्रथम बाळ्याचे डोळ्यास लाविलें, व त्याला सावध केलें. तो खरोखर बेशुद्ध नव्हता. संतापानें लाल होऊन व आईस बेशुद्ध पाहून त्यानें अंग टाकून दिलें होतें. नंतर आनंदीबाईनीं यशोदाबाईस सावध केलें. यशोदाबाई आतां उठून बसल्या. त्यांची बाळ्याकडे नजर गेली; परंतु बाळ्याची कावरीबावरी मुद्रा पाहून त्यांनीं काय झालें ह्मणून विचारिलें. बाळ्या कांहीं एक बोलेना. आपण रुसलों आहों हें आनंदीबाईनीं पाहिलें,ह्मणून त्याला लाज वाटली. दुसरें असें, कीं, आपण ओरडलों व वेणुबाईच्या हातून निसटून पळून आलों, या आपल्या वर्तनाबद्दल आनंदीबाईस वाईट वाटेल,त्या आपणास रागें भरतील किंवा शाबासकी देतील,हें न समजून तो स्वस्थ बसला. यशोदाबाईनीं त्याला पुनः विचारल्यावरून त्यानें सर्व हकीगत सांगितली. ती ऐकून त्यांना संताप आला व तो न आवरून त्यांनीं वेणुबाईची निर्भर्त्सना केली. त्या वेळेस आनंदीबाई ह्मणाल्या "आतां रागावण्यांत काय उपयोग आहे? खरी हकीगत काय आहे ती अगोदर समजून घेतली पाहिजे. बाळ मात्र इथं आहे. त्याला जी हकीगत सांगायची होती ती त्यानं सांगितली आहे; परंतु त्याच्याच ह्मणण्यावरून वेणुबाईविषयीं निकाल करणं, बरोबर होणार नाहीं!"

यशोदाबाई आवेशानें ह्मणाल्या "मग बाळ्यानं सांगितलं तें सर्व खोटं, असं तुह्माला वाटतं कीं काय?"

आनंदीबाई ह्मणाल्या "नाहीं, नाहीं, बाळ खोटं सांगेल, असं मला मुळींच वाटत नाहीं! परंतु कदाचित् रागाच्या सपाट्यांत त्याचा गैरसमज झाला असेल. तेव्हां वेणुबाईचं ह्मणणं काय आहे, हें ऐकून घेणं चांगलं. माईहि तिथं होती, ह्मणून ती काय सांगते, तें आपण ऐकून घेऊं."

यावर यशोदाबाई ह्मणाल्या " वेणुबाई आणखी अधिक काय सांगणार?"

" वेणुबाई अधिक कांहीं सांगतील ह्मणून त्यांना बोलवायचं नाहीं, तर कोणत्याहि गोष्टींत व विशेषेंकरून महत्त्वाच्या गोष्टींत, उभयपक्षांचं ह्मणणं ऐकून घेतल्याशिवाय एखादी गोष्ट करण्यास प्रवृत्त होणं योग्य नाहीं. असं करणं अविचाराचं आहे. तुह्माला जें योग्य दिसेल तें तुह्मी करा; परंतु उभयपक्षांस आपली हकीगत सांगण्यास सवड देणं, हें आवश्यक आहे."

" आनंदीबाई, तुमची वृत्ति नेहमीं शांत असते, यामुळं तुमच्या हातून फारसा अविचार होत नसेल. रागाच्या भरांत ही सोपी गोष्ट मला सुचली नाहीं. तुह्मी ह्मणतां हें खरं आहे. कारण, रागाच्या भरांत मीं जर वेणुबाईस आज घरांतून जा ह्मणून सांगितलं असतं, तर मोठा अविचार झाला असता. मुलांच्या सांगण्यावरून मीं हा अविचार केला, असं तिला वाटलं असतं व लोकांनींहि तसंच ह्मटलं असतं."

असें बोलून यशोदाबाईनीं लागलीच वेणुबाई व माई ह्यांनां बोलवावयास काशीला पाठविलें. काशी दाराशीं गेली, तों वेणुबाई आडून सारें ऐकत आहेत, असें तिच्या दृष्टीस पडलें. तेव्हां ती मोठ्यानें ह्मणाली "आई, ह्या पहा वेणुबाई इथंच आहेत!"

काशीचें हें भाषण ऐकून यशोदाबाईच्या मनांत संशय आला, कीं, आपण जें बोलत होतों तें सर्व हिनें ऐकिलें. वेणुबाई लागल्याच आंत आल्या व दीन मुद्रा करून त्यांनीं यशोदाबाईचे पाय धरले. हें पाहून यशोदाबाई ह्मणाल्या "वेणुबाई, बोलणीं मानभावाचीं अन् करणी कसाबाची, अशी तुमची वागणुक दिसते! तुह्मी आडून कशाकरितां ऐकत होतां? इथं आह्मी चोरून का बोलत होतों? तुह्मी फारच कृतघ्न आहां! आनंदीबाईच्या मनांत तुमच्याविषयीं मुळींच वैर-भाव दिसत नाहीं; परंतु तुह्मी तर त्यांनां इथून घालवून देण्यास तयार झालां! असं असून त्या तुमच्या तर्फेनं बोलत आहेत. तेव्हां माझ्या पायां पडण्यापेक्षां त्यांच्या पायां पडलां असतां, तर बरं झालं असतं!"

हें ऐकून वेणुबाईस फारच शरम वाटली. यशोदाबाईचे पाय धरण्यांत त्यांच्या मनाला कांहीं वाटलें नाहीं; परंतु जिला आपण घालवून देण्याच्या उद्योगांत आहों, तिच्या उपकारामुळेंच आज आपली सुटका व्हावी, ही गोष्ट त्यांच्या मनाला फारच खाऊं लागली.

आनंदीबाईनीं हें तेव्हांच ताडिलें, ह्मणून त्या स्वस्थ बसल्या. इतक्यांत काशी माईस घेऊन आली. माई फारच भ्याली होती, व आनंदीबाईस पाहून तर तिला लाज वाटून ती खालीं मान घालून मुकाट्यानें बसली. यशोदाबाईनीं विचारलें " माई, तुला काय माहीत आहे तें सांग, भिऊं नकोस."

माईनें सर्व हकीगत सांगितल्यावर वेणुबाईनीं आपली चूक कबूल केली व यशोदाबाईपुढें पदर पसरला. यशोदाबाईस वेणुबाईच्या या वर्तनाचा अत्यंत तिटकारा आला व त्या तिला रागें भरणार, इतक्यांत आनंदीबाई ह्मणाल्या " आतां रात्र फार झाली आहे, उद्यां सावकाश या गोष्टीचा विचार करतां येईल."

यशोदाबाईस हें बरें वाटलें नाहीं. त्यांच्या मनांतून त्या गोष्टीचा लागलाच निकाल करावयाचा होता; परंतु आनंदीबाईपुढें त्यांचा इलाज चालला नाहीं. रागाच्या सपाट्यांत मनुष्याच्या हातून अविचाराचें वर्तन होण्याचा संभव असतो. एकदा राग निघून गेला, ह्मणजे पोक्त विचार करून काय तें करण्यास मनुष्यास सवड सांपडते. प्रथम जे विचार मनांत येतात त्यांत झटका फार असतो; परंतु कांही वेळ जाऊं दिला असतां त्यांत बदल होतो व पूर्वीं उतावळेपणानें केलेल्या कृत्याबद्दल पश्चात्ताप होतो, हें समजून वेणुबाईविषयींचा विचार आनंदीबाईनीं मुद्दाम दुसरे दिवसावर टाकिला.

नंतर सर्वजणं निजावयास गेलीं; परंतु वेणुबाईस कांहीं झोंप आली नाहीं. त्यांचें मन त्यांनां खाऊं लागलें. यशोदाबाईनीं आपणास घालवून दिलें, तर आपणास कोठेंहि थारा मिळणार नाहीं, लोकांच्या घरीं मोलमजुरी करून पोट भरण्याचा प्रसंग येईल, ही गोष्ट मनांत येतांच त्यांनां आपल्या कृतकर्माबद्दल पश्चात्ताप झाला व बायकांच्या नादीं लागून आपण आपली मात्र फजिती करून घेतली, असें आतां त्यांनां वाटूं लागलें. लोक आपणासच हंसतील, आपल्याला सल्लामसलत देणाऱ्या बायका नामानिराळ्या राहतील, व प्रसंगवशात् मौज पहावयासहि तयार होतील! इत्यादि विचारांनीं त्यांच्या मनांत काहूर मांडून त्यांनां त्या रात्रीं झोंप ह्मणून येऊं दिली नाहीं. उजाडल्यावर आनंदीबाईची गांठ घेऊन त्यांची क्षमा मागावी, असा विचार वेणुबाईनीं मनांत आणिला. आनंदीबाई थोर मनाच्या आहेत, तेव्हां त्या आपणास क्षमा करण्यास व आपणाबद्दल यशोदाबाईपाशीं रदबदली करण्यास अनमान करणार नाहींत, अशी

त्यांच्या मनाची खात्री होती; तथापि हा विचार त्यांनां बरोबर वाटला नाहीं. सुंभ जळेल पण पीळ नाहींसा होणार नाहीं, या ह्मणीप्रमाणें आनंदीबाई-विषयीं त्यांच्या मनांतील पीळ नाहींसा झाला नव्हता. वेणुबाई अंथरुणावर बराच वेळ पडून राहिल्या. चांगलें फटफटलें, घरांत माणसांची चाहूल सुरू झाली, रस्त्यांत गाड्यांच्या चाकांचा व माणसांचा शब्द ऐकूं येऊं लागला, तथापि वेणुबाईंच्या डोळ्याशीं डोळा लागला नाहीं. शेवटीं, जें होणें असेल तें होईल, असा मनाचा निश्चय करून त्या उठल्या व आपल्या कामाला लागल्या.

दिवस बराच वर आल्यावर यशोदाबाई उठल्या. वेणी घालण्यासाठीं यशोदा-बाईंचें आतां बोलावणें येईल, मग येईल, ह्मणून वेणुबाईंनीं बरीच वाट पाहिली; परंतु बोलावण्यास ठिकाण नाहीं! शेवटीं वेणुबाईंस वाटूं लागलें, कीं, यशोदाबाई आपल्या हातानेंच वेणीफणी करावयास लागल्या, तर मग या घरांत आपलें कांहींच कारण राहणार नाहीं; तेव्हां जरी आपल्याला अजून त्यांचें बोलावणें आलें नाहीं, तरी आपणहोऊन जाऊन विचारावें.असा विचार करून त्या यशोदा-बाईंच्या खोलींत गेल्या व "मला अंग धुवायचं आहे, तेव्हां तुह्माला कांहीं पाहिजे का ?" ह्मणून यशोदाबाईंस त्यांनीं विचारिलें.

यशोदाबाईंनीं यावर गंभीरपणानें उत्तर केलें "मला कांहीं एक नको ! तुह्मी खुशाल आंघोळ करून घ्या. काशीला व माईला मात्र इकडे पाठवून द्या."

काशी व माई येतांच त्या सर्वजणी आनंदीबाईंच्या खोलीजवळ गेल्या व पहातात, तों बाळ्या हातांत पाटी घेऊन दाराशीं उभा आहे. त्याला विचारतांच त्यानें सांगितलें, कीं, "मावशीबाई कांहीं कामांत आहेत ह्मणून मी बाहेर उभा राहिलों आहें."

हें उत्तर ऐकून यशोदाबाईंस फार आनंद झाला. त्या तशाच आंत जाऊन आनंदीबाईंस ह्मणाल्या "तुमचा शिष्य दाराशीं उभा आहे, त्याला आंत घेऊन येऊं का ? सावकाश वाचण्याबद्दल काल मी त्याला उगीच रागं भरल्यें. खरं ह्मटलं, तर त्यांत त्याचा कांहींएक दोष नव्हता. माझं मन स्वस्थ नव्हतं, यामुळं मला त्रास वाटला. आतां त्याला काय पाहिजे तें विचारा. काल रात्रीं त्याचं वर्तन जसं असावं तसं होतं. तो ओरडला, हा त्याचा दोष नव्हता. त्याच्याकडे कांहीं अपराध होता, असं मला वाटत नाहीं."

आईच्या तोंडचे हे शब्द एकून बाळ्याची मुद्रा प्रफुल्लित झाली; परंतु माईवर सर्वांची नजर आहे व तिनें वेडेंवांकडें तोंड केलें आहे, हें पाहून त्याला वाईट वाटलें. आनंदीबाईनीं त्याला आंत बोलाविलें. त्याची पाटी पाहून "तुझी रीत व उत्तर हीं दोन्हीं बरोबर आहेत व तूं आंकडे नीट मांडिले आहेस," असें म्हणून त्यांनीं त्याला शाबासकी दिली.

यशोदाबाई आनंदीबाईकडे कांहीं कामासाठीं आल्या होत्या व त्यांच्या मनांतून कांहीं बोलावयाचें होतें; परंतु बाळ्यानें तें ऐकावें, हें त्यांनां बरें वाटलें नाहीं. ह्मणून त्यांनीं आनंदीबाईस हळूच सांगितलें "बाळ्याचं सध्या इथं कारण नसल्यास त्याला जाऊं द्या."

एखादा मनुष्य जवळ नको असला, ह्मणजे कित्येक लोक नाना प्रकारच्या बतावण्या करून त्याला वाटेस लावित असतात, व हें करणें त्यांनां चांगलें वाटतें. दुसऱ्याला जा ह्मणून सांगितलें असतां त्याला राग येईल, हें त्यांनां समजतें; परंतु आपलें वर्तन कांहीं अंशीं लबाडीचें होतें, हें त्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं. मुलें आपलें वर्तन पाहून तोच कित्ता गिरवितील व आपल्याच कृतीचें अनुकरण करतील, हा त्यांनां विचारहि नसतो! कोणी आपणास नकोसें असल्यास स्पष्टपणें व गोड शब्दांनीं त्याला जाण्याविषयीं सांगणें हें असभ्यपणाचें वर्तन आहे, व बतावण्या करून जाण्याविषयीं सूचना करणें हें सभ्यपणाचें वर्तन आहे, असें आनंदीबाई समजत नव्हत्या. ह्मणून त्या बाळ्यास ह्मणाल्या "बाळ, आतां आह्मांला कांहीं बोलायचं आहे; तें तूं ऐकावं हें बरं नाहीं; तेव्हां तूं मग येशील तर बरं होईल."

बाळ्याच्या मनांतून जरी त्यांचें भाषण ऐकावयाचें होतें, तरी आनंदीबाईनीं सांगतांच तो खोलीबाहेर गेला; परंतु जातांना त्यानें विचारलें "मावशीबाई, तुमचें बोलणें आटोपल्यावर मला बोलवाल ना?"

आनंदीबाईनीं लागलीच होय ह्मणून सांगितलें, व तो बाहेर गेला.

बाळ्या बाहेर गेल्यावर आनंदीबाईनीं बोलण्यास सुरुवात केली. त्या ह्मणाल्या "यशोदाबाई, मला आतां माईचा भरंवसा वाटत नाहीं. मला वाटलं होतं, कीं, तुमच्या सर्व मुलांत माई चांगली निघेल; परंतु तिला कुणीं फणसपोळी दिली असतां, अथवा खेळण्याची लालूच दाखविली असतां, ती लोकांच्या नादीं लागते व जें करणं योग्य नाहीं तें करिते. आपल्याला नादीं लावणारे लोक पुष्कळ

असतात, परंतु त्यांच्या नादीं लागणं हें चांगलं नाहीं, हें मीं तिला दोनतीन वेळ सांगितलं; पण तें तिच्या लक्ष्यांत राहत नाहीं असं दिसतं. आज फणसपोळी घेतली, उद्यां खेळण्याचे नादीं लागली, परवां तिसरंच कांहीं केलं, तर हिचा भरंवसा कसा धरावा? हिच्यादेखत आपण कांहीं गुप्त गोष्ट बोलतां कामा नये!" असें बोलून आनंदीबाईनीं माईस दूर जावयास सांगितलें.

आपणावर सर्वांची गैरमर्जी झाली आहे, हें पाहून माईस वाईट वाटलें. ती कांहीं एक न बोलतां दूर गेली. नंतर यशोदाबाई हंसून काशीस ह्मणाल्या "काशी, काल जसा तूं गोंगाट ऐकिलास तसा तुला पूर्वी कधीं ऐकूं आला होता का? अलीकडे गोंगाटानं माझं डोकं उठून गेलं आहे."

काशी चकित होऊन ह्मणते "गोंगाट! कसला गोंगाट?"

यशोदाबाई ह्मणाल्या "होय. पण तुला त्या गोंगाटामुळं भिण्याचं कारण नाहीं. तो रात्रीस नव्हता, सकाळीं ऐकूं येत होता. काल माझं पोट दुखत होतं, तेव्हां गाणं व नाचणं यांचा धिंगाणा नव्हता का चालला?"

काशी आतां स्मरण झाल्यासारखें करून ह्मणाली "होय, काल एक तमाशा आला होता खरा! तो आह्मी पाहत होतों व बाळ्या उड्या मारित होता. आई, तुझं पोट दुखत आहे, असं आह्मांला समजलं असतं, तर आह्मी तमाशा पाहत न बसतां तुझ्याकडे आलों असतों. बाळ्यास जाण्याची घाई होती ह्मणून तो भरभर जिन्यावरून उतरत होता. इतक्यांत वेणुबाईनीं त्याला गोंगाट करूं नकोस ह्मणून सांगितलं. मला त्यांत विशेष कांहीं वाटलं नाहीं. मावशीबाई बाळ्यास पुस्तक घेऊन देण्याकरितां बाहेर गेल्या. तूं आजारी आहेस असं नंतर आह्मांला समजलं; तेव्हां आह्मी लागलींच तमाशा पाहण्याचं सोडून तुझ्याकडे आलों. जर आह्मांला अगोदर समजलं असतं, तर आह्मी अगोदर आलों असतों."

यशोदाबाई ह्मणाल्या "एकूण, वेणुबाई किती तरी लबाड आहे! तिनं मला भलभलतंच सांगितलं! तिनं तुह्मांला उशिरां कळविण्यापेक्षां मुळींच कळविलं नसतं, तर बरं झालं असतं; ह्मणजे तुह्मांला आनंदीबाईबरोबर बाहेर जाण्यास तरी सांपडलं असतं."

काशी ह्मणाली "आई, तूं असं कसं ह्मणतेस? आह्मी वेणुबाईच्या सांगण्या-वरून अथवा मावशीबाईच्या सांगण्यावरून घरीं राहिलों, असं नाहीं; आह्मी

होऊनच राहिलों. तुला पुस्तक वाचून दाखवावं, किंवा कांहीं काम लागल्यास तें करावं, ह्मणून राहिलों होतों."

यशोदाबाईनीं विचारलें "एकूण, तुह्मी काल घरीं राहिलां, त्या आनंदीबाईच्या सांगण्यावरून राहिलां नाहीं?"

ह्या शेवटील भाषणावरून यशोदाबाईच्या मनांत काय चाललें असावें, ह्याविषयीं आनंदीबाईची खात्री झाली. त्यांनीं बराच वेळ कांहीं एक भाषण केलें नाहीं. शेवटीं त्या ह्मणाल्या "यशोदाबाई, मला खरोखर बोलण्याचं कारण नव्हतं. माझ्याविषयीं तुमचा कांहीं गैरसमज झाला आहे, हें मला समजून चुकलं आहे; परंतु त्याविषयीं मीं स्वतः खुलासा करण्यापेक्षां परभारं तुमच्या मनाची खात्री व्हावी, असा माझा हेतु होता. तुमचीं मुलं तुमच्यावर आपणहोऊन प्रीति करितात, माझ्या सांगण्यावरून करित नाहींत. तुह्मी धूर्त आहां, तेव्हां माझ्या सांगण्यावरून तीं कोणत्या गोष्टी करितात व स्वतःहोऊन कोणत्या गोष्टी करितात, हें तुह्माला कळून आलं असेलच."

आनंदीबाई पुढें बोलणार, तों यशोदाबाई ह्मणाल्या "आनंदीबाई, तुमच्याविषयीं माझा कांहीं चमत्कारिक ग्रह झाला होता, हें मी कबूल करत्यें. अलीकडे कांहीं कारणानं तुमच्याविषयीं माझं मन शुद्ध नव्हतं, ही गोष्ट खरी आहे. तुह्मी माझं खरं हित करित असतां तें मला बरोबर समजलं नाहीं. मीं लोकांच्या नादीं लागून मत्सरभावानं मनांत किंतु आणिला, ही माझी चूक आहे. याबद्दल मला फार वाईट वाटतं. मी कालच तुमची क्षमा मागणार होत्यें, परंतु बाळ्याच्या गडबडींत तें तसंच राहिलं. तुमचे उपकार मजवर फार असून मीं त्यांची फेड अशा रीतीनं केली, याबद्दल तुह्मीं मला क्षमा केली पाहिजे!" असें ह्मणून यशोदाबाईनीं आनंदीबाईपुढें पदर पसरला.

आनंदीबाईनीं त्यांचा हात धरून ह्मटलें "यशोदाबाई! तुह्माला वेड लागलं आहे कीं काय? तुमच्याकडून कांहीं अपराध झाला आहे, असं मला मुळींच वाटत नाहीं! मीं आपलं कर्तव्य केलं, यापेक्षां मीं कांहीं अधिक केलं आहे असं मी समजत नाहीं. तुह्मी कांहींएक मनांत आणूं नका. जें झालं, तें एकापरी बरंच झालं, असं मी समजत्यें. कारण, खरोखर मी कशी आहें व माझे विचार काय आहेत, हें मीं आपल्या तोंडानं सांगण्यापेक्षां तुह्माला अनुभवानं व परीक्षा

करून घेतल्यावर समजून आलं, हें चांगलंच झालं. आज परस्परांविषयीं परस्परांचे काय ग्रह आहेत हें कळविण्यास तुह्मीं संधि आणिली, याविषयीं मी तुमची आभारी आहें."

हें भाषण ऐकून यशोदाबाई स्तब्ध बसल्या. काशी मुकाट्यानें बसली होती. बराच वेळ झाला, तथापि कोणी कांहींच बोलेना. शेवटीं यशोदाबाई ह्मणाल्या "आनंदीबाई, तुह्मी नेहमीं असंच ह्मणतां. तुह्मीं उपकार केले असून आपण आपलं कर्तव्य केलं, असं बोलून तुह्मी माझी समजूत करतां. असो. हा तुमचा थोरपणा आहे. बरं पण, आज तुह्मांला दुसरी एक गोष्ट विचारायची आहे. तुमच्या व माझ्यासंबंधानं खुलासा झाला, हें चांगलंच झालं; परंतु वेणुबाईस तुह्मी कां नकोशा झालां, याचं कारण मला कांहींच समजत नाहीं. तुह्मी कांहीं तिच्या अंगावर नाहीं. तुह्मी तिच्याविषयीं कांहींच बोलत नाहीं. आपलं काम बरं, कीं आपण बऱ्या, असं तुमचं वर्तन मी पाहत आहें. असं असून तुमच्याविषयीं तिचं मन शुद्ध नसावं, व तिनं तुह्मांला घालवून देण्याचा विचार मनांत आणावा, याचं मला मोठं नवल वाटतं!"

आनंदीबाई ह्मणाल्या "यशोदाबाई! तुह्मांला नवल वाटतं, परंतु मला याचं कांहींच वाटत नाहीं. या बाबतींत कांहीं बोलण्याची माझी इच्छा नव्हती; परंतु ज्याअर्थीं तुह्मीं हा विषय कांढलाच आहे, त्याअर्थीं न बोलणंहि बरोबर नाहीं. तुह्मी वेणुबाईस एकटीसच दोष देतां, हें बरोबर नाहीं. कारण, त्यांचं शिक्षण तें किती व बुद्धि ती काय? त्यांचं कृत्य दृष्टोत्पत्तीस आलं, ह्मणून त्या दोषास अधिकारी झाल्या आहेत. खरोखर पाहतां, तुमच्या सोबतिणींची तिला फिसात आहे. कारण, मीं आल्यापासून वेणुबाईची व तुमच्या मैत्रिणींची मुखत्यारी कमी झाली आहे. तुमच्या इथं तुमच्या मैत्रिणींचं येणंजाणं कमी झालं आहे. पूर्वीं ज्याप्रमाणं तुमचं घर त्यांना करमणुकीचं ठिकाण वाटत होतं, त्याप्रमाणं आतां वाटत नाहीं. तुह्मी गमतीसाठीं फारशा बाहेर जात नाहीं, किंवा मौजेखातर त्यांना जेवणाखाणास फारशा बोलावित नाहीं. यामुळं त्यांना पूर्वीं जो आनंद व जी करमणूक होत असे, ती नाहींशी झाली आहे, आणि या सर्व गोष्टींस मी कारण आहें, असं वाटून माझ्याविषयीं त्यांचा भलताच ग्रह होणं स्वाभाविक आहे. तसा झाला नसता, तर मात्र नवल होतं. दुसरं असं, कीं, मत्सर व गैरसमज ह्यांनीं पुष्कळांचं मन ग्रासून टाकलेलं असतं. लहानमोठे, विद्वान्

अविद्वान्, स्त्रिया पुरुष हीं यांच्या आधीन असतात. या मत्सराच्या तडाक्यांतून निसटलेलीं फार थोडीं सांपडतील. तुह्मी घरीं असा अथवा बाहेर जा, हे दोन महारिपु तुमच्या दृष्टीस पडतात. भावाभावांमधें, बहिणीबहीणींमधें अथवा बापलेकांमधें, पैशावरून, सौंदर्यावरून अथवा मानापमानावरून गैरसमज व मत्सरभाव उत्पन्न होऊन परस्परांचीं मनं दूषित होतात, तर इतर लोकांचीं होतील यांत नवल तें काय ? दुसऱ्याचं बरं न पाहणं व दुसऱ्याची स्तुतिं न आवडणं, हा साधारणपणं मानवी स्वभावांत मोठाच दोष आहे, असं दिसतं. आपणापेक्षां दुसरा चांगला लिहिणारा, चांगला शिकविणारा अथवा चांगला बोलणारा आहे हें ऐकून, त्याचप्रमाणं दुसऱ्याला विशेष मान मिळतो अथवा त्याला पैसे पुष्कळ मिळतात हें पाहून, तसेंच, लोक दुसऱ्याचा सल्ला विचारतात, किंवा दुसऱ्याचे घरीं मंडळी जमते, परंतु आपल्याला कोणी विचारित नाहीं किंवा आपल्याला तेवढा पैसा मिळत नाहीं हें मनांत आणून, समंजस लोकांससुद्धां वाईट वाटावें व त्यांनीं दुसऱ्याचा पाडाव करण्यासाठीं हलकट उपाय योजावे, हें केवढें वेड आहे ! एखादी नवीन गोष्ट, नवीन पद्धत, अथवा नवीन रीत निघाली असतां तिच्या विरुद्ध लोक आहेतच ! तिच्यापासून खरोखर हित असो सुख होत असो, अथवा सर्व प्रकारें फायदा होत असो, तथापि नांव ठेवणारे व मत्सर करणारे विघ्नसंतोषी सांपडतातच ! जुनं तेवढं सर्व चांगलं, व नवीन तेवढं सर्व वाईट, असा पुष्कळांच्या मनाचा ग्रह असतो. परंतु या दोन्हींमधें खरोखर चांगलं कोणतं, हें शोधून काढून त्याचं अवलंबन करणारे थोडे ! '**परप्रत्ययनेयबुद्धिः**' असे फार ! तुमच्या मुलांच्या संबंधानं जो शिक्षणप्रकार हल्लीं चालू आहे, त्यांत खरोखर पाहतां नवीन ह्मणण्यासारखं कांहींच नाहीं. त्यांत नव्यांस प्रिय व जुन्यांस अप्रिय असं कांहीं नाहीं. परंतु गैरसमजामुळं कित्येकांस तो नवीन व चमत्कारिक वाटल्यामुळं त्यांनां संतोष होत नाहीं. कांहींनां तो पसंत पडला आहे, हें त्यांनां ऐकवत नाहीं. ज्याप्रमाणं आपला अभिप्राय आहे, त्याप्रमाणंच दुसऱ्यांचाहि असावा, असं त्यांनां वाटत असतं. कांहीं लोक तुह्माला बरं ह्मणतात, याबद्दल यांनीं तुह्माला दोष कां ठेवावा, तुह्माला शिक्षा कां करावी, अथवा तुमचं नुकसान कां इच्छावं, हें समजत नाहीं ! मनुष्यस्वभावांतच हा मोठा दोष आहे. आणि जर या स्वभावाप्रमाणंच वेणुबाईचं आणि दुसऱ्या स्त्रियांचं आचरण आहे, तर त्यांत

विशेष तें काय आहे? तें मनांत न आणणं, आणि आपल्या आसपास विघ्नसंतोषी आहेत ही गोष्ट लक्ष्यांत ठेवून शहाणपणानं व नेटानं आपलं कर्तव्य करणं, हा उत्तम मार्ग आहे. तुह्मींहि हीच गोष्ट लक्ष्यांत ठेवून त्याप्रमाणं वागावं, अशी माझी इच्छा आहे. कारण, आज नाहीं उद्यां, तुह्माला माझं काम करण्याचा प्रसंग येईल, व आज ज्याप्रमाणं कांहीं लोक मला नांवं ठेवितात त्याप्रमाणं तुह्मांलाहि ठेवितील. तुमचीं मुलं परस्परांचा व दुसऱ्यांचा मत्सर न करतील, अशा रीतीनं आजपर्यंत मीं व्यवस्था केली आहे; व तीच व्यवस्था तुह्मीं पुढं चालू ठेवावी, असं तुह्माला माझं सांगणं आहे. बरं हें असो. बोलण्याच्या नादांत बाळास बोलाविण्याचं मला भान राहिलं नाहीं. तो बाहेर वाट पाहत असेल!"

असें म्हणून आनंदीबाई दारापाशीं गेल्या व त्यांनीं दार उघडलें. वेणुबाई फटींतून ऐकत होत्या, त्यांनां दार लागलें व त्यामुळें शब्द झाला. तो ऐकून यशोदाबाई दारापाशीं गेल्या आणि पाहतात, तों वेणुबाई डोकें चोळित आहेत असें त्यांच्या दृष्टीस पडलें. तेव्हां त्या ह्मणाल्या "वेणुबाई! तुह्माला आडून चोरून ऐकण्याची काय घाणेरडी संवय लागली आहे ही! तुह्माला या बाबतींत कालच मीं बजावलं होतं, परंतु तुमची खोड गेली नाहीं! तुमच्या अंगीं दुर्गुण तितके भरले आहेत! तुमच्या ताब्यांत मुलं दिलीं असतां त्यांनां दुसरा तर कांहीं फायदा व्हायचा नाहीं, परंतु तुमच्या वाईट तेवढ्या खोडी मात्र त्यांनां लागतील. तुह्माला आमचं भाषण ऐकायचं होतं, तर आंत कां नाहीं आलां?"

वेणुबाई यावर जरा कुऱ्यानेंच ह्मणाल्या "माझ्या विषयींच बोलणं चाललं होतं, ह्मणून मी ऐकत होत्यें. अलीकडे माझ्या वाईटावर पुष्कळ लोक आहेत!"

"अहो, पण चोरून कां ऐकत होतां? लोक तुमच्या वाईटावर आहेत, एवढंच का तुह्माला सांगायचं आहे?"

"मला पुष्कळ बोलायचं आहे, परंतु फळ काय? माझं बोलणं कुणाला खरं वाटणार आहे? अलीकडे ज्याला त्याला माझा कंटाळाच येत आहे! परकीं माणसं आवडीचीं झालीं आहेत अन् मी नकोशी झाल्यें आहें. आतां या घरांत माझा कांहीं उपयोग आहे, असं मला वाटत नाहीं. तुमची मर्जी असेल, तर वाट फुटेल तिकडे मी जात्यें."

"मीहोऊन तुह्माला जा ह्मणून सांगत नाहीं; परंतु जाण्याचीच तुमची मर्जी असेल, तर माझी मुळींच आडकाठी नाहीं—तुमचा रस्ता तुह्माला मोकळा आहे!"

" बरं आहे, तुमची इच्छाच असल्यास आतांच मी जात्यें!"

" तशी इच्छा असल्यास आत्तांच जा, त्यालाहि माझी हरकत नाहीं!"

हें उत्तर ऐकून वेणुबाई रडावयास लागल्या. त्या ह्मणाल्या " आजपर्यंत तुह्मीं माझा सांभाळ केला, व या थराला हें येऊन पोहोंचेल, असं मला वाटलं नाहीं. माझं दैवच फुटकं, त्याबद्दल तुह्माला दोष देण्यांत अर्थ नाहीं. तुह्मीं कांहीं करा, परंतु तुमच्या बऱ्याकरितां अंबाबाईपाशीं मी प्रार्थना करीन!"

यशोदाबाई ह्मणाल्या "तुह्मी आमच्या कल्याणासाठीं प्रार्थना करा किंवा नका करूं, तो तुमच्या मर्जीची गोष्ट आहे! मुलांच्या बाबतींत गडबड न करण्याविषयीं मीं व आनंदीबाईनीं तुह्माला सक्त ताकीद दिली असूनहि तुह्मीं तिकडे लक्ष्य दिलं नाहीं. तुह्मी करतां हें चांगलं करित नाहीं असं मी वारंवार सांगितलं, परंतु तुह्मीं तें ऐकलं नाहीं. मला भलभलतं सांगून फसविलंत. आतां यापुढं तुह्मीं माझ्या घरांत राहिलां, तर मुलांनां माझं न ऐकण्यास व मला फसविण्यास शिकवाल, यांत काडीमात्र संशय नाहीं! ह्मणून, ज्याअर्थीं तुह्मीं माझ्या इच्छेवरच सोंपविलं आहे, त्या अर्थीं तुह्मीं आपला पाय या घरांतून काढावा, हें बरं! यापासून तुह्माला व आह्मांला असं दोघांनांहि सुख होणार आहे. तुमच्या अंगावर सरी, पाटल्या, ठुशी, डोरलीं वगैरे मिळून सातआठशांचा विषय आहे. हा तुह्माला दिला आहे. ह्याचं तुह्मीं वाटेल तें करा. चांगल्या रीतीनं राहिलां, तर ओलीकोरडी भाकरी खाल. परंतु लुच्च्या लोकांचे अथवा मूर्ख स्त्रियांचे नादीं लागलां तर अन्नास महाग होऊन लोकांच्या घरीं मोलमजुरी करण्याचा प्रसंग येईल, हें लक्ष्यांत ठेवा."

हें भाषण ऐकून वेणुबाईनीं दीन मुद्रेनें क्षमा मागितली, पदर पसरला, आपल्या हातून असें पुनः कधीं होणार नाहीं ह्मणून सांगितलें, परंतु व्यर्थ! यशोदाबाईनीं त्यांनां साफ सांगितलें, कीं, " जें झालं तें झालं, आतां माझा विचार मुळींच बदलणार नाहीं!" असें ह्मणून त्या चालत्या झाल्या.

निरुपायास्तव वेणुबाईस घरांतून जावें लागलें. त्या गेल्यापासून कोणालाहि असंतोष न होतां उलट सर्वांनां आनंदच झाला. घरांतील नोकरचाकर मंडळीस त्यांचा मोठा सासुरवास असे. त्या तोंडाच्या अगदीं फटकळ असल्यामुळें मंडळी अगदीं कंटाळून गेली होती.

वेणुबाईच्या सहवासानें माईला थोडथोड्या वाईट खोडी लागत चालल्या होत्या. त्या घालविण्याविषयीं आनंदीबाईंनीं प्रथम प्रयत्न चालविला. आपणावर कोणाचा विश्वास नसल्यामुळें आपणास काय त्रास होतो, हें आनंदीबाईंनीं तिला भासविलें. घरांत आपणावर काय ती सर्वांची नजर आहे, हें पाहून माईला लाज वाटूं लागली. तिला आपल्या संवयींविषयीं वाईट वाटून ती आनंदीबाईंचा भरंवसा आपल्यावर राहील, अशा रीतीनें वागूं लागली. थोडक्याच दिवसांनीं तिची खोड नाहींशी झाली व सर्व मंडळी तिच्यावर पहिल्याप्रमाणें भरंवसा ठेवूं लागली.

अशा रीतीनें यशोदाबाईंच्या मुलांचा शिक्षणक्रम बरेच दिवस चालला होता. एके दिवशीं बांगड्या भरण्याकरितां यशोदाबाईंनीं कासारास बोलावणें पाठविलें. कासार आला, परंतु नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें नुसते बिलवर न भरतां यशोदाबाईंनीं कांहीं काळ्या बांगड्या व कांहीं बिलवर भरले. काशी आनंदीबाईपाशीं शिकत बसली होती. तिलाहि बांगड्या भरावयाच्या असल्यामुळें ती खालीं आली. ज्या दिवशीं ती कीर्तनास गेली होती, त्या दिवशीं तिनें एका मुलीच्या हातांत कांहीं चमत्कारिक बिलवर पाहिले होते. तशा प्रकारचे बिलवर तिच्या मनांतून भरावयाचे होते. कासारापाशीं तसले नव्हते, ह्मणून त्याला ते घेऊन येण्यास तिनें सांगितलें. कासार ते घेऊन आला. परंतु त्यांची किंमत फार असल्यामुळें तिनें आईस विचारलें. यशोदाबाईंनीं तिला सांगून पाठविलें, कीं, "इतक्या भारी किंमतीचे बिलवर आपणास नकोत! कांहीं बांगड्या व कांहीं बिलवर भर, ह्मणजे झालं."

हें ऐकून काशीची मर्जी गेली. तिनें रागारागानें नुसत्या बांगड्याच भरल्या व ती खालींच बसली. ही गोष्ट यशोदाबाईस समजली. या वेळीं त्या आनंदीबाईपाशीं घरांतील स्वच्छतेसंबंधानें बोलत होत्या. काशीस वेळ फार लागला, ह्मणून आनंदीबाईंनीं तिला बोलावून आणण्यासाठीं बाळ्यास पाठविलें. काशी रुसली होती, ह्मणून ती बाळ्याशीं कांहींएक बोलली नाहीं, बाळ्या तसाच वर गेला. काशी त्याच्या मागोमाग गेली व मुकाट्यानें बसली. तिला पाहून बाळ्या ह्मणाला "ताई, तूं येणार नव्हतीस ना?"

काशीनें यावर कांहींएक उत्तर दिलें नाहीं.

आपण काशीला बांगड्या व बिलवर भरावयास सांगितलें असून तिनें फक्त बांगड्याच भरल्या, हें पाहून यशोदाबाई तिला रागें भरूं लागल्या. तेव्हां आनंदीबाई ह्मणाल्या "काशीनं नुसत्या बांगड्या भरल्या, यांत काय बिघडलं? बिलवरांपासून स्त्रियांस मोठं भूषण असतं व नुसत्या बांगड्यांपासून कमी असतं, असं कांहीं नाहीं. सुशीलता व स्वकर्तव्याविषयीं दक्षता हे स्त्रियांचे मोठे अलंकार होत. हे बिलवरांप्रमाणं कधीं पिचत नाहींत!"

यशोदाबाई ह्मणाल्या "काशीनं नुसत्या बांगड्या भरल्या, याबद्दल मी तिला रागं भरल्यें नाहीं. हातांत नुसत्या बांगड्या असल्या ह्मणजे स्त्रियांची प्रतिष्ठा कमी होते, असं मी मुळींच समजत नाहीं व ह्मणूनच मीं नुसते बिलवर भरण्याचं सोडून दिलं आहे. तिला रागं भरण्याचं कारण दुसरंच आहे. तिनं परवां एका मुलीच्या हातांत बिलवर पाहिले होते. तिलाहि तसले भरावेसे वाटल्यामुळं तिनं कासाराकडून ते मुद्दाम आणविले; परंतु त्यांना किंमत फार पडूं लागली. तथापि बिलवरांविषयीं पोरीची विशेष आवड पाहून कांहीं बांगड्या व कांहीं बिलवर मीं तिला भरावयास सांगितलं होतं; पण तिनं रागारागानं नुसत्या बांगड्याच भरल्या, त्याचा मला राग आला."

आनंदीबाई ह्मणाल्या "मग बरोबर आहे. मुद्दाम कासारास परत पाठवून काशीनं बिलवर आणविले, हें अगोदर तिनं चांगलं केलं नाहीं; अन् तुमचं ऐकिलं नाहीं, हें तर फारच अयोग्य केलं. दुसऱ्या स्त्रियांच्या हातांत चमत्कारिक बिलवर पाहून तसले भरविण्याविषयीं इच्छा करणं चांगलं नव्हे. आज चमत्कारिक बिलवर भरण्याची इच्छा झाली, उद्यां सुंदर व तरतऱ्हेचीं फुलं डोक्यांत घालण्याची इच्छा होईल, परवां मोत्यांचे काप असावेसे वाटतील! तात्पर्य, ही हौस केव्हां पूर्ण होईल हें सांगतां येत नाहीं. हीं सर्व चैनी व निरुद्योगी बायकांचीं सोंगं आहेत. चैनी बायकांस निरनिराळ्या प्रकारचे डागिने घालून नटण्यांतच मोठं भूषण वाटतं. खऱ्या भूषणाकडे त्यांचं लक्ष्य नसतं!"

यशोदाबाई ह्मणाल्या "मलाहि अलीकडे डागिने घालण्याचा कंटाळा येऊं लागला आहे. जी गोष्ट सदोदित निभावेल तीच आपण करावी, हेंच शहाण्या माणसाचं काम होय. आपणापाशीं लाख पन्नासहजार रुपये असते, तर गोष्ट निराळी!"

यशोदाबाई व आनंदीबाई ह्यांचें भाषण चाललें असतां काशी उगीच बसली होती. तिला दोन गोष्टी सांगण्याची ही संधि चांगली आहे, असें पाहून आनंदीबाई मोठ्या गंभीरपणानें ह्मणाल्या "काशी ! तूं सर्वांत मोठी, तूंच रुसून बसूं लागलीस, तर माईला अन् बाळाला कां नांवं ठेवावीं ? तूंच भिकार गोष्टीसाठीं हट्ट धरून बसूं लागलीस, तर उद्यां माई व बाळ त्याचप्रमाणं करायला लागतील. तुझा सुग्रणपणा, तुझ्या हातचीं सुंदर चित्रं, तुझं उत्तम शिवणकाम व तुझं सुंदर अक्षर, हेच तुझे बिलवर, हेच तुझे गोट, ह्याच तुझ्या सोन्याच्या बांगडया व हेच तुझे मोत्यांचे जवे ! बाह्य अलंकारांपेक्षां अंगच्या गुणांची योग्यता फार मोठी आहे, असं थोर स्त्रिया समजतात. दुसऱ्या कारागिरानं घडविलेले अलंकार अंगावर घालून भूषण मानणं हा शहाणपणा, किंवा स्वतः-च्या कृतीनं जे गुण संपादन केले असतील त्यांविषयीं भूषण मानणं हा शहाण-पणा ? सातआठ दिवसांपूर्वीं तूं, माई व शेजारच्या दुसऱ्या मुली फुगड्या खेळत होतां. त्या वेळेस बांगडया पिचून कांहीं कलागत झाल्याचं माझ्या कानांवर आलं. त्याच वेळेस मला तुझी कानउघाडणी करायची होती; परंतु तुझं तुला वाईट वाटून तुझी संवय जाईल, असं मला वाटलं. आतां झिमा, फुगडया, सागरगोटे, वगैरे खेळ खेळून धिंगाणा करण्याचे तुमचे दिवस आहेत का ? यांत तुह्मांला अद्याप गोडी वाटते का ? तुला लोकांच्या घरीं नांदायचं आहे, ही गोष्ट तुला माहीत नाहीं का ? सासू कशी मिळते, सासरा कसा मिळतो व नवरा कसा मिळतो, या विवंचनेंत तुझी आई असते व तुला तर असले पोरखेळ सुचतात ! असले पोरखेळ सासरच्या मंडळीस आवडत नाहींत, हें तुझ्या लक्ष्यांत येत नाहीं असं दिसतं. त्यांची सढळ नजर कमी असते. असला प्रकार त्यांच्या दृष्टीस पडला, तर ते आईला दोष देतील व मुलीला मोळा नाहीं असं ह्मणतील. तुला सासरा तामसी मिळाला अन् सासू कजाग मिळाली, तर त्यांनां असलं वर्तन अगदीं खपणार नाहीं; इतकंच नाहीं, तर तीं तुला घालूनपाडून बोलतील; तुझ्या आईचा व काकांचा वारंवार उद्धार करतील, अन् तुला जाच होईल. सासू, सासरा व नवरा हीं समंजस असलीं, तरी त्यांनां हें वर्तन आव-डणार नाहीं. तीं बोलणार नाहींत, परंतु त्यांनां वाईट वाटल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हां हट्ट धरून बसण्यांत, कांहीं जिन्नस मिळाली नाहीं ह्मणून रुसण्यांत, व पोरखेळ खेळण्यांत शहाणपणा नाहीं."

आनंदीबाईनीं हा जो उपदेश केला, त्याचा परिणाम हळुहळू दृष्टोत्पत्तीस येऊं लागला. काशीच्या वाईट खोडी हळुहळू जात चालल्या. स्वच्छ राहणें, स्वच्छ कपडे घालणें, कोणतेंहि काम करणें झालें तरी तें टापटिपीनें करणें, हट्ट धरून न बसणें, व पोरकट खेळ खेळण्यांत वेळ न घालवितां उद्योग करणें यापासून काय सुख होतें, हें तिला कळून येऊं लागलें.

अशा रीतीनें कांहीं दिवस लोटले. आनंदीबाईचा लौकिक आसपास पसरत चालला. शेजारपाजारच्या बायका यशोदाबाईच्या घरीं येऊं लागल्या व घटका घटका आनंदीबाईपाशीं बोलत बसूं लागल्या. त्यांच्याबरोबर त्यांच्या मुलीहि येत असत. पूर्वीं सोंगट्या खेळण्यासाठीं अथवा गप्पा मारण्यासाठीं बायका जमत असत; परंतु हा सर्व बखेडा मोडून जाऊन आतां त्या निराळ्या प्रकारच्या गप्पा मारण्यासाठीं व निराळ्या प्रकारच्या करमणुकीसाठीं येऊं लागल्या. त्यांपैकीं कांहीं कुचेष्टाहि करण्याच्या हेतूनें येत; परंतु आनंदीबाई व यशोदाबाई त्या सर्वांचें आदरातिथ्य योग्य प्रकारें ठेवित असत; त्यांच्याबरोबर बोलण्याचा कधींहि कंटाळा करित नसत. त्यांपैकीं कांहींची बसण्याची तऱ्हा, आचावाचा बोलण्याची हौस, निष्कारण मोठ्यानें हंसण्याचा प्रकार, ग्राम्य विषयांवर बोलण्याची उत्कंठा, शेजाऱ्यापाजाऱ्यांची निंदा करण्याविषयीं हौस, पोशाखाच्यासंबंधानें कांहींचा डामडौल व कांहींचा घामटपणा, पदोपदीं 'अगबाई,' 'हा मेल्यांनो,' 'जळलं मेलं,' हे शब्द उच्चारण्याची लकब, मिथ्या बोलण्याविषयीं निःशंकपणा, त्यांच्याबरोबर आलेल्या मुलांचा कलकलाट व धिंगाणा, न विचारितां जिनसा उचलून घेण्याची व चमत्कारिक वस्तु दृष्टीस पडली असतां ती मागण्याची त्यांची संवय, ह्या व अशाच प्रकारच्या दुसऱ्या कित्येक गोष्टी पाहून आनंदीबाईस वाटे, कीं, स्त्रियांना शिक्षण मिळाल्याशिवाय त्यांच्यांतील व त्यांच्या मुलांतील हे दोष नाहींसे होण्याचा संभव कमी आहे. हें शिक्षण ह्मणजे पुस्तकी ज्ञानच, असें नाहीं. स्त्रियांस व पुरुषांस पुस्तकी ज्ञानाचा फार उपयोग होतो; परंतु एवढ्यानेंच त्यांचा कार्यभाग होत नाहीं, व एवढ्यानेंच तीं सुशिक्षित होत नाहींत. हें ज्ञान, शिक्षणाचा एक भाग आहे; परंतु ज्यांना एवढेंच काय तें शिक्षण मिळालें आहे, त्यांना सुशिक्षित ह्मणणें, ह्मणजे सुशिक्षित या शब्दाचा संकुचित अर्थ करणें आहे. सुशिक्षित ह्मणजे ज्याला चांगली शिक्षा अथवा वळण लागलें आहे तो. ज्याच्या अंगीं मनोनिग्रह व इंद्रियजय हे दोन गुण वास

करित आहेत, ह्मणजे जो मनोविकारांचे आधीन नाहीं, जो कधींहि 'निरुपाय' व 'निराश्रित' नाहीं, त्याला चांगलें शिक्षण मिळालें आहे व तो सुशिक्षित आहे, असें समजावें. पुस्तकी ज्ञान, व्यवहारज्ञान आणि सदाचरण हीं शिक्षणाचीं मुख्य अंगें होत. हीं तिन्हीं ज्याला आहेत तो सुशिक्षित या नांवाला पात्र आहे. ज्याला हीं तिन्हीं नाहींत तो सुशिक्षित आहे असें मानणें चूक आहे. अशा प्रकारचें शिक्षण स्त्रियांनां मिळाल्याशिवाय त्यांच्या मुलांची व त्यामुळें समाजाची उन्नति होणार नाहीं. चार लोक आपले मुलगे अथवा मुली शाळेंत पाठवितात ह्मणून आपण पाठवावें, असें समजून शिक्षणाचा खरा उपयोग व्हावयाचा नाहीं. असें करून स्वस्थ बसल्यानें इष्टकार्य होणार नाहीं. नुसते पैसे खर्च केले ह्मणजेच इष्ट कार्य होत नसतें. उन्नति होण्यास मुलांच्या अंगीं एका प्रकारचें सामर्थ्य यावें लागतें. शरीर व मन व अथवा बाह्य सजीव व निर्जीव वस्तु ह्यांच्या आधीन न होतां, त्यांनां आपल्या स्वाधीन करून घेऊन त्यांपासून उपयोग करून घेण्याचें सामर्थ्य यावें लागतें. तात्पर्य, परवश न होतां स्वपराक्रमावर अवलंबून राहून पाऊल पुढें टाकण्याचें सामर्थ्य यावें लागतें. हें सामर्थ्य एकदोन दिवसांत येत नाहीं. हें बरेच दिवसांच्या सतत अभ्यासानें प्राप्त होतें. हा अभ्यास लहानपणापासून चालू असला, तर पुढें जड वाटत नाहीं. हा अभ्यास करण्यास गृह ही उत्तम शाला आहे. ह्मणून सर्व शिक्षणापेक्षां गृहशिक्षणाची मातबरी फार आहे, असें आनंदीबाईस वाटत असे. स्त्रियांनां हें शिक्षण जसें मिळावें तसें न मिळाल्यामुळें त्यांची अशी निकृष्ट स्थिति झाली आहे, हें पाहून त्यांनां फार वाईट वाटलें. गृहशिक्षण ह्मणजे घरीं पुस्तकी विद्येच्या संबंधाचें अथवा दहापांच गोष्टींच्या संबंधाचें शिक्षण तें कांहीं गृहशिक्षण नव्हे, तर स्वतःच्या संबंधानें, ईश्वराच्या संबंधानें, समाजाच्या संबंधानें व राज्यव्यवहारासंबंधानें जीं कर्तव्यें आमरण करावयाचीं व तीं करण्यास घरच्या ज्या शिक्षणाचा उपयोग होतो, अथवा तीं करण्याविषयीं बीजरूपानें सामर्थ्य येतें, तेंच खरें गृहशिक्षण होय, असें आनंदीबाई समजत असत व या समजुतीप्रमाणेंच त्यांचें वर्तन असे. ज्या गृहशिक्षणापासून घरांतील मनुष्यें अथवा वस्तु सजीव दिसत नाहींत व त्यांपासून जो उपयोग व्हावयाचा तो वक्तशीर व व्यवस्थेनें होत नाहीं, त्या गृहशिक्षणाची त्या मातबरी मानित नसत. घरांतील प्रत्येक सजीव व निर्जीव वस्तूवर विचारी मनुष्याची नजर असून त्याला योग्य

प्रकारचें वळण मिळालें आहे असें ज्या शिक्षणावरून दिसतें, तेंच खरें गृह-शिक्षण, असा त्यांचा समज होता.

गृह हें लहानसें राज्य आहे. या राज्याची व्यवस्था करतां येणें हा स्थानिक-स्वराज्यशिक्षणाचा व त्यामुळें राज्यव्यवस्थेच्या शिक्षणाचा ओनामा आहे. घरांतील घाणीपासून अथवा मुलांच्या घामट संवयींपासून किती अपाय होतो, स्वच्छतेपासून काय सुख होतें, कोंदट अथवा गैरसोयीच्या घरांपासून शरीरास काय त्रास होतो, खुलास व हवाशीर घरापासून काय सुख होतें, घरांतील जिनसांविषयीं टापटीप व व्यवस्थितपणा नसेल तर काय त्रास होतो, घरांतील मंडळीकडून अथवा नोकरचाकरांकडून आपापलीं कामें वेळच्या वेळेवर व्यवस्थित रीतीनें करवून न घेतलीं तर काय नुकसान होतें, कोठें पैसा खर्च करावा आणि कोठें करूं नये, ह्या व अशाच प्रकारच्या दुसऱ्या गोष्टी ज्यांनां चांगल्या ठाऊक नसतात, त्यांच्या हातून स्थानिकस्वराज्याची व्यवस्था चांगल्या रीतीनें होणें कठीण, व स्थानिकस्वराज्याची चांगली व्यवस्था करतां येत नसेल, तर राज्यव्यवस्था करतां येणें त्याहून कठीण, असा साधारण नियम आहे. हा नियम लक्ष्यांत आणून आनंदीबाईनीं घरांतील व्यवस्था ठेविली होती. या व्यवस्थेपासून काय सुख होतें व काय फायदा होतो, हें यशोदाबाईस कळून आलें होतें, ह्मणून या बाबतींत त्यांचें अनुमोदन होतें, इतकेंच नाहीं, तर आनंदीबाईस त्यांची सर्व प्रकारें मदत होती. यामुळें यशोदाबाईचें घर हें कांहीं अंशीं गृहशिक्षणाचें एक खरें शालागृहच होतें, असें ह्मटलें तरी चालेल.

आह्मीं वर सांगितलेंच आहे, कीं, शेजारपाजारच्या पुष्कळ स्त्रिया आनंदी-बाईकडे रोज येत असत. आनंदीबाई त्यांनां वायफळ गप्पा मारूं देत नसत. कांहीं तरी योग्य प्रसंग पाहून त्या त्यांच्याबरोबर उपयुक्त विषयांवर बोलत असत. त्यांचा मुख्य विषय ह्मटला ह्मणजे स्त्रियांनीं कसें वागावें, मुलांचें संगोपन कसें करावें व त्यांनां शिक्षण कसें द्यावें, हा असे. हा विषय सर्वांनां गोड वाटत नसे; यामुळें प्रथम ज्या स्त्रिया गप्पा मारण्यासाठीं येत, त्या पुढें येईनातशा झाल्या.

एके दिवशीं यशोदाबाईची मैत्रीण आपल्या दोन मुलींसह मुंबईहून आली होती. ती घरची बरी असून तिच्या नवऱ्यास मोठा रोजगार होता. ती साधा-रण शिकलेली होती. तिच्या मुलींसहि बरेंच शिक्षण मिळालें होतें; यामुळें त्यांनां अंमळसा अभिमान वाटे. त्यांनां वाटत असे, कीं, दुसऱ्या मुलींस आपल्या

इतकें येत नाहीं. त्यांच्या आईची कांहींशी अशीच समजूत असे. त्या मुली दिसण्यांत सुंदर होत्या व त्यांची आईहि बरीच हौशी असल्यामुळें मुलींनां नटाविणें, हें ती मुख्य काम समजत असे. यशोदाबाईनीं त्या सर्वांचें योग्य आदरातिथ्य केलें. जेवणखाण झाल्यावर यशोदाबाई व तिची मैत्रीण ह्या परस्पर सुखदुःखांच्या गोष्टी सांगत बसल्या. बोलतां बोलतां मुलींच्या शिकण्यावरून गोष्ट निघाली. तेव्हां यशोदाबाईची मैत्रीण ह्मणाली "मुलींच्या विद्याभ्यासासंबंधानं आह्मांला फार खर्च आला. माझ्या मनांतून मुलींनां इंग्रजी शिकवायचं नव्हतं; परंतु अलीकडे मुंबईंत मुलींनां इंग्रजी शिकविण्याचा प्रघात पडल्यामुळं मुली इंग्रजी शाळेंत न पाठविल्या, तर लोक हंसतील ह्मणून त्यांनां शाळेंत पाठविण्याविषयीं मीं रुकार दिला. असं करण्यापासून त्यांनां कांहीं फायदा होईल, असं मला वाटलं नव्हतं; परंतु आतां त्यांनां कविता ह्मणतां येतात, गातां येतं, वाद्यं वाजवितां येतात, तऱ्हतऱ्हेचीं लोंकरीचीं फुलं तयार करितां येतात, व इंग्रजींत बोलतां येतं."

हें ऐकून प्रथम यशोदाबाईस वाटलें, कीं, आपल्या मैत्रिणीच्या मुलींच्या अंगीं चांगले गुण असले पाहिजेत. त्यांनां असें वाटण्यास दुसरेंहि एक कारण असें होतें, कीं, त्या मुली दिसण्याला तरतरीत दिसत व चुरचुर बोलत; परंतु हा ग्रह लवकरच नाहींसा झाला. त्यांच्या मैत्रिणीचें नांव रमाबाई होतें. रमाबाईच्या मुलींच्या बोलण्याचालण्यावरून यशोदाबाईस तेव्हांच कळून आलें, कीं, आपल्या मुलींचें शिक्षण रमाबाईच्या मुलींच्या शिक्षणापेक्षां पुष्कळ बरें आहे, व याचें दुसऱ्याच दिवशीं प्रत्यंतर आलें. रमाबाई व त्यांच्या मुली रोजच्या संवयीप्रमाणें दिवस बराच वर आल्यावर उठल्या. उठल्यावर घटका दोन घटका वेणीफणी करण्यांत व नटण्यांत त्यांचा वेळ गेला. जेवणखाण झाल्यावर त्या यशोदाबाईबरोबर बोलत बसल्या. त्यांचा मुख्य विषय डागडागिने, पोषाख वगैरे हा होता. यशोदाबाईस त्याचा कंटाळा आला; परंतु कधीं न येणारी आपली मैत्रीण फार दिवसांनीं आपल्या येथें आलेली आहे, असें समजून त्या बाह्यतः प्रसन्न मुद्रा दाखवून त्यांच्याशीं बोलत बसल्या. रोजच्याप्रमाणें दुपारीं चार वाजतां शेजारपाजरच्या बायका त्यांच्या घरीं जमल्यावर यशोदाबाई व आनंदीबाईशीं त्यांचें संभाषण चाललें असतांना रमाबाई व त्यांच्या मुली मधून मधून बोलत होत्या. आमच्या मुंबईस वाटेल तीं फळें मिळतात, आमच्या मुंबईस हवीं तीं

जिन्नस मिळते, हें त्यांचें पालुपद चालत असे. आनंदीबाईनीं त्याकडे लक्ष्य दिलें नाहीं. साडेपांच वाजल्याबरोबर बाळ्या ह्मणाला "मावशीबाई, साडेपांच झाले. बैल जुंपून ग्यानू विहिरीपाशीं उभा आहे. आह्मी बागेंतील झाडांस पाणी घालावयास जावें का ? तुह्मी येतांना ?"

बाळ्याची उत्सुकता पाहून आनंदीबाई लागल्याच उठल्या व परसांत गेल्या. त्यांच्या मागोमाग काशी व माई हातांत लहानशा कळशा घेऊन गेल्या. गप्पा मारण्यासाठीं आलेल्या बायका उठून आपापल्या घरीं गेल्या. स्वयंपाकीणबाई आपल्या कामास लागली. मोलकरीण केरसुणी घेऊन माडया झाडावयास गेली. दुसरा नोकर दारापुढील जागा साफ करूं लागला. हें झाडणें आटोपल्यावर तो कुंडींतील पाणी घेऊन झारीनें रस्ता शिंपडूं लागला. हा सर्व प्रकार शांतपणें चालला होता. तें पाहून रमाबाईस व त्यांच्या मुलींस आश्चर्य वाटलें. रमाबाई यशोदाबाईस ह्मणाल्या "आज तुमच्या इथं कांहीं गडबड आहे वाटतं ?"

यशोदाबाईनीं उत्तर केलें "ही गडबड आमच्या इथं बारा मास असते !"

"बारा मास ?"

"होय, बारा मास."

"सकाळीं संध्याकाळीं सुद्धां ?"

"होय."

यावर रमाबाईच्या मुली ह्मणाल्या "सकाळीं तर आह्मी सावकाश उठतों; नंतर सावकाश वेणीफणी करितों; संध्याकाळीं शाळेंतून आल्यावर कंटाळा येतो ह्मणून गात बसतों, किंवा विलायतेहून बाबांनीं आमच्याकरितां पियानो आणिला आहे तो वाजवित बसतों; जेवणखाण आटोपल्यावर निजतों."

यशोदाबाई ह्मणाल्या "कांहीं दिवसांपूर्वी तुमच्याप्रमाणंच माझीहि संवय होती; परंतु अलीकडे ती पुष्कळ मोडली आहे. उशिरां उठण्याची व स्वस्थपणं बसून गप्पा मारण्याची आतां मला लाज वाटते; ह्मणून मीहि बागेंत जाऊन मुलांबरोबर काम करित्यें. त्यामुळं मुलांस आनंद वाटून मलाहि चांगली करमणूक होते व श्रम होऊन चांगली भूक लागते. अलीकडे डोकं दुखण्याचा अथवा पोट दुखण्याचा वगैरे माझा कांहीं बोभाटा नाहीं."

रमाबाई ह्मणाल्या " आह्मी असलीं कामं कधींहि करित नाहीं. माझ्या मुलींनां तर तीं कधींहि आवडायचीं नाहींत. घरच्यांसहि तीं आवडत नाहींत. आह्मांला नेहमीं सांगणं असतं, कीं, हीं कामं गड्यामाणसांचीं आहेत. मलाहि तसंच वाटतं. असलीं कामं मुलींनीं केलीं, तर त्यांचा सुकुमारपणा नाहीं का कमी होणार ? "

यशोदाबाई ह्मणाल्या " माझ्या मुलींनां हींचशीं काय, परंतु असल्या प्रकारचीं दुसरीं कामं करण्याची मोठी हौस वाटते. या कामांमुळं त्यांचा सुकुमारपणा कमी न होतां त्यांच्या तोंडावर उलट जास्त टवटवी दिसत आहे !"

रमाबाईंनीं चकित होऊन विचारलें " ह्मणजे ? "

" ह्मणजे काय ? मला प्रथम तुमच्याप्रमाणंच वाटत होतं. परंतु अनुभवावरून माझी समजूत निराळी झाली आहे. नुसत्या सुकुमारपणापेक्षां शरीरप्रकृति साफ असणं चांगलं, असं मला वाटूं लागलं आहे. बागेच्या संबंधानं अलीकडे माझ्याकडेहि कांहीं कामगिरी असते. अलीकडे काम करण्याचं मला कांहींच वाटत नाहीं. उलट, काम करित न बसलं तर कंटाळा येतो. तुह्मांला या गडबडीचं जितकं आश्चर्य वाटतं, तितकं आह्मांला मुळींच वाटत नाहीं. ही आमच्या पाठांतली आहे, ह्मणून ही गडबड आहे, असं आह्मांला वाटत नाहीं. सर्व कामं व्यवस्थितपणानं व्हावींत ह्मणून आनंदीबाईंनीं मुलांच्या मागं रोज क्रम लावून दिला आहे, त्याप्रमाणं मुलांचं वर्तन असतं. "

" तो कोणता ? "

" आनंदीबाई पहाटेस साडेचार वाजतां उठतात. त्यामुळं नोकरचाकर त्या वेळेस आपोआप उठतात. पांच वाजण्याच्या सुमारास त्या मला व मुलांनां उठवितात. मुलांचं मुखमार्जन वगैरे आटोपल्यावर तीं थोडा वेळ भजन करितात. सहा वाजल्याबरोबर बाळ्या घोड्यावर बसून रपेट करण्यास जातो, व सात वाजतां परत येतो. एवढ्या वेळांत आह्मी वेणीफणी वगैरे उरकून घेतों. बाळ्या फिरून परत आल्यावर गाईचं धारोष्ण दूध पितो. नंतर आह्मी सर्वजणं बागेंत जातों. मुलं आपापल्या वाफ्यांतील केरकचरा काढून टाकितात. मी फुलं तोडून नंतर भाजी काढिल्यें. हें काम संपल्यावर आनंदीबाई मुलांसह घरांत चोहोंकडून हिंडून येतात. पाणी टाकून पायखाना साफ झाला आहे किंवा नाहीं, गोठ्यांतील शेण व तबेल्यांतील लीद काढून तेथील

सर्व जागा साफ केली आहे किंवा नाहीं, परसांतील व बागेंतील केरकचरा काढून नेमलेल्या ठिकाणीं टाकून दिला आहे किंवा नाहीं, घरांतील मोऱ्या धुऊन साफ केल्या आहेत किंवा नाहींत, पुढलं अंगण झाडून त्यांत सडा टाकिला आहे किंवा नाहीं, स्वयंपाकघर, माजघर व माड्या झाडून स्वच्छ ठेविल्या आहेत किंवा नाहींत, तात्पर्य, चोहोंकडे साफ करून जेथल्या जिनसा तेथें ठेविल्या आहेत किंवा नाहींत, हें त्या पाहून येतात व मुलांकडून आपापल्या खोल्यांतील पुस्तकं, चित्रं वगैरे साफ करवितात. या वेळांत मी डाळ, तांदूळ वगैरे काढून तयारी करून ठेवित्यें. नंतर आह्मी सर्वजणं स्नान वगैरे उरकून घेतों. या कृत्यास साडेआठ होतात. साडेआठ वाजल्यापासून साडेदहांपर्यंत मुलं शिकत बसतात. तोंपर्यंत मी देवपूजा आटोपून घेत्यें व नारायणस्तोत्र ह्मणत्यें. ”

रमाबाईनीं तें स्तोत्र आपल्याला म्हणून दाखविण्यास सांगितल्यावरून यशोदाबाईनीं तें पुढीलप्रमाणें म्हटलें:—

नारायण नारायण जय गोविंद हरे ॥
नारायण नारायण जय गोपाल हरे ॥ ध्रु० ॥
करुणापारावारा वरुणालयगंभीरा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ १ ॥
घननीरदसंकाशा कृतकलिकल्मषनाशा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ २ ॥
यमुनातीरविहारा धृतकौस्तुभमणिहारा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ ३ ॥
पीतांबरपरिधाना सुरकल्याणनिधाना ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ ४ ॥
मंजुलगुंजाभूषा मायामानुषवेषा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ ५ ॥
मुरलीगानविनोदा वेदस्तुतभूपादा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ ६ ॥
बर्हिनिबर्हापीडा नटनाटकफणिक्रीडा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ ७ ॥
जलरुहदलनिभनेत्रा जगदारंभकसूत्रा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ ८ ॥

वारिजभूषाभरणा राजिवरुक्मिणीरमणा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ ९ ॥
पातकरजनी संहर करुणालय मामुद्धर ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ १० ॥
अघबकक्षय कंसारे केशव कृष्ण मुरारे ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ ११ ॥
हाटकनिभपीतांबर अभयं कुरु मे मावर ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ १२ ॥
दशरथराजकुमारा दानवमदसंहारा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ १३ ॥
शरयूतीरविहारा सज्जनऋषिमंदारा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ १४ ॥
विश्वामित्रमखत्रा त्रिविधपरा सुचरित्रा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ १५ ॥
ध्वजवज्रांकुशपादा धरणीसुतसहमोदा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ १६ ॥
जनकसुताप्रतिपाला जय जय संसृतिलीला ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ १७ ॥
दशरथवाग्धृतिभारा दंडकवनसंचारा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ १८ ॥
मुष्टिकचाणुरसंहारा मुनिमानसविहारा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ १९ ॥
वालीनिग्रहशौर्या वरसुग्रीवहितार्या ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ २० ॥
मा मुरलीकरधीवर पालय पालय श्रीधर ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ २१ ॥
जलनिधिबंधनधीरा रावणकंठविदारा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ २२ ॥
ताटिकामददलनाढ्या नटगुणविविधधनाढ्या ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ २३ ॥
गौतमपत्नीपूजन करुणाघनावलोकन ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ २४ ॥
सीतासंभ्रमहारा साकेतपुरविहारा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ २५ ॥

अचलोद्धृति चंचत्कर भक्तानुग्रहतत्पर ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ २६ ॥
नैगमगानविनोदा रक्षसुतप्रह्लादा ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥ २७ ॥
भारतियतिवरशंकर नामामृतमखिलांतर ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ॥
नारायण नारायण जय गोपाल हरे ॥ २८ ॥

स्तोत्र ह्मणून दाखविल्यावर यशोदाबाई ह्मणाल्या "पुढं अकरांच्या सुमारास आमचं जेवण आटोपतं. नंतर मी व आनंदीबाई बोलत बसतों. कधीं कधीं त्या वर्तमानपत्रं वाचित बसतात व मी झोंप घेत्यें. मुलं खेळतात, चित्रं अथवा नकाशे पाहतात, किंवा त्यांनां वाद्य घेऊन दिलं आहे तें वाजवित बसतात. एक वाजल्यापासून तों चार वाजेपर्यंत मुलं पुनः शिकत बसतात. मी वाचित बसत्यें किंवा प्रपंचसंबंधीं कांहीं काम करायचं असल्यास तें करत्यें. मुलं इकडे पुनः खेळतात. बाळ्यासाठीं कांहीं पदार्थांचा संग्रह करून दिला आहे, त्याच्या व्यवस्थेंत तो असतो. मुली कधीं शिवणकाम व लोंकरीचं काम करितात, किंवा कधीं मोरावळा, हलवा वगैरे जिनसा करायच्या असल्यास त्या करित बसतात. नंतर तीं फराळ करितात. साडेपांच वाजल्याबरोबर आह्मी सर्वजणं पुनः बागेंत जाऊन झाडांनां पाणी घालतों. हें काम आटोपल्यावर कांहीं वेळानं आमचं जेवण होतं. जेवणानंतर मुलं शतपावली करितात. हें होतं, तों साडे-आठांचा सुमार होतो. नंतर आनंदीबाई मुलांनां वर्तमानपत्रांतील अथवा दुसऱ्या गोष्टी सांगतात. साडेनऊ वाजल्याबरोबर मुलं निजतात. आनंदीबाई व मी वाचित बसतों. नंतर घरांत झाकापाक बरोबर झाली आहे किंवा नाहीं, कडीकुलपं लाविलीं आहेत किंवा नाहींत, व गुरांची व्यवस्था नीट झाली आहे किंवा नाहीं, हें पाहून सर्व बंदोबस्त करून आह्मी निजतों. असा आमचा रोजचा क्रम आहे."

यशोदाबाईंनीं वाचलेला हा लांबलचक पाढा पाहून रमाबाई आश्चर्यानें ह्मणाल्या " अगबाई, तुमचीं रोजचीं कामं पुष्कळच दिसतात !"

यशोदाबाई ह्मणाल्या "होय, कागदावर तीं पुष्कळ दिसतात खरीं; परंतु रोजच्या परिपाठामुळं आह्मांला तीं फारशीं वाटत नाहींत. प्रथम प्रथम त्यांचा मला फार कंटाळा वाटत असे; परंतु आतां कांहीं एक त्रास होत नाहीं. "

" तुह्मी इतकीं कामं करितां, मग नोकरचाकर काय करतात ?"

" नोकरचाकरांस दिवसांतून फक्त दोन तीन तास विसावा सांपडतो; बाकी सारा वेळ त्यांनां काम पुरवतं. ज्या वेळेस मी घरांत पाहत नव्हत्यें, त्या वेळेस त्यांनां फार गमावयास सांपडे; परंतु हल्लींच्या व्यवस्थेनं त्यांनां गमण्यास वेळ सांपडत नाहीं, किंवा कुटाळ्या करण्यास सवड होत नाहीं. अलीकडे त्यांचीं गान्हाणीं माझ्या कानांवर येत नाहींत."

" तुमच्या आनंदीबाईला तर बिलकुल विसावा सांपडत नसेल. त्यांनां इतक्या कामांचा उरक तरी कसा आहे, याचं मला नवल वाटतं बाई !"

" आनंदीबाईस श्रम करण्याचं कांहींच वाटत नाहीं. त्यांचं ह्मणणं असं आहे, कीं, उगीच स्वस्थपणं बसून गप्पा मारण्यांत अथवा अंथरुणावर स्वस्थ पडून राहण्यांत खरी विश्रांति नसून ती उद्योगवैचित्र्यांत आहे. मनुष्यास पुष्कळ कामं करायचीं असलीं, तरी जर तें तीं कामं व्यवस्थेनं वेळच्या वेळीं करूं लागेल, तर त्याला त्यांचं कांहींच वाटणार नाहीं. व्यवस्थितपणा व नियमितपणा हे दोन गुण मनुष्याच्या अंगीं अवश्य असले पाहिजेत."

अशा प्रकारें यशोदाबाई व रमाबाई ह्यांचें संभाषण बराच वेळ चाललें होतें. कांहीं वेळानें आनंदीबाई व मुलें काम करून घरांत आलीं. यशोदाबाईंनीं आपल्या गृहस्थितीचें जें वर्णन केलें, तें रमाबाईंस व तिच्या मुलींस खरें वाटलें नाहीं. त्याचप्रमाणें मनुष्यानें आपणास इतकें बांधून घेऊन काम करावें, हेंहि त्यांनां पसंत पडलें नाहीं. तथापि, यशोदाबाईंची गृहस्थिति काय आहे तें स्वतः पाहण्याची व गृहशिक्षणाच्यासंबंधानें आनंदीबाईंचे विचार काय आहेत हें समजून घेण्याची त्यांनां जिज्ञासा झाली. परंतु मोठ्या पहाटेस उठावें कोणीं ? ही पंचाईत पडली ! शेवटीं त्या मायलेकींचें असें ठरलें, कीं, उठल्यावर जें पहावयाचें तें पाहूं; झोंप बुडवून पाहण्यांत अर्थ नाहीं !

दुसरे दिवशीं जेवणखाण आटोपल्यावर सर्व मंडळी एके ठिकाणीं बसली. त्या वेळेस रमाबाई यशोदाबाईंस ह्मणाल्या " घरांतील तुमची व्यवस्था चांगली असते, असं मला समजलं; पण तुमचं घर तरी कसं आहे तें पहाण्याची माझी इच्छा आहे."

घर पाहण्याविषयीं रमाबाईंनीं इच्छा प्रदर्शित करतांच यशोदाबाई हंसून ह्मणाल्या "माझं घर ह्मणजे का नानाचा वाडा, का माणकेश्वराची हवेली, ह्मणून

ती पहायची ? माझं घर बोलूनचालून शेरावाशांचं; त्यांत काय पहायचें आहे ? तथापि, तुमची मर्जी आतांच तें पाहण्याची असेल, तर माझी हरकत नाहीं; परंतु घरांत आनंदीबाईंच्या हातची सर्व व्यवस्था असल्यामुळं माझ्यापेक्षां त्यांना विशेष माहिती आहे."

हें ऐकून आनंदीबाईस मोठें आश्चर्य वाटलें. त्या ह्मणाल्या "यशोदाबाई, घराच्यासंबंधानं तुमची समजूत कांहीं चमत्कारिक दिसते. मोठमोठाल्या हवेल्या मात्र पहाव्या, व शेरावाशांचीं घरं पाहूं नयेत, हें म्हणणं मला विलक्षण वाटतं!"

यावर यशोदाबाई ह्मणाल्या "मला वाटतं, माझ्या ह्मणण्याचा भाव तुह्मी समजलां नाहीं. माझं ह्मणणं इतकंच कीं, आमचं घर मोठं भव्य नाहीं किंवा दिसण्याला शोभायमान नाहीं. माणकेश्वराचा अथवा नानाचा वाडा बांधून किती दिवस झाले आहेत ? परंतु त्याचा अद्याप कोपरासुद्धां ढळला नाहीं. असलीं घरं उन्हाळ्याला अथवा पावसाळ्याला जुमानित नाहींत. तीं पिढ्यान्-पिढ्या टिकतात. एकदा बांधलीं, कीं, दुरुस्तीचं नांव नको. त्यांतील भिंती किती मजबूत व तुळ्या किती जाड असतात ! मोरोबादादाचा अथवा नानाचा वाडा अथवा माणकेश्वराची हवेली तुह्मीं आंत जाऊन पाहिली असती, तर तुमचा समज निराळा झाला असता. बुधवारचा वाडा जळाला; तो तुमच्या पाहण्यांत असता, तर तुह्माला आश्चर्य वाटलं असतं."

आनंदीबाई ह्मणाल्या "कोणाहि एखाद्या व्यक्तीच्या घराच्या संबंधानं बोलण्याची माझी इच्छा नाहीं. जे गर्भश्रीमंत आहेत त्यांच्याविषयीं मला सध्या बोलायचं नाहीं. घराच्या बाबतींत ज्याप्रमाणं तुमचा समज आहे, त्याप्रमाणंच पुष्कळ लोकांचा समज आहे. लठ्ठ खांब व जाड भिंती यांची मी फारशी मातबरी समजत नाहीं; घरं एका पिढीला टिकतील किंवा पिढ्यान्‌पिढ्या टिकतील त्याचं मी विशेष महत्त्व समजत नाहीं; किंवा तीं सुशोभित आहेत अथवा नाहींत, ह्याहि गोष्टीचं मी विशेष कौतुक करित नाहीं. जे लोक असल्या गोष्टींचं गौरव करितात ते चूक करितात, व जे त्यांप्रीत्यर्थंच हजारों रुपये खर्च करून बसतात ते अविचार करतात, अशी माझी समजूत आहे. घराच्या भिंती जाड असाव्या व त्यांचे खांब लठ्ठ असावेत; अथवा घरं तीन तीन मजले उंच बांधण्याची लोकांची विशेष खटपट असावी परंतु त्यांत राहणारीं मुलं शरीरानं मजबूत व उंच असावींत ह्मणून तितका उद्योग नसावा; धोंडा,

लांकूड व चुना पिढ्यानूपिढ्या टिकावा म्हणून त्यांची उत्तम प्रकारची निवड करून त्यांची मशागतहि चांगली करावी; तात्पर्य, घरं फार दिवस टिकावींत ह्मणून दूरदर्शीपणा दाखवावा, परंतु त्या घरांत नांदणारांनां पिढ्यानूपिढ्या टिकणारं शिक्षण देण्याविषयीं, त्यांच्यामधें पिढ्यानूपिढ्या राहणारं सामर्थ्य उत्पन्न करण्याविषयीं लोकांची दूरदृष्टि नसावी, ह्याहून आश्चर्य तें कोणतं? मुलांकरितां घरं हा प्रश्न महत्त्वाचा किंवा घरांकरितां मुलं हा प्रश्न महत्त्वाचा? लठ्ठ खांब व जाड भिंती यांप्रीत्यर्थ जो उत्साह व पैसा खर्च करायचा, त्याच्या निम्मे जर मुलांच्या ज्ञानासाठीं, आचरणासाठीं व शारीरबलासाठीं खर्च झाला, तात्पर्य, या तिहींच्या योगानं अंगीं जें सामर्थ्य येतें तें त्यांच्यामधें आणण्याविषयीं मुख्यत्वें उद्योग केला, उत्साह दाखविला व पैसा खर्चिला, तर त्यांनां व आपणांस फार सुख होईल व त्यांचं नि आपलं निरंतरचं कल्याण होईल. मुलांच्या अंगीं सामर्थ्य असेल, तर तीं मोठीं झाल्यावर एक सोडून दहा मोठालीं घरं बांधतील; परंतु जर त्यांनां संभाळण्याचं ज्ञान व जास्ती मिळविण्याचं शहाणपण नसेल तर तीं आहे तें घालवून बसतील, मग जास्ती मिळविण्याविषयीं बोलावयास नको! आज शेंकडों घरांचा इतिहास पाहिला, तर बांधणारा एक व त्यांचा उपभोग घेणारा दुसरा, असंच पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतं. ह्यावरून कोणीं मोठालीं घरं बांधूं नयेत, असं मी ह्मणत नाहीं. ज्यांच्यापाशीं पुष्कळ पैसा आहे, अथवा ज्यांनां मोठं ऐश्वर्य प्राप्त झालं आहे ते खुशाल बांधोत; परंतु मध्यम स्थितींतील लोकांनीं लठ्ठ खांब, जाड भिंती अथवा शोभा यांविषयीं जास्त काळजी घेणं व मुलांमधें सामर्थ्य उत्पन्न करण्याविषयीं बेफिकिर असणं अथवा कमी काळजी घेणं, हें शहाणपणाचं नाहीं!"

रमाबाई ह्मणाल्या "एकूण, तुमचं ह्मणणं असंच कीं नाहीं, कीं, आजपर्यंत ज्यांनीं मोठमोठाल्या हवेल्या बांधिल्या आहेत ते सर्व वेडे, अन् ज्यांनीं लहान घरं बांधिलीं आहेत ते शहाणे! मला वाटतं, घरासारख्या स्थावर मिळकतींत पुष्कळ पैसे घातले असतां एका प्रकारचा संचय होतो, व मुलांनां पैसे लवकर उडवून टाकण्यास सवड नसते."

आनंदीबाई ह्मणाल्या "मोठाल्या हवेल्या बांधणारे शहाणे, किंवा लहान घरं बांधणारे शहाणे, याविषयीं आपण सूर्त विचार करित नाहीं. माझं ह्मणणं एवढंच कीं, घरांत जीं मुलं नांदावयाचीं त्यांमधें सामर्थ्य येईल अशाविषयीं

दूरवर नजर न देतां, व प्रथमपासून योग्य तजवीज करून न ठेवितां, जे माती व लांकूड ह्यांच्या पिढ्यांविषयीं काळजी घेतात, त्यांचं वर्तन शहाणपणाचं नाहीं. पहिला विचार त्या घरांत नांदणाऱ्या मुलांचं शिक्षण व त्यांची शरीरप्रकृति ह्यांविषयींचा होय. ही गोष्ट लक्ष्यांत ठेवून जें आचरण करायचं तें शहाणपणाचं, व ज्या वर्तनानं या गोष्टीस बाध येतो तें अविचाराचं, एवढाच माझा ह्मणण्याचा भाव आहे."

आनंदीबाई पुढें ह्मणाल्या "हे विचार लक्ष्यांत न आणितां घरं पिढ्यान्-पिढ्या टिकावींत एवढ्याचसाठीं पैशाचा जे चुराडा करितात, ते एक मोठी चूक करितात अशी माझी समजूत आहे. आपल्या या कृतीनं ते आपल्या मुलांस बांधून टाकितात व त्यांनां कमजास्त सोय करण्यास सवडच ठेवित नाहींत. जी सोय आपणांस बरी वाटते, ती कदाचित् आपल्या मुलांनां बरी वाटणार नाहीं. ज्याप्रमाणं आपले आचारविचार, पोषाख वगैरे बाबतींत फेरफार होत चालला आहे, त्याप्रमाणं घरांच्या रचनेंतहि फेरफार होत चालला आहे, आणि असा फेरफार होणं हें स्वाभाविक आहे; परंतु पिढ्यान्पिढ्या टिकणारीं घरं बांधून ठेविलीं ह्मणजे अर्थात् मुलांचे हातपाय बांधले जातात व कित्येक वेळां त्यांनां गैरसोईच्या घरांत जन्म काढावा लागतो. ही गोष्ट चांगली नाहीं, हें कोणीहि कबूल करील. आतां जें मी विशेष सांगत आहें तें केवळ घराच्याच संबंधानं आहे, असं नाहीं. आपल्या एकंदर कृतीच्या संबंधानं मी बोलत आहें. आपली प्रत्येक कृति नेहमीं शहाणपणाची असते, असं धेऊन चालणं हें कांहीं अंशीं साहस आहे; ह्मणून आपल्या कृतीनं आपल्या मुलांचे हातपाय निरंतर जखडून न टाकितां त्यांनां योग्य शिक्षण देऊन त्यांनां योग्य दिसतील त्या सोयी करण्यास, व देश, काल, वर्तमान ह्यांनां अनुसरून आचरण करण्यास सवड ठेवणं, हें विशेष शहाणपणाचं आहे, असं मला वाटतं."

रमाबाईनां आपले विचार मोकळेपणें सांगण्याची आनंदीबाई संधीच पहात होत्या. यावेळीं ही योग्य संधि साधून त्या आणखी ह्मणाल्या "घरांत पैसा घातला असतां एका प्रकारचा संचय होतो, असं तुमचंच ह्मणणं आहे असं नाहीं. पुष्कळ लोकांची अशीच समजूत असल्यामुळं ते घरांत पैसे घालून नंतर पस्तावा पावतात. याच संचयाविषयीं काय, परंतु एकंदर निरनिराळ्या प्रकारच्या संचयाविषयीं पुष्कळ लोकांची चमत्कारिक समजूत आहे. ओढाताण

करून डागडागिन्यांत, घरांत, शेतांत अथवा व्यापारांत पैसा घातला, ह्मणजे आपण चांगला संचय केला व यामुळं आपण कृतकृत्य झालों, असं समजणारे पुष्कळ लोक दृष्टीस पडतात; परंतु खऱ्या संचयाविषयीं काळजी वाहणारे थोडे दृष्टीस पडावे, हें आश्चर्य आहे! ज्यांच्यासाठीं आपल्या जीवाचा आटापिट करून व केव्हां केव्हां पोटाला चिमटा घेऊन सोनंनाणं खरेदी करायचं, घरदार बांधून ठेवायचं, शेतवाडी संपादन करायची, अथवा उदीमव्यापार करायचा, तीं जर शक्तिहीन, ज्ञानहीन व विचारहीन असतील, तर असल्या संचयापासून विशेष उपयोग काय आहे? प्रसंगीं असला संचय विशेष कामास येईल काय? यावरून असला संचय बिलकूल करूं नये, असं मी ह्मणत नाहीं. या संचयाची आवश्यकता आहे, ही गोष्ट खरी आहे; या संचयावांचून व्यवहार चालावयाचा नाहीं हेंहि खरं आहे; परंतु हा संचय पुढं मुलांच्या उपयोगीं पडावा ह्मणून रात्रंदिवस कष्ट करून त्याच्याच मागं न लागतां आरोग्य, ज्ञान, सद्वर्तन व प्रसंग पडला असतां त्यांतून पार पडून जाण्याचं सामर्थ्य ह्या गोष्टी मुलांमधें असण्याविषयीं तजवीज केली तर त्यांचं व त्यामुळं समाजाचं विशेष हित होणार आहे. शारीरिक व मानसिक बलसंचय हा प्रथम संचय होय. हा संचय मुलांजवळ असेल, तर थोडे दिवसांत तीं दुसऱ्या प्रकारचा संचय करितील; परंतु डाग-डागिने, घरदार, शेतवाडी वगैरे संचयानं आरोग्य, सद्वर्तन, उद्योगसातत्य, प्रसंगीं धैर्य, व पैसा मिळविण्याचं शहाणपण वगैरे गुण येण्याचा संभव कमी असतो. मुलांच्या शरीरांत व मनांत सामर्थ्यसंचय करून ठेवणं, हा महत्त्वाचा संचय करणं आहे; हा हेतु मनांत धरून उद्योग करणं शहाणपणाचं आहे; हा हेतु सिद्धीस नेण्यासाठीं जो संचय जरूर आहे, तो करणं श्रेयस्कर आहे. देशांत भांडवल पुष्कळ खेळूं लागलं ह्मणजे, व लक्षावधि रुपयांचा माल बाहेर जाऊं लागला ह्मणजे अथवा देशांत येऊं लागला ह्मणजे, लोकांची स्थिति चांगली आहे, व देशाची भरभराट आहे, असं समजणारे पुष्कळ लोक आहेत; परंतु! एवढ्याच कारणावरून त्या देशाचा विशेष गौरव करणं ही कांहीं अंशीं चूक आहे. धनसंचय करणं तो प्रसंगीं उपयोगीं पडावा ह्मणून आहे; परंतु लोकांजवळ सामर्थ्यसंचय नसेल, तर लाखों रुपयांच्या घडामोडी होऊन लाखों रुपयांचा संचय झाला तरी त्यापासून वस्तुतः प्रसंगीं फारसा उपयोग होणार नाहीं. सामर्थ्यसंचय असेल, तर प्रसंगांतून पार पडून जातां येईल.

हा संचय असेल, तर शिकंदर बादशाहा अथवा नेपोलियन व जंगीझखान अथवा तैमूरलंग यांसारख्या सत्तालुब्ध अथवा धनलुब्ध महात्त्वाकांक्षी लोकांस तो एकाएकीं हरण करितां येणार नाहीं. जुलमानं अथवा आकस्मिक गोष्टीनं पैशाचा संचय हरण झाला, अथवा सत्ता हरण झाली, तथापि लोकांत सामर्थ्यसंचय असेल तर थोडेच दिवसांत लोक डोकं वर काढतील. इ० स० १७२० त साउथ सी बबलमुळं इंग्लंदांतील शेंकडों घरं धुळीस मिळालीं; परंतु थोड्याच दिवसांत लोकांनीं डोकं वर काढिलं. इ०स० १८०६ त जीना येथें लढाई करून नेपोलियन बादशाहानं प्रशियन लोकांचा पाय लंगडा केला; परंतु त्यांनीं थोड्याच दिवसांत डोकं वर केलं. इ० स० १८६४ त शेअरच्या व्यापारामुळं मुंबईचे पुष्कळ व्यापारी धुळीस मिळाले; परंतु मुंबईची हल्लींची स्थिति पूर्ववत् होऊं लागली आहे. इ० स० १८७०।७१ त फ्रेंच व जर्मन लोकांमध्यें लढाई झाली. त्या वेळेस फ्रेंच लोकांपासून जबर खंडणी घेतली ह्मणजे त्यांचा पाय लंगडा होईल, असं जर्मन लोकांना वाटलं; परंतु फ्रेंच लोक आतां पूर्वस्थितीवर आले आहेत. या सर्वांचं खरं बीज पाहूं गेलं असतां या निरनिराळ्या लोकांचं सामर्थ्य हेंच याचं कारण होय, असं आपणांस दिसून येईल. उलट पक्षीं, हिंदुस्थान देशांतील शेंकडों जहागीरदार, इनामदार व संस्थानिक जे धुळीस मिळाले, त्यांपैकीं थोड्यांनींच वर डोकं केलं. याचं कारण हें, कीं, त्यांच्यांत व त्यांच्या पदरच्या माणसांत जो सामर्थ्यसंचय पाहिजे होता, तो नव्हता. अशा प्रकारचीं दोन्हीं बाजूंचीं पुष्कळ उदाहरणं आहेत. या एकंदर हकीगतीचं तात्पर्य हें, कीं, मुलांच्या संबंधानं काय, समाजाच्या संबंधानं काय, अथवा देशाच्या संबंधानं काय, मुख्य गोष्ट लक्ष्यांत ठेवावयाची ती, ही कीं, अंगीं सामर्थ्यसंचय पाहिजे. हा संचय ज्या मानानं असतो, त्या मानानं मुलांची अथवा समाजाची अथवा देशाची स्थिति बरी किंवा वाईट आहे असं समजावं. सामर्थ्यसंचय करून धनसंचय करून ठेविला, तर आपण कृतकृत्य आहों व आपण आपलं कर्तव्य केलं, असं समजावं. सामर्थ्यसंचय करून न ठेवितां फक्त धनसंचय केला, तर आपलं वर्तन दोषास्पद आहे असं समजावं. हें तत्त्व लक्ष्यांत न ठेवितां आपण वर्तन केलं तर मुलं त्याप्रमाणं करितील व त्यांचं आहित होण्याचा फार संभव आहे. वरील तत्त्व लक्ष्यांत न आल्यामुळं किंवा त्याकडे दुर्लक्ष्य झाल्यामुळं आतांपर्यंत हजारों लोकांचं नुकसान झालं आहे आणि

ह्या चुकीचा समज कायम राहील तर पुढेंहि नुकसान होण्याचा संभव आहे. ह्मणून वरील तत्त्वाची परिस्फुटता जितकी होईल तितकी करणं इष्ट आहे. मीं तुह्मांला, तुह्मीं दुसऱ्याला, दुसऱ्यानं तिसऱ्याला, अशा रीतीनं सर्वत्र या तत्त्वाचा बोध करणं, हें आपणां सर्वांचं कर्तव्य आहे, असं मी समजत्यें."

आनंदीबाई पुढें ह्मणाल्या " खरोखर, घर हें गृहशिक्षणाचं शालागृह आहे. ह्यांत मुलांचा बहुतेक वेळ जात असतो. लहानपणापासून हें रात्रंदिवस त्यांच्या डोळ्यांपुढं असतं. हें शिक्षणाचं व सुखाचं एका प्रकारचं साधन असतं. जर ह्या साधनांत व्यंग आहे, तर शिक्षणाच्या व सुखाच्या साधनांत व्यंग आहे असं समजावं. तेव्हां घर बांधण्यापूर्वी प्रत्येकानं चांगला विचार केला पाहिजे. ज्यानं त्यानं आपल्या ऐपतीप्रमाणं घर बांधावं, ही गोष्ट तर निर्विवाद आहे; परंतु ही ऐपत फक्त घरास लागणाऱ्या लांकूड व माती यांपुरतीच नाहीं, तर त्यासंबंधानं ज्या सोयी अवश्य पाहिजेत, त्यांत ज्या जिनसा अवश्य असल्या पाहिजेत, व त्या जिनसांची नेहमीं चांगली व्यवस्था ठेवण्यास जें सामर्थ्य पाहिजे, त्याचाहि विचार करणं अवश्य आहे."

यावर रमाबाईनीं विचारलें " एकूण, ह्या गोष्टी लोकांस माहीत नाहींत, असं तुमचं ह्मणणं ? "

आनंदीबाई म्हणाल्या " नाहीं, तसं मी म्हणत नाहीं. ह्या गोष्टी पुष्कळांस माहीत आहेत; परंतु ह्यांकडे त्याचं दुर्लक्ष्य फार दिसून येतं. कित्येक शहरांत अथवा खेड्यांत अशीं कांहीं घरं आहेत, कीं, तिथं सूर्यदर्शन बिलकूल होत नाहीं; कांहीं ठिकाणीं उन्हाळ्यांत दुपारीं शिजतं व रात्रीं जीव गुदमरतो; पावसाळ्यांत गळण्यानें जमिनीला ओल येते व अंग धरतं, आणि हिंवाळ्यांत थंडीनें हुडहुडी भरते. कांहीं ठिकाणीं घराला शौचकूप व मोऱ्या नसतात, व असल्या तरी त्यांचा बरोबर निकाल केलेला नसतो. कांहीं ठिकाणीं बारा-बारा चोवीस वर्षांत घरांचीं जळमटं अथवा दुसरी घाण निघालेली नसते किंवा घरांत चोहोंकडे दिवे लावण्याची मारामार पडते. कांहीं ठिकाणीं निवांत बसून काम करीन ह्मटलं तर सोय नसते. कांहीं ठिकाणीं घरं दिसण्याला शोभा-यमान असून त्यांतील सामान इतकं खराब असतं व त्याविषयीं इतका हलग-रजीपणा दिसून येतो, कीं, त्याबद्दल घराला लाज वाटत असेल ! ही शोचनीय स्थिति फक्त गोरगरिबांच्या संबंधानं दृष्टीस पडती, तर त्याबद्दल त्यांनां फारशी

नांवं ठेवण्यास जागा नसती; परंतु ज्यांनां ऐपत आहे व जे समजूतदार आहेत, त्यांचीहि अशी स्थिति दिसून यावी, हें आश्चर्य आहे. अशा स्थितींत त्यांनीं जन्मचा जन्म काढावा व मुलांस घाणेरडं वळण लावून देऊन त्यांनांहि तसाच जन्म काढण्याची संवय लावावी, ही दुःखाची गोष्ट आहे. ज्यांनां गैरसोयीपासून त्रास होत नाहीं, घाणीचं वाईट वाटत नाहीं, खराब सामानाबद्दल व अव्यवस्थितपणाबद्दल लाज वाटत नाहीं, ज्यांची घाण मेलेली आहे, गात्रं शिथिल झालीं आहेत, अथवा बुद्धि मंद झाली आहे, त्यांच्या शरीरांत सामर्थ्य अथवा कुवत किती असणार आहे ? व त्यांच्या मनाचा जोर अथवा उत्साह किती असणार आहे ? लहान मुलं हींच पुढं मोठीं होणार. त्यांचं मत तेंच पुढं लोकमत होणार; व त्या मताप्रमाणंच पुढं सामाजिक व्यवस्था, स्थानिक राज्यव्यवस्था व राज्यव्यवस्था हीं असणार. या तीन प्रकारच्या संस्थांचीं सूत्रं ज्यांच्या हातीं असतात ते आपल्या इच्छेप्रमाणं लोकांस वळण लावितात; परंतु लोकमतांत जोर असला, ह्मणजे लोक आपणांस वाटेल तशा रीतीची सुधारणा करावयास त्यांनां भान पाडतात. ज्यांच्या हातीं अधिकारपरत्वें सूत्रं आलेलीं असतात, त्यांचा लोकांस व लोकांचा त्यांनां वचक असला पाहिजे; व परस्परांपासून परस्परांस मदत झाली पाहिजे. अशी स्थिति नसली, ह्मणजे खरी सुधारणा होण्याचा व लोकांनां खरं सुख मिळण्याचा संभव कमी असतो; परंतु ज्या लोकमताचं बीजच कुजलेलं आहे, अथवा ज्याचा कोंब निस्तेज व खुरटा आहे, तें लोकमत कमजोर असणार, हें सांगावयास नको. जोंपावेतों लोकमत कमजोर आहे, तोंपावेतों त्याचं वजन पडण्याचा व लोकांच्या मनाप्रमाणें सुधारणा होण्याचा संभव कमी आहे. म्हणून घाणीपासून, गैरसोयींपासून, अव्यवस्थेपासून, हलगरजीपणापासून अथवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या गोष्टींपासून परिणामीं अहित होतं, हें मुलांनां लहानपणापासून भासविलं पाहिजे. हा हेतु सिद्धीस नेण्यासाठीं थोडा जास्त पैसा खर्च झाला असतां व्यर्थ व्यय झाला, असं समजूं नये. स्वच्छता व व्यवस्थितपणा हीं अंगमेहनतीनं पुष्कळ अंशीं राखतां येतात. तेव्हां हीं ठेवण्याविषयीं गोरगरिबांची कुरकुर असण्याचं कारण नाहीं व जे सुखवस्तु आहेत त्यांनां तर बिलकुल कारण नाहीं."

रमाबाई म्हणाल्या "मग घरांत व्यवस्था असावी तरी कशी ? जर कांहीं नवीन असेल, तर आह्मी आपल्या इथें ठेवूं."

आनंदीबाई म्हणाल्या "ही व्यवस्था कांहीं नवी आहे असं नाहीं. ही पुष्कळांस माहीत आहे. लोकांची स्थिति निरनिराळी असते व त्यांचे व्यवसाय निरनिराळे असतात; म्हणून एकच नियम अथवा एकच व्यवस्था सांगतां येणार नाहीं. तथापि, जी व्यवस्था करावयाची, तिच्यापासून आरोग्यवृद्धि व सोय होऊन मुलांनां शिक्षणहि मिळण्याचा मार्ग असला पाहिजे. तुह्मांला आतां घर पहायचंच आहे, तेव्हां तें पाहतां पाहतां तुमच्या नजरेस कांहीं गोष्टी येतीलच."

यशोदाबाई म्हणाल्या "आपल्या घरांत दाखविण्यासारखं काय आहे?"

यावर बाळ्या ह्मणाला "आई! माझी खोली पाहण्यासारखी नाहीं का? तींतील तसबिरा, लहान यंत्रें, लहान हत्यारें, निरनिराळ्या पदार्थांचा संग्रह, पुस्तकें व पुस्त्या, हीं सर्व पाहण्यासारखीं नाहींत का? मी आपल्या खोलींतील सर्व वस्तु दाखवीन."

काशीनें सांगितलें "आमचं शिवणकाम, लोंकरीचं काम, चित्रं, लिहून ठेवलेले धडे, वगैरे आह्मी दाखवूं. रोज आम्ही काय करतों, याचं आह्मीं टिपण करून ठेविलं आहे, तेंहि दाखवूं."

आनंदीबाई ह्मणाल्या "यशोदाबाई, मुलांच्या ह्या जिनसा पाहण्यासारख्या असून शिवाय घरांतील दुसऱ्याहि कित्येक गोष्टी पाहण्यासारख्या आहेत. एखादं शहर पहायचं असल्यास तेथील फक्त चार भव्य व शोभायमान इमारती पाहून स्वस्थ न बसतां तेथील लोक कसे आहेत, त्यांची स्थिति कशी आहे, त्यांचे आचारविचार काय आहेत, शहरांत स्वच्छता कशी आहे, लोकांच्या सोयीसाठीं, आरोग्यासाठीं व शिक्षणासाठीं काय व्यवस्था केली आहे, त्या शहराची पूर्वींची स्थिति कशी होती व हल्लींची कशी आहे, तात्पर्य, लोकांची जी ऐपत आहे व त्यांच्याजवळ जीं साधनं आहेत त्यांचा त्यांनीं कसा उपयोग केला आहे हें सारं समजून घेतलं पाहिजे. हीच गोष्ट घरालाहि लागू आहे. घरांतील जिनसा मौल्यवान असतील अथवा शोभेच्या असतील तरच, त्या पाहण्यास योग्य आहेत, हा समज चुकीचा आहे. ज्या जिनसांपासून अथवा व्यवस्थेपासून सुख होतं, बुद्धीचा विकास होतो आणि मनास बोध होतो त्यांची मातबरी फार आहे; मग त्या जिनसा फार किंमतीच्या असोत अथवा साधारण किंमतीच्या असोत. घर पहायचं, ह्मणजे घरांतील निर्जीव वस्तु

मात्र पहायच्या असं नाहीं; तर त्या घरांतील लोकांनीं जिनसांची व्यवस्था कशी ठेविली आहे, त्यांचं स्वतःचं आचरण कसं आहे, व त्यांनीं आपल्या ऐपती-प्रमाणं आपल्या उद्योगानं आपल्या आरोग्यासाठीं, आपल्या सोयीसाठीं व आपल्या एकंदर सुधारणेसाठीं काय केलं आहे, हें पाहणं अवश्य आहे."

वर सांगितल्याप्रमाणें भाषण झाल्यावर आनंदीबाई परसांत गेल्या. त्यावेळेस घराच्या संबंधानें जी व्यवस्था केली होती ती त्यांनीं रमाबाईस दाखविल्यावर त्या ह्मणाल्या "घराच्या बाबतींत पहिली गोष्ट लक्ष्यांत ठेवावयाची, ती ही कीं, तें होतां होईल तितकं करून घाणेरड्या ठिकाणीं अथवा दाट वस्तींत असूं नये. घर नदीच्या कांठीं अथवा तलावाजवळ मुळींच असूं नये. त्याचप्रमाणं तें दलदलीच्या ठिकाणीं अथवा खोल जागेंतहि असूं नये. तर होतां होईल तों तें उंच जागीं असावं. नदीच्या कांठाजवळ घरं बांधण्याचा प्रघात वाईट आहे. चांगलं ठिकाण मिळण्यासाठीं दोन पैसे जास्त पडले, तरी हरकत नाहीं. घराला चांगलं ठिकाण मिळण्यासाठीं थोडा पैसा खर्च करणं, हा अपव्यय होत नाहीं. एक वेळ घराला कमी शोभा असेल अथवा कमी सोई असतील तर चालेल; परंतु जर ठिकाण घाणेरडं असेल तर घरांतील स्वच्छतेच्यासंबंधानं कितीहि चांगली व्यवस्था ठेविली, तरी तिचा विशेष उपयोग होणार नाहीं. घरासभोंवतील दूषित हवेमुळं घरांतील हवा खराब होण्याची व आजार उत्पन्न होण्याची भीति ही राहीलच."

"दुसरीं लक्ष्यांत ठेवावयाची गोष्ट ही कीं, सर्व घर खुलास असावं. निजण्याच्या जागेच्या संबंधानं विचार करितां घरांतील प्रत्येक इसमास सुमारं ४८ औरस चौरस फूट जागा सांपडेल अशी व्यवस्था असावी. कोंडमाऱ्यानं शरीरास अपाय होतो. स्वयंपाकघर, गोठा, तबेला व पायखाना हीं तर विशेषेंकरून खुलास असलीं पाहिजेत. कारण, हीं जरी एकदा स्वच्छ केलीं, तरी त्यांतील हवा घाणीमुळं वारंवार दूषित होते. हीं खुलास असलीं, ह्मणजे त्यांतील हवा कोंडून न राहतां प्रसरण पावते व चांगली हवा आंत येते. वरील चार इमारतींल हवा दूषित होत असते, ह्मणून त्या बसण्याउठण्याच्या जागेपासून थोड्या लांब असल्या तर बरं. त्या लांब असल्या ह्मणजे धुरामुळं अथवा घाणीमुळं त्रास होणार नाहीं. घराच्या पुढच्या भागीं त्या असण्यापेक्षां पिछाडीस असल्या तर चांगलं, हें समजून त्याप्रमाणं व्यवस्था केली आहे.

ह्या सर्व गोष्टी दिसण्याला क्षुल्लक दिसतात; परंतु त्यांकडे दुर्लक्ष्य केल्यानं अखेरीस अहित होतं, हें लोकांच्या लक्ष्यांत येत नाहीं. कित्येक घरांत धुरापासून इतका त्रास होतो, कीं, त्या त्रासामुळं स्त्रियांस शीण येऊन जेवण कमी जातं, डोळे खराब होतात व केव्हां केव्हां मेंदु खराब होऊन डोकं दुखूं लागतं. पुष्कळ लोकांचा हा चमत्कार दृष्टीस पडतो, कीं, घराप्रीत्यर्थ त्यांचे शेंकडों रुपये खर्च होतात; परंत सर्व काटकसर मोऱ्या, गोठा, तबेला, पायखाने वगैरे बाबतींत असते, व या वेडेपणाच्या काटकसरीमुळं त्यांनां नेहमीं त्रास होत असतो, तरी त्याकडे त्यांचं लक्ष्यच जात नाहीं. मोऱ्या थोड्या रुंद व खोल करणं व त्यांतील सांडपाण्याचा निकाल करणं, त्याचप्रमाणं पायखाना विटामातीचा न करितां चोहोंकडून दगडांचा करून पाणी टाकून स्वच्छ करण्याची सोय करणं, तवेल्याची व गोठ्याची जमीन खराब न व्हावी ह्मणून तींत मुरूम टाकून धुमसून सकत करणं व ती स्वच्छ करण्यासाठीं सोय करणं, ह्या व अशाच प्रकारच्या दुसऱ्या गोष्टी करण्यास दोनचार हजार रुपये लागतात असं नाहीं. लोकांच्या ह्या घाणेरड्या संवयीची व वेडेपणाच्या काटकसरीची मौज वाटते. दिव्याची घाण फार वाईट असते, हें प्रत्येकाला माहीत आहे. दिव्याच्या तेलांतील अंगार वायु (कारबान) व हवेंतील प्राणवायु (आक्सिजन) हें दिव्याचं जीवन होय; परंतु या दोहोंच्या संयोगापासून अंगाराम्ल (करबानिक आसिड) उत्पन्न होतो, तो फार अपायकारक असतो. त्याची घाण फार असते, ह्मणून तिचा प्रसार न होतां ती वरचेवर परभारं जाईल अशी तजवीज करणं अगत्याचं आहे. परंतु याकडे थोडेच लोक लक्ष्य पुरवितात. कोनाड्यांतील दिवली जाऊन तिच्या ऐवजीं कंदील उंच टांगून ठेवण्याची अथवा समई जाऊन तिच्या ऐवजीं लामणदिवा किंवा दुसरा दिवा उंच टांगून ठेवण्याची तजवीज होत नाहीं. त्याचप्रमाणं पायखान्यांतील पल्हाटीच्या अथवा तुऱ्हाटीच्या पाट्यांस रजा देऊन त्यांऐवजीं लोखंडाच्या दोणी (पाट्या) केल्या असतां व शौचकूपांत शेगडींत राख ठेवून ती राख अथवा कोरडी माती थोडथोडी प्रत्येकानं टाकित गेलं असतां घाण कमी होईल. ज्याप्रमाणं वस्त्र पाण्याचं शोषण करितं, त्याप्रमाणं कोरडी माती घाणीचं शोषण करिते. बहुत करून कुठंहि मातीचं दुर्भिक्ष नसतं, ह्मणून या कामीं मातीचा उपयोग करण्यास हरकत असूं नये. या गोष्टी पुष्कळ लोकांनां सहज करतां येण्यासारख्या आहेत

यांनां फार खर्च लागतो असंहि नाहीं; परंतु त्या करणं लोकांच्या अगदीं जीवावर येतं किंवा त्यांनां कंटाळा येतो. अशा प्रकारच्या गोष्टी करण्यानं घाण कमी होऊन सहजगत्या शिक्षण देण्यास साधन होतं. असो. ही घाण सोडून आपण आतां बागेंत जाऊं."

असें ह्मणून आनंदीबाई बागेंत गेल्या व तेथें त्यांनीं सर्व झाडें, वनस्पति वगैरे दाखविल्या. बागेंतील ती एकंदर व्यवस्था पाहून रमाबाईस व त्यांच्या मुलींस नवल वाटलें. त्या ह्मणाल्या "एकूण, तुह्मांला भाजीपाला विकत घ्यावा लागत नसेल, किंवा फुलं वगैरे विकत घ्यावीं लागत नसतील अन् यामुळं तुमचे बरेच पैसे वांचत असतील."

हें ऐकून आनंदीबाईनीं उत्तर केलें "भाजी व फुलंच काय, परंतु या लहानशा वाडग्यांत जीं फळझाडं अथवा औषधिवनस्पति होण्यासारख्या आहेत त्या तुमच्या दृष्टीस पडतील. या वाडग्यांतील प्रत्येक झाड अथवा वनस्पति उपयोगाची आहे. दुतर्फा ठेविलेल्या कुंड्यांतील व पायरस्त्याच्या बाजूंवरील झाडं मात्र शोभेकरितां लाविलीं आहेत. परंतु चित्रकला शिकवितांना त्यांचाहि उपयोग होतो. बागेंतील झाडं केवळ उत्पन्नाकरितां लावलीं आहेत असं नाहीं; तर आपल्या श्रमानं जिनसा तयार करण्याचं ज्ञान, व रोपं लहानाचीं मोठीं करण्याचं शहाणपण येऊन वनस्पतिशास्त्राचीं मूलतत्वं समजून सांगण्यास साधन असतं. रोपांचं संगोपन करण्यानं टापटिपीचं वळण लागतं व वेळच्या वेळीं काम न केलं तर काय तोटा होतो हें समजून येतं. दुसरं असं, कीं, मुलांनां व बायकांनां एका प्रकारची करमणूक होऊन त्यांच्या मागं एक उद्योग असतो. झाडांच्या योगानं हवा थंड व शुद्ध होते; परंतु हे सर्व फायदे होण्याला अंग मोडून थोडी मेहनत केली पाहिजे, झाडाखालचा केरकचरा काढून टाकिला पाहिजे, व त्यांनां वेळचे वेळेवर बेताचं पाणी घातलं पाहिजे. झाडांपासून पुष्कळ फायदे होतात, ही गोष्ट लक्ष्यांत आणून मुलांकडून बागेची मुद्दाम व्यवस्था केली आहे. तुमच्या घरीं सोय असल्यास तुह्मींहि त्याप्रमाणं करावं, अशी माझी इच्छा आहे. परंतु बागेंत वाटेल तीं झाडं लावणं मात्र बरोबर नाहीं. ज्याप्रमाणं दुसऱ्या प्रत्येक गोष्टींत निवड करणं जरूर आहे, त्याप्रमाणंच झाडांच्या संबंधानंहि निवड करणं अवश्य आहे. कारण, आपणांजवळ जागा थोडी असते, पैसे बेतावाताचे असतात व उपयोग तर चांगला करून घ्यावयाचा असतो.

या बागेंत झाडं वनस्पति वगैरे कोणतीं आहेत व त्यांचा उपयोग काय आहे हें सर्व टिपून ठेविलं आहे, व तें मुलांनां माहीत आहे."

रमाबाईच्या मुलींस हें खरें न वाटून त्यांनीं काशीस ही माहिती ह्मणून दाखविण्यास सांगितलें. तेव्हां काशी आनंदीबाईस ह्मणाली "मावशीबाई, यांनां प्रत्येक झाडाची सर्व माहिती सांगूं, कीं, कांहीं थोड्या झाडाची माहिती सांगूं?"

आनंदीबाईनीं सांगितलें "तूं येथील सर्व झाडांची माहिती सांगूं लागलीस तर यांनां कंटाळा येईल. कारण, याबद्दलची माहिती पुस्तकांत आहे. लोक निरानिराळ्या झाडांचा काय उपयोग करितात हें सध्या आपणांस नको आहे. तुह्मीं त्यांचा काय उपयोग केला आहे व पुढं तुह्मांला काय उपयोग करितां येण्यासारखा आहे, हें थोड्या झाडांच्या संबंधानं सांग, ह्मणजे झालं."

आनंदीबाईनीं सांगितल्याप्रमाणें काशीनें ती माहिती सांगितली. ती ह्मणाली "आंब्याच्या पानांच्या आह्मीं पत्रावळी करून ठेविल्या आहेत. पिकल्या आंब्याच्या रसाची साटी घातली आहे. हिरव्या आंब्याचा मुरंबा व लोणचं केलं आहे. हिरवे आंबे वाळवून त्यांची आंबोशी करून ठेविली आहे. चिंचेच्या ऐवजीं भाज्या वगैरे पदार्थांत तिचा उपयोग करितां येतो. आंब्याची कढी चांगली होते. बाळ्याला पांचसहा दिवसांपूर्वी आमांश झाला होता, त्या वेळेस तुह्मीं आंब्याची कोय दह्यांत वांटून दिली. आंब्याची छाया दाट असते, ह्मणून तेथें उन्हाळ्यांत सकाळीं केव्हां केव्हां आह्मी अभ्यास करित बसतों.

"आवळ्याचं लोणचं चांगलं रुचकर होतं. त्याचा मोरंवा पित्तावर चांगला, ह्मणून तो तयार करून ठेविला आहे. लहान लहान आवळ्यांची आवळकटी औषधासाठीं करून ठेविली आहे.

"पिकलेल्या कंवठाचा गीर काढून त्यांत गूळ किंवा साखर घालून तो आह्मी केव्हां केव्हां खातों. हा पित्तावर चांगला. बाळ्याला तो फार आवडतो. आह्मी कंवठाची चटणी करितों किंवा रायतं करितों. तें खाण्याला फार रुचकर लागतं. थोड्या दिवसांपूर्वी ग्यानूच्या सर्व अंगावर पित्त उठलं होतं, तेव्हां तुमच्या सांगण्यावरून त्यानं कंवठीचा पाला वांटून लाविला, त्या वेळेस त्याला गुण आला.

"केळीसारखीं उपयुक्त दुसरीं झाडं क्वचित् दृष्टीस पडतात. आह्मी हिरव्या केळ्यांची भाजी करितों. त्याचप्रमाणं केळफुलांची व कालाची भाजी करितां.

फुलं गुंफावयास व पुडा बांधावयास सोपटं उपयोगीं पडतात. पानं जेवणाच्या उपयोगीं पडतात. जखम झाली असतां केळीचा चीक उपयोगीं आहे. पोटांत विष गेलं असतां कालाचा रस काढून घ्यावा, ह्मणजे विष उतरतं. मात्र वैद्य मिळण्यासारखा नसेल किंवा चांगलं औषध संग्रहीं नसेल, तरच हा उपाय करावा. ”

काशी नारिंगाविषयीं पुढें सांगणार, तों आनंदीबाई ह्मणाल्या “ काशी, पुरे कर. तुझ्या मैत्रिणींस कदाचित् कंटाळा येईल. ”

हें ऐकून रमाबाईची मुलगी द्वारका ह्मणाली “ आम्हांला खरोखरच कंटाळ येत चालला होता. आम्हांला ह्यांत विशेष कांहींच वाटलं नाहीं. पुस्तकांतून ह्याहिपेक्षां पुष्कळ माहिती असते. ”

यावर आनंदीबाई ह्मणाल्या “ होय, पुस्तकांत याविषयींचशी काय, परंतु दुसऱ्या शेंकडों गोष्टींविषयीं माहिती दिलेली असते; परंतु ह्या माहितीचा उपयोग कसा करावा, हें जर चांगलं समजलं नाहीं, तर काय उपयोग आहे ? ह्यातून जितकी क्रिया होऊन जाईल तितकं चांगलं. जीं साधनं आपणापाशीं आहेत त्यांचा उपयोग कसा करावा, हें जर आपणास माहीत नाहीं, तर तीं असून नसून सारखींच आहेत. ज्या गोष्टी आवश्यक असून मुलांनां करितां येण्यासारख्या आहेत, त्यांसाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे पहात बसण्यास त्यांनां लावणं शहाणपणाचं नाहीं. ज्या गोष्टी त्यांनां करितां येण्यासारख्या असून त्या करण्यास सोय आहे, त्यांचीच प्रथम त्यांनां माहिती देऊन त्यांच्याकडून त्या करवाव्या, ह्मणजे त्यांनां भरंवसा वाटून दुसऱ्या गोष्टी करण्यास उमेद येते. नुसतं पुस्तकांत पुष्कळ आहे, एवढंच समजून अथवा पुष्कळ पाठांतर करवून उपयोग नाहीं. जीं साधनं आहेत त्यांतून निवड करून त्या साधनांचा उपयोग करण्याचं शहाणपण आलं पाहिजे. पदार्थांविषयीं आतां काशीनं जी माहिती सांगितली, ती दिसण्याला थोडी दिसते; परंतु ते पदार्थ तयार करतांना दुसऱ्या पुष्कळ गोष्टींची माहिती होत असते, ही गोष्ट तुझ्या लक्ष्यांत आली नाहीं. बागेंतील फळझाडं, फुलझाडं, भाजीपाला व दुसऱ्या वनस्पति ह्या केवळ उत्पन्नासाठीं लाविल्या नाहींत; ह्या केवळ शोभेसाठीं नाहींत; ह्या केवळ हवेसाठीं अथवा करमणुकीसाठीं नाहींत; तर हे सर्व फायदे होऊन शिक्षण देण्यासहि साधन असावं, ह्मणून हीं झाडं लाविलीं आहेत. वन-

रसायनशास्त्र व कृषिकर्म, हीं उपयुक्त शास्त्रं होत. या शास्त्रांचीं कांहीं मूलतत्त्वं लहानपणीं शिकविण्यास बाग हें चांगलं साधन आहे. लहान गर्भापासून मोठा मनुष्य होईपर्यंत कोणत्या गोष्टी कराव्या लागतात, हें समजणं जितकं महत्त्वाचं आहे, तितकंच बीं पेरल्यापासून मोठा वृक्ष होईपर्यंत काय केलं पाहिजे, रोपांची कोणकोणतीं रूपांतरं होतात, वगैरे गोष्टी समजणं फार महत्त्वाचं आहे. ज्याप्रमाणं मनुष्यं नाकाच्या द्वारं श्वासोच्छ्वास करितात, त्याप्रमाणं झाडं पानाच्या द्वारं श्वासोच्छ्वास करितात. हवेंतील अंगाराम्ल वायूचं पृथक्करण करून मनुष्यास उपयुक्त जो प्राणवायु तो तीं सोडून देतात, व आपण अंगारवायु ग्रहण करितात. मनुष्य जें अन्न तोंडाच्या द्वारं ग्रहण करितं, त्याचं विक्लेदन पाण्यानं होऊन व त्यावर हवेचा व्यापार होऊन त्याचं रक्त बनतं, व तें सर्व शरीरांत खेळतं. त्याप्रमाणंच झाडांना पाणी घातलं ह्मणजे त्यांच्या मुळ्यांच्या आसपास जीं खनिज द्रव्यं असतात, त्यांचं विक्लेदन पाण्यानं होतं व झाडांचं जीवन मुळ्यांवाटं त्यांनां मिळतं. त्यावर हवेचा व्यापार होऊन रस उत्पन्न होतो. हा रस झाडांचं जीवन होय. हा रस ज्याप्रमाणं असतो त्याप्रमाणं झाडं जोरदार किंवा खुरटीं होतात. झाडं व मनुष्यं ह्यांचा परस्परांस फार उपयोग आहे, ह्मणून झाडांचं संगोपन करणं हें केवळ मौजेसाठीं नाहीं, तर तें मनुष्याचं संगोपन करण्यासारखं आहे व तो एक शिक्षणाचा भाग आहे. ”

रमाबाई व त्यांच्या मुली ह्यांनीं नवलकोल, टोमाटो, करमगड्डा वगैरे भाजीपाला, कुंड्यांतून ठेविलेलीं झाडें, जाई, जुई, मोगरा, शेवती, बकूळ, पारिजातक वगैरे फुलझाडें, आम्र, नारिंगें, लिंबें, वगैरे फळझाडें हीं पाहिल्यावर त्यांची नजर कपाशीच्या झाडांकडे गेली. तीं झाडें पाहून रमाबाई ह्मणाल्या “ तुह्मीं हीं झाडं कशाकारितां लाविलीं आहेत ? यांपासून शोभा तर कांहींच नाहीं. आणि यापासून कापूस तरी किती निघणार !”

आनंदीबाई ह्मणाल्या “ माझ्या हिशेबानं कपाशीचं झाड तर बागेंतील इतर सर्व झाडांपेक्षां फार उपयुक्त आहे. आजकाल कपाशीचं महत्त्व किती आहे ? अलीकडे शेतकरी कपाशी फार पेरूं लागले आहेत ह्मणून धान्य फार महाग झालं आहे; कपाशीवर त्यांनां दोन पैसे मिळतात, परंतु हे पैसे ते उडवून टाकतात व अन्नास महाग होतात, असा कांहीं लोकांचा समज आहे.

कांहीं लोकांचं ह्मणणं असं आहे, कीं, धान्यास भाव येणं, हें तर शेतकऱ्यांनां चांगलं; मग कपाशी जास्त पेरिली ह्मणून काय झालं? प्रस्तुत कपाशीच्या-संबंधाचा प्रश्न फार महत्त्वाचा आहे. मँचेस्टर येथील व्यापारी कपाशीच्या व्यापारावर किती सधन झाले आहेत! त्यांनां कॉटनलार्ड ह्मणजे कपाशीचे स्वामी ; हें नांव प्राप्त झालं आहे. कपाशीच्या मालावरील जकात उठवावी ह्मणून त्यांनीं दीर्घ प्रयत्न केला व ही उठवूं नये ह्मणून आह्मींहि यत्न केला; परंतु आमचा प्रयत्न निर्फल झाला, हें ध्यानांत येतं. इथं जीं कपाशीचीं झाडं लाविलीं आहेत, तीं बोटवाती अथवा फुलवाती करण्यासाठीं कापूस मिळावा, ह्मणून लाविलीं नाहींत. अथवा मुलांनां हगवण झाली असतां कपाशीचीं बोंडं उपयोगीं पडतील ह्मणूनहि हीं झाडं लाविलीं नाहींत. हीं लावण्यांत माझा हेतु निराळा आहे. जगाच्या पाठीवर कपाशी मुख्यत्वें तीन ठिकाणीं फार होते. अमेरिका खंडांत युनाटटेडस्टेट्स देशामधें,आफ्रिका खंडांत मिसर देशामधें आणि आशिया खंडांत हिंदुस्थान देशामधें. परंतु कुठंहि आमच्या कापसाची फारशी मातबरी समजत नाहींत. आमच्या कापसाचीं उत्तम वस्त्रं होत नाहींत. कारण, यंत्रानं ह्या कापसाचं बारीक सूत निघत नाहीं, असा बोभाटा आहे. आमचा कापूस साधारणं वस्त्रं करण्यास किंवा चांगल्या कापसांत मिसळून मग त्याचीं वस्त्रं करण्यास उपयोगीं पडत आहे, व हीं वस्त्रं इकडे येत आहेत. या स्थिती-मुळं दरसाल लक्षावधि रुपयांचं नुकसान होत आहे. याविषयीं वेळेवर विचार केला नाहीं, तर पुढंहि नेहमीं नुकसान होण्याची भीति आहे. जाडींभरडीं वस्त्रं वापरून निर्वाह करित जा, असं नुसतं सांगून उपयोग नाहीं. असा प्रयत्न अनेक वेळां ठिकठिकाणीं केला होता, परंतु तो निर्फळ झाला. आतां चांगला कापूस तयार करून उत्तम वस्त्रं तयार करण्याची उमेद बाळगिली पाहिजे. चांगला कापूस तयार करण्यासाठीं अनेक ठिकाणीं अनेक वेळां प्रतीति केली पाहिजे. ज्यांनां सोय आहे त्यांनीं प्रतीति करण्याच्या हेतूनं आपल्या घरीं कपाशीचीं झाडं लाविलीं पाहिजेत, व कापसाचे निरनिराळे नमुने जमवून कसकसं सूत निघतं हें पाहिलं पाहिजे. या कामांत एकदोन वर्षं यश येणार नाहीं; कदाचित् दहापांच वर्षांतहि येणार नाहीं; परंतु दहावीस वर्षं ठिकठिकाणीं असा यत्न केला असतां यश यावयाचं नाहीं, असं नाहीं. प्रतीति करण्यास फार खर्च लागेल असंहि कांहीं नाहीं. या गोष्टीचा छंद मुलांनां लावला पाहिजे. हें समजून हीं कपाशीचीं झाडं लाविलीं आहेत.

"दुसरं असं, कीं, कपाशीचं झाड हें आमच्या मूर्खपणाचं स्मारक म्हणून लाविलं आहे. आम्ही पूर्वी शहाणे होतों, परंतु आतां मूर्ख बनलों आहों, ह्याची आठवण नित्य असावी म्हणून हीं झाडं लाविलीं आहेत. आमचा देश सुधारलेला, आम्ही सुधारलेले व आमची सुधारणा प्राचीन, अशी वढाई मारण्यास आम्ही तयार असतों! आम्हांला कोणीं आळशी म्हटलं असतां, अथवा उत्साहहीन म्हटलं असतां, अथवा दुर्बल म्हटलं असतां त्यावर तुटून पडण्यास आम्ही तयार असतों! परंतु स्वपराक्रमावलंबन हा गुण आम्हांत नसावा, आमची लज्जा राखण्याचं ज्ञान आम्हांला असूं नये, अन्न आणि वस्त्र ह्या दोन आवश्यक गोष्टींपैकीं वस्त्रांसाठीं आम्हांला लोकांच्या तोंडाकडे पाहण्याचा प्रसंग यावा, व हें वस्त्र तयार करण्याचं सामर्थ्य आम्हांला अद्याप येऊं नये, यापेक्षां मूर्खपणा तो कोणता? आपले वाडवडील स्वपराक्रमानं आपलीच्यशी काय, परंतु दुसऱ्या देशांतील लोकांचीहि लाज राखीत. तेव्हां या दृष्टीनं ते शहाणे होते, हें म्हणणं बरोबर आहे. आम्हांला आमची स्वतःची लाज राखतां येत नाहीं, तर आम्ही दुसऱ्याची काय राखणार? लोकांनां बारीक सुताचं वस्त्र नेसण्याची हौस वाटावी; परंतु तीं तयार करण्यासाठीं हिंमत बाळगून व ईर्षा धरून नेटानं व एकोप्यानं अश्रांत श्रम करण्याची गोडी त्यांनीं मुलांमधें उत्पन्न करूं नये, किंवा त्यांनां हौस वाटूं नये, त्यांनीं केवळ वडिलांची कीर्ति सांगत बसण्यांत पुरुषार्थ मानावा, हा मूर्खपणा नाहीं, तर दुसरा मूर्खपणा कोणता? शेतकरी आपापल्या समजुतीप्रमाणं कसा तरी कापूस तयार करित आहेत; त्यांसाठीं ओबडधोबड कापड कसं तरी तयार होत आहे; हें कापड ते वापरित आहेत; त्यापासून त्यांनां कमीपणा वाटत नाहीं, म्हणून देशांत धनसंचय होत आहे; परंतु हौशी लोकांस उत्तम कापूस तयार करण्याचं ज्ञान नाहीं, तो तयार करून बारीक सूत काढण्याचं सामर्थ्य नाहीं, तथापि ओबडधोबड वस्त्रं नेसण्याविषयीं व पांघरण्याविषयीं कमीपणा वाटतो आणि सुंदर वस्त्रं नेसण्याची प्रतिष्ठा वाटून ते तीं वस्त्रं वापरतात व पैसे घालवून देशाचा तोटा करितात! तेव्हां अडाणी लोकांचं वर्तन शहाणपणाचं किंवा हौशी लोकांचं वर्तन शहाणपणाचं? आपल्या देशांत मजुरी स्वस्त आहे व कच्चा माल उत्पन्न होत आहे; परंतु तोच माल बाहेर जाऊन यंत्रादि साधनांनीं निराळ्या रूपानं इथं परत येत आहे व दरसाल लक्षावधि रुपयांचं नुकसान होत आहे. तेव्हां हौशी लोकांचीही हौस मुलांनां भिकेस लावणार नाहीं काय?

हे लोक मुलांनां भीक मागण्याचं शिक्षण देत नाहींत काय ? तुह्मी कच्चा माल आह्मांला पुरवित जा अन् आह्मी तुह्मांला त्याच मालाच्या जिनसा देत जाऊं असं ह्मणणं, ह्मणजे कांहीं अंशीं, आह्मी खोबरं घेत जाऊं व तुह्मांला करवंटी देत जाऊं, असं ह्मणण्यासारखंच आहे ! हें ह्मणणं, ह्मणजे कमी फायद्याचीं कामं तुह्मी करित जा अन् व जास्त फायद्याचीं कामं आह्मी करित जाऊं, असं ह्मणण्यासारखं आहे. हा पायावर धोंडा पाडून घेण्याचा व्यवहार आहे. ज्यांनां हा हितकर श्रमविभाग वाटत असेल त्यांनां तो वाटो. ज्यांनां हें व्यापारस्वातंत्र्याचं खरं तत्त्व वाटत असेल त्यांनां तें खुशाल वाटो. देशांत कच्चा माल तयार करण्याचीं साधनं असतां व मजुरीचा दर स्वस्त असतां दुसऱ्यालां तो कृतीनं तयार करावयास लावून तो आपण वापरणं, हा हितकर श्रमविभाग नाहीं. देशांतील कारखाने बाल्यावस्थेंत असतां व्यापारस्वातंत्र्याचं तत्त्व लागू करणं श्रेयस्कर नाहीं. लहानपणीं मुलांविषयीं काळजी न घेतां आणि त्यांचं संगोपन न करितां त्यांनां स्वातंत्र्याचं तत्त्व लागू करणं चांगलं नाहीं; कारण, त्यांच्या अंगीं सामर्थ्य नसल्यामुळं त्यांनां टिकाव धरितां येत नाहीं. त्यांनां स्वातंत्र्यापासून लाभ न होतां त्यांची हानि मात्र होण्याची भीति असते. हीच गोष्ट बाल्यावस्थेंत असणाऱ्या व्यापारास अथवा कारखान्यांस लागू आहे. व्यापारस्वातंत्र्यामुळं स्पर्धा उत्पन्न होते व फायदा होतो हें खरं आहे; परंतु ज्यांमधें स्पर्धा उत्पन्न करावयाची, त्यांची बरोबरी असली पाहिजे. ज्या बाबतींत स्पर्धा करावयाची त्यांत आह्मी मागासलेले व तुह्मी पुढं सरसावलेले; तुह्मी घोड्यावर, आह्मी पायीं; तुह्मी यंत्रादि साधनांनीं सशस्त्र, आणि आह्मी अगदीं हतवीर्य व निःशस्त्र; अशी स्थिति असतां तुमची आमची बरोबरी कशी होईल ? आह्मी बरोबरी करावयास लागलों असतां आमचा मात्र तोटा होईल व तुमचा फायदा होईल. तुमची बरोबरी करावयास जीं साधनं आह्मांपाशीं पाहिजेत तीं सध्या आमच्यापाशीं नाहींत. तेव्हां अशा स्थितींत व्यापारस्वातंत्र्याचं तत्त्व लागू करणं हें आह्मांला हितावह नाहीं. कापडाच्या संबंधानं आह्मांला सोय आहे, लोखंडाच्या संबंधानं तुह्मांला सोय आहे; ह्मणून कापसाचा माल आह्मीं तयार करून तुह्मांला पुरवितों, लोखंडाचा माल तुह्मी देत जा. तुह्मी कोळसा द्या, आह्मी गहूं व तांदूळ देतों. तुह्मी कागद द्या, आह्मी नीळ देतों. तुह्मी स्टेशनरीचें सामान द्या, आह्मी वनस्पतींचीं औषधें देतों. तात्पर्य, ज्या जिनसांची सोय आमच्यापाशीं आहे त्या आह्मी देतों;

ज्यांची सोय तुह्मांला आहे त्या तुह्मी द्या. अशा समजुतीवर तुह्मी आह्मी व्यवहार करूं, व अशा समजुतीवरच परस्परांस मदत करूं. असं होत नसेल, तर व्यापार-स्वातंत्र्याच्या तत्त्वाप्रमाणं चालण्याची आमची इच्छा नाहीं. ह्याबद्दल अर्थ-शास्त्रकार आह्मांला मूर्ख समजोत, मुत्सद्दी आह्मांला वेडे ह्मणोत, व व्यापारी नांवं ठेवोत, त्यांकडे लक्ष्य देण्यांत फायदा नाहीं. साधनं असतां जोंपावेतों देशांतील लोक कच्चा माल परदेशास पाठवून कृतीनं तयार केलेला माल घेत आहेत, व कारखान्यांचा फैलाव न करितां शेतीकडेच जास्त लक्ष्य देत आहेत, तोंपावेतों त्या देशाची उन्नति कधींहि व्हावयाची नाहीं. या सर्व गोष्टी लक्ष्यांत ठेवून त्या धोरणानं बोध करणं हें अगत्याचं आहे. अशा प्रकारं बोध करणं, हें व्यापारीशिक्षणाचा ओनामा शिकविणं आहे. हा ओनामा मुलांकडून घट्ट करून घेतला पाहिजे. हें बाळकडू प्रत्येक आईनं आपल्या मुलांनां पाजिलं पाहिजे. या तत्त्वाचा बोध मुलांनां करून त्यांच्या मनास व त्यांच्या उद्योगास वळण देणं हें पालकांचं कर्तव्य आहे. ही गोष्ट लक्ष्यांत ठेवून अमेरिकन लोकांनीं सांप्रत व्यापारस्वातंत्र्याचं तत्त्व एकीकडे ठेविलं आहे व त्यांची भरभराट होत आहे. फ्रेंच लोकांनां या तत्त्वाचं महत्त्व सध्या वाटत नाहीं. जर्मन लोकांसहि या तत्त्वाचा मोह तूर्त वाटत नाहीं. इंग्लंड देश सुधारलेला, तेथील लोक संपन्न व सामर्थ्यवान्, तेथील कारखाने चांगल्या स्थितींत आहेत; असं असतां तेथील लोकसुद्धां या तत्त्वाप्रमाणं सर्वांशीं चालत नाहींत! तेव्हां आपल्या या देशांतील लोकांनीं या मोहक तत्त्वास भुलून वागणं हितावह नाहीं. कांहीं दिवस संगोपन याच तत्त्वाचं अवलंबन केलं पाहिजे. इंग्लंड, फ्रान्स, युनायटेडस्टेट्स व जर्मनी यांचा उद्योग आगगाडीच्या वेगानं चालला आहे. त्यांच्या उद्योग-प्रवाहाचे फांटे चोहोंकडे पसरत चालले आहेत. आपली तर बैलगाडी अद्याप सुटली नाहीं. बैलगाडीची गति फारच मंद असते. असल्या गतीनं मोठी मजल होत नाहीं. मोठी मजल केल्याशिवाय तर सोय नाहीं. अशी सांप्रतची स्थिति आहे. ही स्थिति लक्ष्यांत आणून मुलांनां त्याप्रमाणं शिक्षण दिलं पाहिजे. त्यांच्यामधें जागृति उत्पन्न केली पाहिजे. त्यांनीं कपाशीचीं झाडं लाविलीं पाहिजेत; त्यांच्या डोळ्यांपुढं कपाशीचे निरनिराळे मासले ठेविले पाहिजेत; त्यांच्याकडून यंत्रानं सरक्या काढून सूत काढविलं पाहिजे; यंत्रानं त्याच्या गुंड्या तयार करविल्या पाहिजेत. हीं यंत्रं व यासंबंधीं लहान पुस्तकं हा त्यांचा खेळ,

हीं त्यांची करमणूक व हा त्यांचा उद्योग असला पाहिजे. सध्या यांत्रिक शिक्षण देण्याचा क्रम चालू आहे; परंतु या शिक्षणावरच अवलंबून राहून उपयोगीं नाहीं. या शिक्षणास घरांत प्रारंभ झाला असतां इष्टहेतु लवकर सिद्धीस जाण्याचा संभव आहे. दुसऱ्या लोकांनीं आपणांस जागें करून आपणासाठीं सर्व तयारी करून ठेवण्यापेक्षां आपणच वेळेवर शुद्धीवर यावें आणि उद्योगास लागावें, हें शहाणपणाचें कृत्य आहे. दुसऱ्यांवर आतां वस्त्रांकरितां व आपली लाज राखण्याकरितां भार घालणें, हा शहाणपणा नाहीं. युनायटेडस्टेट्स देशांतील लोक जागे होऊन उद्योगास लागले आहेत. ते अमेरिका खंडास कापसाचीं वस्त्रें पुरवितील. मिसरदेशीय लोकहि जागे होऊं लागले आहेत. तथापि आफ्रिका व युरोप खंडांस कोणीं वस्त्रं पुरवावयाचीं, हें इंग्लिश, फ्रेंच, जर्मन व इटालिअन लोक आपसांत ठरवोत किंवा वाटेल तो घोटाळा घालोत. या तिन्ही खंडांशीं सध्या आपणांस कांहीं एक करावयाचें नाहीं. एकाहून एक समर्थ, महासमर्थ, अशा ह्या लोकांच्या खटपटींत या देशांतील गरीब लोकांनीं पडण्यांत हित नाहीं. आशिया खंड विस्तृत आहे व यांतील लोकसंख्या पुष्कळ आहे. हिंदुस्थानचे लोक आतां पाश्चात्य विद्येनें जागे होऊं लागले आहेत. तेव्हां आशिया खंडास वस्त्रं पुरविण्याची उमेद त्यांनीं पुन्हा बाळगावी हें चांगलें आहे. अशा प्रकारें वस्त्रें पुरविणें हा त्यांचा हक्क आहे. हा हक्क प्राचीन आणि वडिलोपार्जित आहे. हा हक्क अद्याप मुदतीबाहेर गेला नाहीं; परंतु सुस्तीनें मुदतीबाहेर जाण्याची भीति आहे. याबद्दल मुलें दोषी होणार नाहींत; कारण, आईबाप वेळेवर जागे न होतां मुदत घालवून बसूं लागले, तर मुलांनीं बिचाऱ्यांनीं काय करावें? याबद्दल प्रस्तुतचे आईबाप दोषी आहेत. आपल्या वाडवडिलांनीं आपल्या कर्तबगारीनें हा हक्क संपादन केला व तो अडीच तीन हजार वर्षेपर्यंत चालविला. आपण उद्योग न करितां स्वस्थ बसलों, तर आपल्या सुस्तीनें आपण हा हक्क घालविला असा आपणांवर दोष येईल. आपणांविषयीं जगाचें हंसूं झालेंच आहे व वेळेवर आपण जागे होऊन स्वतः उद्योग केला नाहीं, तर आपली गणना पढतमूर्खांमध्यें होईल. या गोष्टींचा वेळींच विचार करून उद्योगास लागावें हें चांगलें. उद्योगाचा सर्व भार पुरुषांवर टाकणें योग्य नाहीं. हा गाडा स्त्रिया अन् पुरुष या दोघांनीं मिळून लोटला पाहिजे. पुरुषांस पोटापाण्याची सोय पाहून व सार्वजनिक कामें करून सर्व भार उचलण्यास सवड

होणार नाहीं. त्यांनां बायकांनीं व मुलांनीं मदत केली पाहिजे. स्त्रियांचं मुख्य कर्तव्य गृहकृत्यांचीं व्यवस्था पाहाणं व गृहशिक्षण देणं हें होय. हें तर त्यांनीं केलंच पाहिजे. त्यांचा हात नाजुक असतो व त्यांनां सूत काढण्याची संवय असते; तेव्हां यंत्रादि साधनांची सिद्धता होईपर्यंत सूत काढण्याचं काम त्यांच्या-कडून चांगलं होईल; ह्मणून तें काम त्यांनीं करावं व पुढच्या कामाची व्यवस्था पुरुषांनीं पहावी. सध्या साधारण कापूस इकडे पिकत आहे. त्यांतील सरक्या यंत्रानं काढण्याची व त्याचं साधारण सूत यंत्रानं काढून त्याचीं ओबडधोबड वस्त्रं यंत्रानं तयार करण्याची व्यवस्था सध्या चालू आहे. हीं वस्त्रं लक्षावधि लोक वापरित आहेत. ही व्यवस्था सध्या ठीक आहे. हींत तूर्त बिलकूल ढवळाढवळ करावयाची नाहीं. हल्लीं जो उद्योग करावयाचा, तो चांगला कापूस पिकवून त्याचं चांगलं सूत काढून, त्याचीं चांगलीं वस्त्रं या देशांत तयार करविण्यापुरता आहे. ज्यांनां या उद्योगाचं महत्त्व वाटत आहे व ज्यांनां आपणांवर जबाबदारी आहे हें समजत आहे, त्या स्त्रियांनीं व पुरुषांनीं हें काम कांहीं दिवस हातीं घेतलें पाहिजे; ह्मणजे या उद्योगांत यश येण्याचा जास्त संभव आहे. या उद्योगास फारसा पैसा नको, मेहनत पाहिजे व ती शहाण-पणाची मेहनत पाहिजे. जरी थोडाबहुत पैसा लागला, तरी तो देण्यास स्त्रियांनीं तयार व्हावं, हें शहाणपणाचं कृत्य आहे. लग्नकार्य, डागडागिने, धर्मादाय वगैरे बाबतींत वेडगळ समजुती, व प्रपंचांतील उंधळेपणा, यामुळं शेंकडों स्त्रिया आपल्या नवऱ्यांकडून फाजील खर्च करवित आहेत व आपलं हंसूं करून घेत आहेत. जर त्या लग्नकार्यांत हौस कमी करतील, नटण्याचं सोडून देतील व काटकसरीनं खर्च करतील, तर त्यांनां पैशाची मदत करितां येईल. हें करणं त्यांनां अशक्य आहे असं नाहीं. कार्थेज व रोम यामधें पुष्कळ वर्षांपूर्वीं लढाई झाली. त्या वेळेस कार्थेज येथील स्त्रिया धनुष्याच्या दोरीकरितां आपले केस देण्यास तयार होऊन त्यांनीं स्वदेशाच्या रक्षणास साहाय्य केलें. फ्रेंच व जर्मन यांमधें लढाई झाली, त्यावेळेस जबर खंडणीची रक्कम देण्यासाठीं फ्रेंच स्त्रिया आपले अलंकार देण्यास तयार झाल्या. परवांच्या रूसो जपानी युद्धांतहि जपानी स्त्रियांनीं असंच करून आपल्या देशभक्तीची साक्ष पटविली. परंतु आमच्या स्त्रियांनीं कधींच पुढं येऊं नये काय? त्यांनीं आपली हौस अजून कमी करूं नये काय? शहाणपणानं खर्च करून त्यांनीं पैशाची मदत करूं नये काय?

जर ही मदत करण्यास आमच्या स्त्रिया तयार झाल्या, तर त्यांचा लौकिक होणार नाहीं काय ? मुलांनां निरंतरचं अन्नवस्त्र मिळावं ह्मणून आपल्याला प्रिय वाटणाऱ्या वस्तु दिखील सोडून देण्यास आमच्या स्त्रिया तयार झाल्या, अशी आमची कीर्ति होणार नाहीं काय ? आह्मीं मुलींस हा कित्ता घालून देऊं नये, तर दुसरा कोणता द्यावा? सांप्रतचा काल शांततेचा आहे. राज्यकर्ते सुधारलेले आहेत. लोक हळुहळू जागृत होऊं लागले आहेत. अशा वेळीं स्त्रियांनीं उत्साह दाखविला व मदत केली, तर हित होणार आहे. देशांत कारखाने वाढून धन-संचय होणं हें ज्याप्रमाणं लोकांनां इष्ट आहे, त्याप्रमाणंच तें सरकारासहि इष्ट आहे. तेव्हां याला सरकाराकडून हरकत येईल, हें मानणं बरोबर दिसत नाहीं. कारण, तसं असतं, तर मुंबई वगैरे ठिकाणच्या गिरण्या केव्हांच उधळून गेल्या असत्या. मतलबी या शब्दाचा जो वाईट अर्थ आहे, त्या अर्थानं सरकार मतलबी नाहीं. जे मतलबी आहेत, ते मुख्यत्वेंकरून परदेशस्थ व्यापारी होत. त्यांची कायती मुख्यत्वें आपणाविरूद्ध खटपट होणार; त्यांच्यापासूनच काय तो अडथळा येणार व त्यांच्यापासूनच काय ती भीति उत्पन्न होणार. कोणताहि उद्योग, कोणताहि प्रयत्न अथवा कोणतेंहि काम करावयास लागलं असतां, त्याबद्दल कुचेष्टा करणारे व हरकती आणणारे असावयाचेच ! प्रथम तिरस्कारबुद्धि, नंतर गैरसमज, नंतर तडजोड, ह्या गोष्टी मोठ्या कृत्याच्या संबंधानं घडून येतातच. त्याप्रमाणं हा सर्व प्रकार होईल हें खरं आहे; परंतु त्याकडे लक्ष्य द्यावयाचं नाहीं. प्रतीतीचा काल जाईपर्यंत सरकार उदासीन राहील, हें उघडच आहे. कारण, प्रतीति करण्यांत सरकारानं पैसे घालणं हें शहाणपणाचं आहे किंवा कसं, याबद्दल मतभेद आहे. हे सर्व विचार मनांत येऊन व राष्ट्रांतील स्त्रीपुरुषामध्यें व विशेषें-करून स्त्रियांमध्यें जागृति उत्पन्न झाल्याशिवाय राष्ट्राची उन्नति होणार नाहीं, हें जाणून या उद्योगास आरंभ केला पाहिजे. या यत्नांत यश आलं तर उत्तमच, नाहीं तरी स्वकर्म करण्यास चुकणं शहाणपणाचं काम नाहीं. ह्या सर्व गोष्टींचा विचार करून मीं माझ्या मुलीस शिक्षण देण्याचा क्रम आरंभिला होता; परंतु थोडेच दिवसांत पटकीचा उपद्रव होऊन मुलगी निवर्तली. ह्या दुःखाचा थोडा विसर पडल्यावर मुलास शिक्षण देण्याचं काम मीं आरंभिलं. त्याला साधारण हत्यारांची व यंत्रांची बरीच माहिती झाली होती; परंतु इंग्लंडांत काय आहे व अमेरिकेंत काय आहे, हें पाहण्याचं घरच्यांच्या मनांत आलं. मी मुलास घेऊन जावयास निघाल्यें, परंतु वाटेंत तुफान होऊन मजवर हा प्रसंग गुदरला. ”

आनंदीबाईंवर जो प्रसंग गुदरला होता, त्याची त्यांना आठवण होतांच आपल्या पतीची व पुत्राची काय स्थिति असेल, हे विचार मनांत उभे राहून त्यांच्या पोटांत कालवून आलें; त्यांच्यानें पुढें कांहींच बोलवेना. सर्व मंडळी स्तब्ध बसली. रमाबाई व त्यांच्या मुली चकित झाल्या व काशी व माई यशोदाबाईंच्या तोंडाकडे पाहूं लागल्या. आनंदीबाईंचे डोळे पाण्यानें भरून आलेले पाहून बाळ्या रडूं लागला. कांहीं वेळ कोणीं कांहींच बोललें नाहीं. आनंदीबाई शुद्धीवर आल्यावर त्यांची नजर बाळ्याकडे गेली. बाळ्याला रडतांना पाहून त्यांनीं आपलें दुःख आवरून धरिलें व शांतपणें ह्मटलें "मजवर प्रसंग गुदरल्यावर मी यशोदाबाईंच्या घरीं आल्यें. यशोदाबाईंनीं माझा चांगला समाचार घेतला. त्या वेळेस माझ्या उपयोगीं पडल्याबद्दल मी त्यांची ऋणी आहें. याप्रमाणं मी यशोदाबाईंच्या घरीं आल्यावर पुढं काय करावं, हा मला विचार पडला. जनापवादाला भिऊन कुठं तरी तोंड लपवून बसावं व व्यर्थ कालक्षेप करावा, किंवा दुःख आवरून धरून आपणास जें उचित दिसतं तें करावं, असा विचार उत्पन्न झाला. शेवटीं, लोकापवादास भिऊन व्यर्थ दिवस घालविण्यापेक्षां आपलं स्वकर्म करणं हेंच श्रेयस्कर आहे, असं वाटून त्याप्रमाणं ह्या मुलांच्या शिक्षणाचं काम मीं हातीं घेतलं व माझ्या मनांत जे विचार घोळत होते त्याप्रमाणं शिक्षण देण्यास सुरुवात केली. यशोदाबाईंची मला अनुकूलता असल्यामुळं व मुलांच्या अंगींहि ग्राहकशक्ति असल्यामुळं माझ्या प्रयत्नास थोडं यश येत चाललं आहे. बरं, हें असो. याच विषयावर आपण बराच वेळ बोलत आहों. आतां दुसऱ्या गोष्टी पाहूं."

असें ह्मणून आनंदीबाई घरांत गेल्या. तेथें पुरुषांकरितां व बायकांकरितां केलेल्या निरनिराळ्या न्हाण्या व मोऱ्या, अंग, तोंड व पाय पुसण्यासाठीं खुंट्यांवरून ठेवलेले निरनिराळे रुमाल, व स्नान झाल्यावर अंग गुंडाळून घेण्यासाठीं केलेले धावळीचे गरम कपडे, पिण्याचें पाणी ठेवण्याची जागा व भांडीं व तें गाळण्याचे रुमाल, भाजीपाला वाढण्यासाठीं केलेले चमचे, उन्हाळ्याकरितां दुपारीं बसावयाची जागा, धान्य वगैरे ठेवण्यासाठीं केलेले डवे, उजेड पडण्यासाठीं सोई वगैरे गोष्टी दाखवून त्या पुढें जावयास लागल्या तेव्हां रमाबाई ह्मणाल्या "तुमच्या घरीं मला रुमालच फार दिसतात. ही एकंदर व्यवस्था करण्याचा तुमचा हेतु काय, हें मला बरोबर समजलं नाहीं."

हें ऐकून आनंदीबाई ह्मणाल्या "यांत विशेष कांहीं नाहीं. मर्यादा राखण्यासाठीं निरनिराळ्या न्हाण्या व मोऱ्या केल्या आहेत. स्त्रियांस पुरुषांच्या न्हाणीकडे अथवा मोरीकडे जाण्याचं कारण पडूं नये, ह्मणून अशी व्यवस्था केली आहे. ही व्यवस्था नसली ह्मणजे उभयतांस संकोच उत्पन्न होतो. मर्यादा रक्षण करण्यासाठीं सोय करणं, ही महत्त्वाची गोष्ट आहे. हिच्याविषयीं यत्किंचित्‌हि दुर्लक्ष्य करणं योग्य नाहीं, असं मला वाटतं. स्वच्छता ठेवण्याच्या संबंधानं पुष्कळ स्त्रियांचा व यामुळं मुलांचा हलगरजीपणा दिसून येतो. मुलं वाटेल त्या कपड्यानं अंग अथवा तोंड पुसतात; कांहीं पदार्थ खाल्ला असतां तोंडावरून हात फिरवून तोच हात अंगाला, किंवा जें वस्त्र सांपडेल त्याला पुसतात; नाक शिंकरून शेंबूड कोपऱ्यांत अथवा भिंतीवर टाकितात, व हात अंगाला अथवा नेसावयाच्या वस्त्राला अथवा खांबाला पुसतात. ह्या घाणेरड्या संवयी आहेत. ह्यांपासून दुसऱ्यांस किळस येते. ह्मणून मीं मुलांस अशी ताकीद दिली आहे, कीं, स्नान केल्यावर अंग पुसण्याच्या रुमालानंच अंग पुसावं; कांहीं पदार्थ खाल्ला असतां हात धुऊन तोंड पुसावयाच्या रुमालानं तोंड व हात पुसावे; एरवीं तोंड, नाक अथवा घाम पुसण्याचं कारण पडलं असतां जवळ असलेल्या रुमालानें पुसावं. यामुळं अलीकडे त्यांनां स्वच्छतेचं पुष्कळ वळण लागलं आहे.

" स्नान करण्याचा हेतु पुष्कळांनां बरोबर माहीत नाहीं. स्नान केल्यानं अंग स्वच्छ होतं हें खरं आहे; परंतु त्यामुळं रक्तवाहिन्यांचा व्यापार जलद होऊन शरीरांत उष्णता उत्पन्न होते, व हुशारी वाटते. जें पाणी रंध्रांच्या वाटे शरीरांत जातं त्याचा व उष्णतेचा संयोग होऊन घाम उत्पन्न होतो. हा घाम जिरणं चांगलं नाहीं ह्मणून स्नान केल्याबरोबर अंग गरम कपड्यानं गुंडाळणं चांगलं. असं केल्यानं घाम चांगला येऊन शिरा मोकळ्या होतात, शरीर हलकं होतं व स्नान बाधत नाहीं. क्रिया व प्रतिक्रिया या व्यापारानं पूर्वस्थिति प्राप्त होते, हें सर्वांस माहीत आहे. स्नान करून घाम काढून टाकला असतां क्रिया व प्रतिक्रिया ह्या दोन्ही क्रिया होऊन शरीरास सुख होतं. हें समजून धाबळीचीं वस्त्रं ठेविलीं आहेत. हीं सोंवळ्याओंवळ्याचेहि उपयोगीं पडतात.

"स्नान करण्याचा आणखी दुसरा हेतु आहे तो, व स्नान केल्यावर पुढं काय केलं पाहिजे हें, पुष्कळांनां माहीत नाहीं. आपल्या शरीराच्या त्वचेला हजारों रंध्रं आहेत. तीं इतकीं लहान आहेत, कीं, एका रुपयाला जेवढी

जागा लागते, तेवढ्या जागेंत सुमारें २००० रंध्रें असतात. या रंध्रांच्या द्वारें शरीरांतील घाण बाहेर पडते. प्रत्येक दिवशीं सुमारं अर्धा तोळा विषकारक घाण बाहेर पडते. रंध्रं फारच लहान असल्यामुळं थोड्याशा बाहेरील घाणीनं तीं बुजतात व शरीरांतील घाणेरडा अंश बाहेर पडण्यास मार्ग सांपडत नाहीं. यामुळं केव्हां केव्हां खरूज होते, घाणेरडा अंश कपड्याला लागतो व त्रास होतो. यासाठीं हीं रंध्रं स्वच्छ व उघडीं ठेविलीं पाहिजे. दोन तांबे पाणी डोक्यावरून घेऊन हें कार्य होत नाहीं. वाईट पाण्यानं स्नान केल्यानं स्नानाचं कार्य होत नाहीं, इतकंच नाहीं, तर त्यापासून नारू हा रोग होण्याची भीति असते. स्नान केल्यावर स्वच्छ रुमालानं अंग पुसणं व गरम कपड्यानं गुंडाळणं अवश्य आहे. गरम कपड्यानं अंग न गुंडाळितां तें उघडं ठेविलं असतां थंड वाऱ्यामुळं ताप येण्याची भीति असते.

"पिण्याच्या पाण्याविषयीं जितकी काळजी घ्यावी तितकी आपणांपैकीं पुष्कळ जणं घेत नाहींत; यामुळं विकार उत्पन्न होतो. कमिटीनं पाणी आणून पुरवावं, ह्मणून कित्येक ठिकाणीं हजारों रुपये खर्च होतात; तें गाळण्याबद्दल शेंकडों रुपये खर्च होतात; परंतु त्याची पुढं चांगली व्यवस्था ठेवण्याविषयीं थोडकी तसदी घेण्यास लोक आळस करितात, हें आश्चर्य आहे. जेथून शहरांत पाणी आणावयाचं तेथून तें शहरांत येईपर्यंत ज्याप्रमाणं स्वच्छतेच्या संबंधानं व्यवस्था ठेवणं जरूर आहे, त्याप्रमाणं शहरांत तें आणल्यानंतर त्याविषयीं काळजी घेतली पाहिजे. ही काळजी तोंडांत पाणी जाईपर्यंत घेतली पाहिजे. कारण, नोकरचाकर अथवा बायका भांड्यांच्या संबंधानं हलगरजीपणा करितात. रस्त्यांतील जी माती वाऱ्यानं कौलांवर जाऊन घरांत येते तिच्यामुळं, किंवा माळवदी घरं असल्यास जी माती पडते तिच्यामुळं, अथवा घरांतील केर, आगीची धग, धूर, कोंदट जागेंतील घाण, मोऱ्यांची घाण, घाणेरडीं भांडीं वगैरे गोष्टींमुळं पाणी खराब होऊन विकार उत्पन्न होण्याचा संभव असतो. ह्मणून शहरांत स्वच्छ पाणी आणिलं ह्मणजे आपलं कर्तव्य संपलं असं न समजतां, तें स्वच्छ भांड्यांत आणून, स्वच्छ ठिकाणीं स्वच्छ भांड्यांत व्यवस्थेनं ठेवून तें चांगल्या वस्त्रानं गाळून प्यालं ह्मणजे आपलं कर्तव्य संपलं असं समजावं. नुसतं स्वच्छ पाणी शहरांत आणून उपयोग नाहीं. कमेटीनं पाण्याची चांगली व्यवस्था ठेविली नाहीं, तर कमेटी दोषास पात्र आहे; परंतु त्याबद्दल तिच्यावर डोळे

वटारावेत व चांगलं पाणी आणिलं असतां आपण स्वतः कांहींच व्यवस्था करूं नये, हा शहाणपणा आहे काय ? स्वच्छता एकपक्षीं असून उपयोग नाहीं. लोकांनीं घरांत व कमेटीनं बाहेर, अशी उभयपक्षीं तजवीज असली पाहिजे. पाण्याच्या बाबतींत फारच काळजी घेतली पाहिजे. आपलं शरीर पाणीमय आहे असं ह्मटलं असतां चालेल. एखाद्या मनुष्याचं वजन १५० रत्तल भरलं, तर त्यांत ११० रत्तल पाण्याचा अंश आहे, असं समजावं. आपण जें पाणी पितों, तें रक्तांत प्रवेश करितं व रुधिराभिसरण क्रिया चांगली चालते, ह्मणजे शरीराच्या सर्व भागांस रक्त मिळतं. जर आपण पाणी न प्यालों, तर रुधिराभिसरण चांगलं चालणार नाहीं व घाणेरडं पाणी प्यालों तर अपाय होईल. कारण, शरीरांतील रक्तवाहिन्यांपैकीं बहुतेक, केंसापेक्षांहि सूक्ष्म असल्यामुळं त्यांतून घट्ट रक्त प्रसरण पावणार नाहीं.

"पाण्याच्या संबंधानं जी गोष्ट सांगितली तीच धान्याच्या अथवा खाण्याच्या दुसऱ्या पदार्थांच्या संबंधानं आहे. शेतकरी चांगलं धान्य तयार करण्याविषयीं विशेष काळजी घेत नाहींत, व दाणेवाले तें चांगलं ठेवण्याची व्यवस्था ठेवित नाहींत. धान्यांत माती, खडा फार असतो, ह्मणून घरीं धान्य आणल्यावर पुढं त्याची चांगली व्यवस्था ठेवणं विशेष जरूर आहे. तें एकदा पोत्यांत टाकून देऊन स्वस्थ बसणं बरोबर नाहीं. उंदीर पोतीं तोडून धान्याचा खराबा करितात. शिवाय केरकचऱ्यामुळं अथवा कोंदट ठिकाणीं ठेवल्यानं तें खराब होतं. नुसते मावळांतील उत्तम आंबेमोहोर अथवा मुंजावद येथील कमोदी तांदूळ, बक्षी गहूं, बऱ्हाणपुरी तुरीची डाळ अथवा गंगथडीकडील ज्वारी उत्तम परीक्षेनं आणवून ठेवण्यापासून तादृश उपयोग नाहीं. हें धान्य व्यवस्थेनं ठेवण्याच्या संबंधानं व निसण्याच्या संबंधानं तितकीच काळजी घेतली नाहीं, तर विशेष उपयोग होत नाहीं. नुसता खाण्यांत नेमस्तपणा ठेवून उपयोग नाहीं. सर्व गोष्टींची व्यवस्था नीट ठेविली पाहिजे. ज्याप्रमाणं पाणी गाळून नंतर तें पीत जावं, त्याप्रमाणंच धान्य निसून चांगल्या डब्यांत ठेवून त्याचा उपयोग करित जावा. ह्या दोन्ही गोष्टी सोप्या असून खर्चाच्या नाहींत.

" आपला हा देश कांहीं स्वाभाविक कारणांनीं उष्ण आहे. उन्हाळ्यांत पुष्कळ ठिकाणीं पारा शंभर अंशांपेक्षां जास्ती अंशांवर असतो. उष्णतेमुळं मोठ्या मनुष्याच्या अंगांत निःशक्तता उत्पन्न होते व मुलांनां तर फार त्रास होतो.

महाबळेश्वर, माथेरान अथवा यांसारख्याच दुसऱ्या थंड हवेच्या ठिकाणीं हवा पालटण्यासाठीं जाण्यास सर्वांनाच सोय नसते. उष्णतेमुळं काम कमी होतं, झोंप कमी येते, व पाणी अधिक जातं. हा व अशाच प्रकारचा दुसरा त्रास होऊन मनाला स्वस्थता नसते. यासाठीं ज्यांना ऐपत आहे त्यांनीं घरांत दुपारीं बसण्याकरितां थंड जागा व रात्रीं घरास लागून उंच ठिकाणीं पश्चिमाभिमुख गच्ची अथवा माळवद ही सोय करणं चांगलं आहे. असं समजून ह्या घरांत आह्मीं मुद्दाम ह्या सोयी केल्या आहेत. या सर्व गोष्टी दिसण्याला फार क्षुल्लक दिसतात; परंतु एवढ्याच कारणावरून त्यांच्याकडे दुर्लक्ष्य करणं योग्य नाहीं. अन्न, पाणी वगैरे गोष्टींविषयीं आपण काळजी न घेतां चालढकल केली, तर त्यांच्यापासून जितका उपयोग व्हावा तितका होत नाहीं. ज्या मानानं आपण दुसऱ्याची काळजी घेतों त्या मानानंच दुसरा आपली काळजी घेतो, असा साधारण नियम आहे. हा नियम फक्त मनुष्यमात्रालाच तेवढा लागू आहे, असं नाहीं. गाई, बैल, वगैरे जनावरं यांच्याविषयीं अथवा खाण्यापिण्याच्या पदार्थांविषयीं काळजी घेतली, तर तीं आपल्या अधिक उपयोगीं पडतील. त्यांची हेळसांड केली, तर तींहि आपली हेळसांड करितील. दुसऱ्यांनीं आपणाकरितां खटपट करावी व आपल्या उपयोगीं पडावं, आणि आपण मात्र ऐदोबासारखं स्वस्थ बसावं, हें चांगलं नाहीं. ही गोष्ट मुलांच्या मनांत चांगली बिंबली पाहिजे."

नंतर माडीवर सर्वजणें गेल्यावर आनंदीबाईनीं प्रथम यशोदाबाईची खोली दाखविली. तींतील तरतऱ्हेच्या हौसेच्या जिनसांचं प्रदर्शन पाहून रमाबाईच्या मुलींस बरें वाटलें. त्या यशोदाबाईस ह्मणाल्या "असलं सामान तुह्माला कसं आवडतं?"

यशोदाबाईनीं सांगितलें "या सर्व जिनसा माझ्या पूर्व आश्रमांतील आहेत. यांच्याविषयीं मला आतां हौस वाटत नाहीं, तथापि या विकणं चांगलं नाहीं. आतां नवीन मात्र घ्यावयाच्या नाहींत, असा मीं निश्चय केला आहे."

हें ऐकून आनंदीबाई ह्मणाल्या "मोहक वस्तु डोळ्यांपुढं असून जर त्यांचा उपभोग घेण्याची इच्छा झाली नाहीं, तर विशेष मोठेपणा आहे; त्यांपासून दूर राहणं यांत विशेष योग्यता नाहीं. जगांतील मोहक वस्तूंपासून अलग राहण्यासाठीं रानावनांत अथवा एकांतवासांत राहणं यांत मोठा पुरुषार्थ, किंवा मोकह वस्तु आसपास असून त्यांच्या पाशांत न सांपडणं हा विशेष

पुरुषार्थ ? या खोलींत सर्वच जिनसा चैनीच्या आहेत, असं नाहीं. हींत तुह्मांला कित्येक उपयुक्तहि दृष्टीस पडतील. ही पहा तिजोरीची पेटी. हिचा उपयोग थोडा का आहे ? ज्यांच्याजवळ दोन पैशाचा अर्थ आहे, त्यांनीं अशा प्रकारची पेटी घेणं फार आवश्य आहे. पैसा सांभाळण्यासाठीं जी गोष्ट जरूर, ती करणं शहाणपणा आहे. घरावर दरोडाच पडून हाणमार झाली, किंवा घरांतील मंडळीपैकींच एखाद्यानं ही फोडली, तर हिचा उपयोग नाहीं हें खरं; परंतु मारहाण करून दरोडे क्वचित् पडतात, नुसत्या चोऱ्याच फार होतात. ”

यशोदाबाईची खोली पाहिल्यावर रमाबाई व त्यांच्या मुली ह्यांनीं काशी व माई यांच्या खोल्या पाहिल्या. त्यांत शिवण व लोंकरीच्या कामाचे नमुनें, सूत काढण्याचें लहानसें यंत्र, गुंडया करण्याचें यंत्र, पुस्तकाचें लहानसें कपाट, चित्रें व तसबिरी वगैरे जिनसा काशी व माई यांनीं दाखविल्या. त्यांनीं कापूस घेऊन यंत्रानें सूत काढवून दाखविलें व सुताच्या गुंडया करून दाखविल्या. तें पाहून रमाबाईची थोरली मुलगी द्वारका ह्मणाली “ आमच्या शाळेंत असं कांहींच शिकवित नाहींत. आमच्या शाळेंत तुह्मी याल, तर तुह्मांला कांहीं एक त्रास होणार नाहीं. ”

यावर काशी ह्मणाली “ आमचं शिकणं चांगलं आहे. मुंबईस येण्याची आमची इच्छा नाहीं. ”

मेजावर भाषांतराची वही पडली होती. ती पाहून द्वारका काशीला ह्मणाली “ तुह्मी अद्याप भाषांतराचे धडे लिहितां ? मला तर लिहिण्याचा मोठा कंटाळा आहे. मीं आतां शाळा सोडिली आहे. ह्मणून भाषांतर करण्याचा, पत्रं लिहिण्याचा अथवा निबंध रचण्याचा त्रास चुकला. शाळा सुटल्यापासून आह्मी मोकळ्या आहों. वाटेल तर कांहीं करमणुकीकरितां वाचित बसतों. आह्मी डोक्याला मुळींच त्रास देत नाहीं. तुह्मांला घरीं शिक्षक असल्यामुळं सुट्टी ह्मणून माहीत नाहीं. तुह्मी नेहमीं सकाळपासून संध्याकाळपर्यंत कामाला जुंपलां असतां. नेहमीं काम करित बसावं यांत काय मौज आहे ? जर तुह्मी आमच्या मुंबईस याल, तर तुह्मांला विशेष आनंद होईल. ”

स्वस्थ बसून कालक्षेप करण्यांत मोठें भूषण आहे, असें काशी आणि माई यांना वाटत नव्हतें. पुष्कळ स्त्रिया व पुरुष थोडें काम झाल्यावर दमून गेल्याचें उगीच सोंग करून गप्पा मारण्यांत अथवा निरर्थक कांहीं वाचित बसण्यांत वेळ

घालवितात, हें आनंदीबाईस माहीत होतें; ह्मणून काशी व माई यांनां त्या उगीच वायफळ गप्पा मारूं देत नसत. निरनिराळे उद्योग करण्याची संवय नसल्यामुळें शेंकडों मुली व हजारों मुलें ह्यांच्या मागची शाळा सुटल्यावर शाळेस निरोप व अभ्यासास निरोप ह्याची एकच गांठ पडते; आणि स्वतःची सुधारणा करावयाची, तिलाहि निरोप मिळतो; यामुळें परिणामीं त्यांचें व देशाचें फार नुकसान होत आहे, हें आनंदीबाईस माहीत होतें. अभ्यास कधींहि संपावयाचा नाहीं; स्वतःची सुधारणा करणें ह्या गोष्टीचा शाळेशीं व पदव्यांशीं संबंध नाहीं; आपणास रोज कांहींना कांहीं शिकावयाचें आहे; जोंपावतों जिवांत जीव आहे, तोंपावतों आपण विद्यार्थी आहों, पदव्यांत अथवा किताबांत विशेष मान नाहीं, विशेष भूषण नाहीं, किंवा विशेष पुरुषार्थ नाहीं. पदव्या किताबांपासून ज्यांनां मान, भूषण अथवा पुरुषार्थ वाटत असेल त्यांनां वाटो. वस्तुतः पाहतां आपण जन्मभर विद्यार्थी होतों, असें ह्मणवून घेण्यांत खरा मान, खरें भूषण, खरा पुरुषार्थ व खरी कृतकृत्यता आहे. शाळा सुटली ह्मणजे अभ्यास संपला, अथवा पदवी मिळाली ह्मणजे प्रतिष्ठा झाली, अथवा किताब प्राप्त झाला ह्मणजे पुरुषार्थ झाला, अथवा अधिकार मिळाला ह्मणजे कृतकृत्यता झाली, अथवा पैसे मिळविले ह्मणजे मोक्षसाधन झालें व इतक्या सर्व गोष्टी मिळाल्या ह्मणजे आपल्या जन्माची सार्थकता झाली, हें मानणें चुकीचें आहे; इतकेंच नाहीं, तर, या समजामुळें लोक आपल्या मुलांनां भलतेंच वळण देत आहेत, अशी आनंदीबाईच्या मनाची ठाम समजूत असल्यामुळें अभ्यास कधींहि संपावयाचा नाहीं, ही गोष्ट त्यांनीं मुलांच्या मनांत चांगली ठसविली होती. काशीनें उत्तर केलें " आमचा अभ्यास संपावा अशी आमची इच्छा नाहीं, व आह्मी स्वस्थ बसून वेळ घालवावा हें आह्मांला बरं वाटत नाहीं."

हें ऐकून द्वारका ह्मणाली " तूं भिऊं नकोस, मी कांहीं आनंदीबाईपाशीं सांगणार नाहीं."

आंत एक व बाहेर एक हा प्रकार काशीला माहीत नव्हता; ह्मणून तिला द्वारकाच्या या असभ्य भाषणाचा राग आला. काशीला वाईट वाटलें, हें पाहून द्वारका ह्मणाली "आह्मी ज्या वेळेस एकट्या असतों, त्या वेळेस आमच्या तोंडास येईल तें आह्मी बोलतों. चार मंडळींत असलों ह्मणजे मात्र काय बोलावं व काय न बोलावं याचा विचार करितों."

हें संभाषण चाललें असतां अहल्याबाई व सावित्री ह्यांच्या चरित्रांचीं पुस्तकें आनंदीबाई रमाबाईस दाखवीत होत्या; परंतु रमाबाईस त्यांत विशेष गोडी लागली नाहीं. त्यांचें लक्ष्य एका तसबिरीकडे गेलें. त्या तसबिरींत, चित्र वगैरे कांहीं नसून सुंदर अक्षरांनीं खालीं लिहिलेला श्लोक होताः—

**न कामये भर्तृविनाकृता सुखम्**
**न कामये भर्तृविनाकृता दिवम् ।**
**न कामये भर्तृविनाकृतं प्रियम्**
**न भर्तृहीना व्यवसामि जीवितुम् ॥**

हा श्लोक सुंदर अक्षरांनीं लिहून तो तसबिरींत ठेवण्याचा हेतु काय, हें रमाबाईस न समजून त्या आनंदीबाईस ह्मणाल्या "ही असली कसली तसबीर? हींत चित्र वगैरे कांहीं नाहीं. हिची शोभा कांहींच दिसत नाहीं. ही दुसरी तसबीर अहल्याबाईची आहेसं वाटतं; परंतु हींत तरी विशेष कांहीं दिसत नाहीं. ही हुबेहूब अहल्याबाईचीच असेलसं वाटत नाहीं."

रमाबाईचें हें भाषण संपत आहे, तोंच तिच्या मुली त्या तसबिरी पाशीं आल्या. त्यांची समजूतहि त्यांच्या आईप्रमाणेंच होती; ह्मणून त्यांनांहि त्या चमत्कारिक दिसल्या. हें पाहून आनंदीबाई ह्मणल्या "तुह्मांला यांत विलक्षण काय दिसतं, हें मला समजत नाहीं. तसविरी केवळ शोभेसाठीं ठेवायच्या, ही समजूत चुकीची आहे; व त्यांत चित्रंच असलीं तर त्या चांगल्या, हें ह्मणणं चमत्कारिक आहे. स्त्रियांनां व मुलांनां सत्संगतीची फार आवश्यकता आहे. थोर पुरुषांचा व स्त्रियांचा सहवास घडणं फारच इष्ट आहे; परंतु हें सर्वांनां नेहमीं शक्य नसतं. जे थोर पुरुष होऊन गेले त्यांच्या कृतीची आठवण होऊन तिचं अनुकरण करण्यास कांहीं साधन असावं, ह्मणून तसविरी संग्रहीं ठेवावयाच्या; मौजेसाठीं ठेवावयाच्या नाहींत. दुसरं असं, कीं, थोर पुरुषांच्या तसबिरीपेक्षां त्यांच्या वचनांचं माहात्म्य फार आहे. कारण, कित्येक दिवसांच्या अनुभवावरून जी गोष्ट त्यांनां कळून आली असते, ती त्यांच्या वचनांवरून समजून येते. अहल्याबाईची तसबीर ठेवण्याचा हेतु तुह्मांला बहुतकरून समजला असेल. अहल्याबाईसारख्या साध्वी स्त्रिया फारच थोड्या होऊन गेल्या. त्यांनीं राज्य चांगल्या रीतीनं केलं, याची मी विशेष मातबरी मानित नाहीं; अगर त्या शहाण्या व धूर्त होत्या याचं मी विशेष कौतुक करित नाहीं. स्त्रियांच्या अंगीं विनय

असणं हा मोठा गुण आहे. हा गुण त्यांच्या अंगीं होता ह्मणून मी तिची प्रशंसा करित्यें. हा गुण स्त्रियांच्या अंगीं नसेल, तर त्यांमधें मोठा दोष आहे असं समजावं. स्त्रियांच्या अंगीं पुष्कळ गुण असून त्यांमधें विनय हा गुण नसेल, तर त्यांच्या इतर गुणांची विशेष योग्यता मी समजत नाहीं. स्त्रियांची खरी योग्यता पुष्कळ अंशीं विनयावरून समजावी. अहिल्याबाईस ऐश्वर्य फार असतां व चोहोंकडे मोहजाल पसरलं असतां, त्यांच्या हातून मर्यादेचं कधींहि अतिक्रमण झालं नाहीं. शेवटपर्यंत विनय हा गुण उत्तम रीतीनं त्यांच्यामधें वास करित होता, ह्मणून त्यांची योग्यता मोठी. हाच कित्ता आमच्या मुलींनीं सतत आपल्या डोळ्यांपुढं ठेवावा, हेंच अनुकरण त्यांनीं करावं, व असं करण्यांतच त्यांचं व पुरुषांचं हित आहे. कारण, हा गुण स्त्रियांच्या अंगीं असल्यानं त्यांना मोहकत्व तर असतंच; परंतु त्यामुळं पुरुषांसहि वचक असतो. बाष्कळपणा, फाजील अंगविक्षेप वगैरे दोषांमुळं स्त्रियांचं वर्तन तिरस्कारास पात्र असतं व पुरुषांसहि फाजीलपणा करण्यास सवड सांपडते; यामुळं कित्येक वेळां उभयतांचं वर्तन दोषास्पद होण्याची भीति असते. अलीकडील स्त्रियांच्या अंगीं विनय कमी आहे असा त्यांच्यावर दोषारोप आहे. हा खरा नसला, तथापि दोषारोपास जागा न ठेवण्याविषयीं जपणं, हें स्त्रियांचं कर्तव्य होय. यावरून त्यांनीं कुठं जाऊं नये, अथवा कुणाशीं बोलूं नये, असा माझ्या ह्मणण्याचा भाव नाहीं. हें करणं जसं चांगलं नाहीं, तसं बाष्कळपणाचं वर्तनहि चांगलं नाहीं. स्त्रियांचं वर्तन मर्यादेचं असलं पाहिजे. सावित्रीचं चरित्र स्त्रियांनीं नेहमीं डोळ्यांपुढं ठेवून जी गोष्ट भर्त्यास प्रिय ती आपणास प्रिय, त्याचं जें सुख तें आपलं सुख, ही जी सावित्रीची इच्छा ती त्यांची इच्छा असली पाहिजे. पति व आपण या उभयतांचं केवळ प्रेम असून उपयोग नाहीं; तर उभयतांमधें मैत्रीहि असली पाहिजे. या व अशाच प्रकारच्या गोष्टींचा उपदेश करण्यास सावित्रीचं चरित्र चांगलं आहे. सावित्रीसारख्या दुसऱ्या स्त्रिया होऊन गेल्या असतील; परंतु त्यांचीं चरित्रं उपलब्ध नाहींत, ही दुःखाची गोष्ट आहे."

इतकें बोलून आनंदीबाई आपल्या खोलींत गेल्या. तेथें दोन कपाटें होतीं. एक पुस्तकांनीं व दुसरें औषधांनीं भरलेलें होतें. हीं कपाटें रमाबाईस दाखवून त्या ह्मणाल्या "इथं मौजेचं असं तुमच्या दृष्टीस पडणार नाहीं; परंतु खरोखर इथं उत्तम भांडार आहे, असं मी समजत्यें. ज्या थोर पुरुषांनीं आपल्या रसाळ

वाणीनं, अथवा वचनांनीं, अथवा कृतींनीं हजारों लोकांचा मानसिक अथवा शारीरिक रोग नाहींसा करून त्यांच्या उन्नतीस साहाय्य केलं, त्यांपैकीं इथं पुष्कळ वास करित आहेत. ते थोर पुरुष शरीरानं गेले आहेत; परंतु त्यांचं मन, त्यांची कृति व त्यांचा अनुभव इथं आहे."

रमाबाईस ह्या गोष्टीची गोडी न वाटून त्या औषधांच्या कपाटांत काय आहे तें पहावयास लागल्या. त्यांत त्यांनां विशेष कांहींच दिसून आलें नाहीं; ह्मणून त्या ह्मणाल्या "संग्रहीं ठेवण्यासारखीं यांत विशेष औषधं तीं काय आहेत? आह्मांला औषधं जवळ ठेवण्याचंच कारण पडत नाहीं. आमच्या मुंबईंत ठिकठिकाणीं दवाखाने व डाक्तर आहेत. वाटेल त्या वेळेला डाक्तरास बोलावितां येतं; किंवा कारणपरत्वें दवाखान्यांत जातां येतं. तुमच्या पुण्यांतहि रस्तोरस्तीं डाक्तर आहेत; तेव्हां हीं औषधं जवळ ठेवण्यांत काय मतलब आहे?"

हें ऐकून आनंदीबाईस मोठा चमत्कार वाटला. त्या ह्मणाल्या "रमाबाई, ठिकाठिकाणीं दवाखाने असले ह्मणजे आपण आपल्या इथं औषधि ठेवूं नयेत, हें ह्मणणं बरोबर नाहीं. साधारण आजारांसाठीं वैद्य पाहण्याच्या नादीं लागावं, हें मला चांगलं वाटत नाहीं. मनुष्याला आपआपल्या प्रकृतीचं मान थोडंबहुत तरी समजणं, व साधारण आजार उत्पन्न झाला असतां ज्याचं त्यानं वैद्य बनणं, हें गैरशिस्त आहे असं मला वाटत नाहीं. साधारण गोष्टींसाठीं आपण दुसऱ्यावर कां अवलंबून रहावं, व जी गोष्ट आपणास करतां येण्यासारखी आहे तिच्यासाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे कां पाहत बसावं, हें मला समजत नाहीं. जिथं निरुपाय आहे, अथवा आपल्या उपायांनीं अपाय होण्याचा संभव आहे, तिथं गोष्ट निराळी आहे; परंतु उठल्याबसल्या वैद्यास बोलावण्याची संवय मुळींच चांगली नाहीं. प्रत्येक आईनं अवश्य लागणारीं औषधं संग्रहीं ठेवून त्यांचा कसा व केव्हां उपयोग करावयाचा, हें समजून घेणं जरूर आहे. याला विशेष शहाणपणा लागत नाहीं, किंवा विशेष पैसाहि लागत नाहीं. ज्याप्रमाणं स्त्रियांनां आरोग्यशास्त्रांतील मूलतत्त्वांचं शिक्षण मिळालं पाहिजे, त्या प्रमाणं साधारण आजारांविषयीं माहिती व त्यांवर जे उपाय करावयाचे त्यांचं ज्ञान हींहि त्यांनां असलीं पाहिजेत. ज्याप्रमाणं जवळ दोन पैशांचा संग्रह असला ह्मणजे मनुष्यास दम असतो, त्याप्रमाणं जवळ औषधिसंग्रह असून त्यांची योजना करण्याचं ज्ञान असलं ह्मणजे दम असतो, गोरगरिबांच्या उपयोगीं

पडण्यास साधन असतं, व थोडक्या गोष्टींसाठीं त्रेधा उडून धावपळ होण्याचे प्रसंग कमी येतात. थोड्याच दिवसांपूर्वीं यशोबाईचं पोट दुखत होतं. त्याचं कारण त्यांच्या लक्ष्यांत येऊन त्याप्रमाणं त्यांनीं उपाय केला असता, तर त्यांनां दुःख सोसावं लागलं नसतं व खडकवासल्याच्या पाण्याच्या एका बाटलीबद्दल पांच रुपये द्यावे लागले नसते. यशोदाबाईचं मीं तुह्माला उदाहरण सांगितलं. असा प्रकार पुष्कळ ठिकाणीं पहाण्यांत येतो. साधारण उपाय असून तो माहीत नसल्यामुळं त्रास होतो. हा त्रास स्त्रियांनां व त्यांतून विशेषेंकरून सासूरवाशिणींस तर फारच होतो. त्या दुखणं चोरून ठेवितात. दहा दहा रेच झाले तरी त्या सांगत नाहींत. शेवटीं, जेव्हां त्या गळून जातात, तेव्हां बोलतात. दहा पांच रेच झाल्याचं वर्तमान ऐकून घरांतील मंडळीची एकच धांदल होते व रेच पटकीच्या दिवसांत होऊं लागले असतां जी धांदल उडते ती विचारायास नको ! या सर्व गोष्टी लक्ष्यांत आणून मुलींनां या सर्व गोष्टींची माहिती व्हावी या हेतूनं, व किरकोळ आजार घरांतील मंडळीस झाला असतां त्यावर देण्यासाठीं हा संग्रह केला आहे. ”

इतकें बोलून आनंदीबाई व दुसरी मंडळी बाळयाच्या खोलींत गेली. तेथें जातांक्षणीं रमाबाईची नजर दारावरील तारांच्या जाळीकडे गेली. ती पाहून त्या ह्मणाल्या “ आमच्या मुंबईंत तर खिडक्यांवर रंगीबेरंगी कांचेचीं तावदानें असतात. तीं दिसण्याला सुशोभित दिसतात. ही तारांची जाळी करण्यांत तसाच तुमचा कांहीं हेतु असावा. ”

आनंदीबाईनीं उत्तर केलें “ होय. तारांच्या असल्या जाळ्या केल्यानं एक उपयोग असतो. थंडीवाऱ्यामुळं आपणांस खिडक्या बंद करण्याचं कारण पडतं व यामुळं आंतील हवा कोंडून जाते. आपण जो उच्छ्वास टाकतों त्याची हवा वाईट असते. उच्छ्वासाची हवा उष्ण व हलकी असल्यामुळं ती स्वाभाविक रीतीनं वर जाते; परंतु तिला बाहेर जाण्यास मार्ग नसल्यास ती आंतल्या आंत खेळते व यामुळं आपणांस दूषित हवेचं ग्रहण करावं लागतं. दूषित हवेचं ग्रहण करण्याचं कारण जितकं न पडेल तितकं चांगलं, ह्मणून ही तारांच्या जाळ्यांची सोय केली आहे. ही सोय मुख्यत्वेंकरून निजावयाच्या खोलींत तर अवश्य असली पाहिजे. कारण, निजावयाच्या खोलीचीं दारं बराच वेळ बंद असतात. ह्या खोल्यांतून हीचशी काय, परंतु उजेडाच्या व खुली हवा येण्याच्या संबंधानंहि सोई केल्या

आहेत. त्या, हल्लीं जीं मतें बहुतकरून पसंत आहेत, त्यांनां अनुसरून आहेत. उजेडाच्या बाबतींत व हवा खुली ठेवण्याच्या बाबातींत कांहीं लोकांचं अज्ञान दिसून येतं. ज्या ठिकाणीं आपण काम करावयास बसतों, त्या ठिकाणीं झळ लागण्याची भीति असूं नये; तिथं सावली असूं नये किंवा थोडादिखील अंधार असूं नये. झळईनं डोळ्यांला अपाय होतो व सावलीनं डोळ्यांला ताण बसतो. अशा स्थितींत काम करणं इष्ट नाहीं. उजेड चांगला असावा असं मी बोलल्यें; परंतु ह्यालाहि प्रमाण आहे व हा कांहीं व्यवस्थेनं आला पाहिजे. जर एखादी खोली २० फूट लांब व २० फूट रुंद आहे, तर ८० औरसचौरस फूट ह्मणजे खोलींतील जमिनीचा एकपंचमांश उजेड असला, ह्मणजे चांगला उजेड आहे असं समजावं. पुष्कळ लोक खिडक्या जमिनीसरशा ठेवतात; परंतु ही त्यांची कांहीं अंशीं चूक आहे. होतां होईल तितकंकरून उजेड वरून यावा व तो डाव्या बाजूनं असावा. आपण लिहित असतां, अथवा वाचित असतां, अथवा दुसरं कांहीं काम करित असतां आपल्या दृष्टीची गति बहुधा डावीकडून उजवी-कडे असते. ह्मणून उजेडाची गति त्याचप्रमाणं असली तर चांगलं. डाव्या-बाजूनं वरून उजेड येणं हें उत्तम आहे. असं न होईल, तर तो उजव्या बाजूकडून येत असावा. आपल्या पाठीमागून उजेड येणं वाईट आहे; कारण आपण जें काम करित असतों त्यावर आपल्या अंगाची सावली पडते व सावलीनं डोळ्यांला ताण बसून डोळ्यांच्या शिरा ताणतात व कांहीं कालानं डोळ्यांनां अपाय होण्याची भीति असते. समोरून उजेड येणं, हें तर फारच वाईट आहे. आपल्या समोरून उजेड येत असला ह्मणजे डोळे दिपतात व अपाय होतो. सूर्यकिरणं प्रत्यक्ष येऊं नयेत ह्मणून झडपं (व्हिनिशन शटर्स) असलीं तर चांगलं. अशा प्रकारचीं झडपं असलीं ह्मणजे वाटेल तितका उजेड घेण्यास सवड सांपडते, झळ येत नाहीं, व सोसाट्याच्या अथवा थंड वाऱ्यापासून त्रास होत नाहीं. ही गोष्ट मनांत आणून बहुतेक खिडक्यांनां झडपं केलीं आहेत. कित्येक लोक खोलींत अथवा दिवाणखान्यांत उजेड पुष्कळ असतां सफेतीचा रंग देतात; परंतु यामुळं डोळ्यांला थोडासा त्रास होतो, हें त्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं. अशा ठिकाणीं सफेतीच्या ऐवजीं अस्मानी किंवा अशाच सारखा दुसरा रंग देणं चांगलं.

"शरीरप्रकृति साफ असावी अशी जर आपली इच्छा आहे, तर घरांत पुष्कळ हवा असली पाहिजे; परंतु घरं ठेंगणीं असलीं ह्मणजे त्यांत थोडी हवा

असते व थोड्या हवेमुळं कोंडमारा होऊन जीव गुदमरतो. ह्मणून होईल तितकं करून तीं उंच असावीं. खोली दहाअकरा फूट उंच असणं हा मध्यम पक्ष आहे. चांगलं मान ह्मटलं ह्मणजे १४ फूट उंच असणं हें होय. दोन चार फुटांचं अंतर ह्मणजे प्रथम दर्शनीं आपणास विशेष वाटत नाहीं; परंतु एकंदरीनं जास्त मान होतं, हें आपल्या लक्ष्यांत येत नाहीं. १० फूट लांब, १० फूट रुंद व १० फूट उंच खोली असली, ह्मणजे १००० घन फूट होतात. परंतु ती खोली १० फूट लांब, १० फूट रुंद व १२ फूट उंच असली ह्मणजे १२०० घन फूट होतात. यामुळें एकंदरीनं २०० फुटांचं अंतर पडतं; व त्या मानानं हवा जास्त असते. हवा व उजेड हीं चांगलीं यावींत असा जर हेतु आहे, तर खिडक्या चार साडे चार फूट उंचीवर असाव्या; ह्मणजे त्या भुईसपाट नसतां जमिनीपासून बऱ्याच वर असाव्या. असं केलं असतां उजेड वरून पडेल व उन्हाची झळ अथवा थंड वारा ह्यांपासून त्रास होण्याची भीति राहणार नाहीं.

"ही सर्व सोय केली असतां उजेड चांगला येऊन हवा चांगली येते. खोलींतील हवा चांगली आहे किंवा नाहीं हें पुष्कळ वेळां वासावरून समजतं; परंतु हें समजण्यास दुसरा थोडा उपाय आहे. एक स्वच्छ बाटली घेऊन तींत १० औंस स्वच्छ पाणी घालावं. तींत हवा जाईल अशा रीतीनं ती हलवावी. तींत सुमारं एक चमचाभर चुन्याचं पाणी टाकून ती बुचानं बंद करावी व पुनः हलवावी. जर बाटलींतील पाण्याचा रंग दुधासारखा पांढरा दिसला, तर खोलींत अंगाराम्ल ( कारबानिक आसिड ) वायु आहे व त्यामुळं घाण आहे, असं समजावं."

बाळ्या ह्रड असल्यामुळें त्याच्या शिक्षणासंबंधानें आनंदीबाईंनीं विशेष काळजी घेतली होती. फ्रोबेल साहेबांच्या किंडरगार्टन सिस्टिम (बालोद्यानपद्धति) संबंधीं त्यांना कांहीं माहिती होती. त्या पद्धतीस कांहीं अंशीं अनुसरून आपली बालशिक्षणपद्धत असावी, असा त्यांचा अभिप्राय असे. झाड लहानपणीं ज्याप्रमाणें वांकवितां येतें, त्याप्रमाणें तें मोठेपणीं येत नाहीं, असा नियम आहे. हाच नियम मुलांनांहि लागू आहे. ह्या नियमाप्रमाणें आनंदीबाईचें वर्तन असे. कुदळीनें खणणें, वांकस हातीं धरणें, नांगर धरणें, बंडी अथवा आंगरखा शिवणें, वगैरे गोष्टींचा मुलांना कंटाळा वाटतो, व असें करणें हा हलकेपणा आहे असें

त्यांनां वाटतें; परंतु याबद्दल त्यांनां दोष न देतां आपण आपल्याकडेच दोष घेतला पाहिजे, अशी आनंदीबाईची समजूत असे. कारण, ह्या व अशाच प्रकारच्या दुसऱ्या गोष्टींचें महत्त्व किती आहे व ह्यांपासून उपयोग काय आहे, हें लहानपणींच त्यांच्या मनावर बिंबलें नाहीं, तर पुढें ह्या गोष्टी करण्यास त्यांनां कंटाळा वाटेल ह्यांत कांहीं नवल नाहीं. लहानपणापासून जर ह्या गोष्टींचा परिचय असेल व त्या करण्याची संवय असेल, तर त्या करण्यास पुढें संकोच वाटण्याचा संभव कमी आहे; इतकेंच कीं, ह्या गोष्टींचें महत्त्व दुसऱ्या प्रकारच्या विद्येबरोबर आहे, ही गोष्ट मात्र त्यांच्या मनांत पूर्णपणें ठसली पाहिजे व त्याप्रमाणें आपण पुढें वागलें पाहिजे. ज्यांच्याकडे शिक्षणाचें काम असतें, त्यांनां कार्यकारणाचें परीक्षण करण्याची संवय असली पाहिजे; विशेषेंकरून ज्यांच्याकडे मुलांच्या शिक्षणाचें काम असतें,त्यांनां तर ती अवश्य असली पाहिजे. ज्या शिक्षकांस ही संवय नसते, त्यांच्या हातून मुलांचें हित होण्याचा संभव कमी असतो, असें समजावें. ह्मणून पुष्कळ स्त्रियांकडून मुलांच्या संगोपनाचें काम चांगल्या रीतीनें होत नाहीं. मूल कां रडतें, हट्ट कां करतें, कां रागावतें, हें शोधून काढून ज्या कारणामुळें वाईट परिणाम होत असतील तीं कारणें प्रथम दूर केलीं पाहिजेत. कारण, वाईट परिणामांचीं कारणेंच जर वेळच्या वेळीं काढून टाकित गेलें नाहीं, तर वाईट परिणाम घडून येतील हें उघड आहे. त्याचप्रमाणें मुलांनां आनंद कशानें होतो, त्यांनां सुख कशानें वाटतें, कोणत्या गोष्टींनीं त्यांच्या मनावर चांगला संस्कार होतो,व कोणत्या गोष्टींनीं त्यांच्या मनाला चांगलें वळण लागतें, हें शोधून त्याप्रमाणें आचरण केलें पाहिजे. मुख्य गोष्ट ही कीं, प्रथम मुलांच्या स्वभावाचें चांगलें परीक्षण केलें पाहिजे व कार्यकारणाचा विचार करून त्या धोरणानें शिक्षण दिलें पाहिजे. असें न करितां त्यांनां उगीच धोपटीत सुटलें, अथवा दापित गेलें, तर इष्ट हेतु कधींहि सिद्धीस जाणार नाहीं, हें आनंदीबाईस माहीत होतें. बाळपणीं मुलांनां खेळण्याची फार हौस असते; खेळण्याकडे त्यांच्या मनाची फार प्रवृत्ति असते; परंतु अज्ञान आईबापांची अशी इच्छा असते कीं, मुलांनीं फार खेळूं नये. एकाच्या मनाची प्रवृत्ति एकीकडे व दुसऱ्याच्या मनाची प्रवृत्ति दुसरीकडे, असा प्रकार मुळींच चांगला नाहीं. ह्यामुळें ओढाताण होते व ह्यापासून हित न होतां अहित होतें, हें आईबापांच्या लक्ष्यांत येत नाहीं. खेळण्यानें मुलांची आनंदवृत्ति राहते, त्यांचें शरीर सुदृढ होतें

व बुद्धीचाहि विकास होतो. इतकेंच कीं, जे खेळ मुलांनीं खेळावयाचे त्यांत निवड केली पाहिजे. ह्मणजे कोणत्या खेळांनीं त्यांच्या शरीरास सुख होऊन तें सुदृढ होईल, अथवा मनास थोडथोडा बोध होऊन त्याचा हळूहळू विकास होईल, ह्याविषयीं विचार केला पाहिजे. आपण बाललीलांचें कौतुक केलें पाहिजे व केव्हां केव्हां मुलांबरोबर प्रेमानें खेळलेंहि पाहिजे, अशी आनंदीबाईची समजूत असे. लहान मुलांपुढें खुळखुळा अथवा भांडें वाजवित बसलें, ह्मणजे तीं स्तब्ध राहतात व त्यांची क्षुब्ध वृत्ति नष्ट होऊन तीं शांत होतात. ह्यावरून तीं नादलुब्ध असलीं पाहिजेत व त्यांनां चमत्कारिक ध्वनि ऐकून नवल वाटत असलें पाहिजे. त्याचप्रमाणें दिवा अथवा दुसरी चमत्कारिक वस्तु दृष्टीस पडली असतां तीं तिजकडे टक लावून खारखीं पहात बसतात व त्या वस्तूचें त्यांनां कौतुक वाटत असावें असें दिसतें; परंतु ह्या दोन क्रिया होत असतां एकाग्रता ही आपोआप राहते. ह्मणजे लक्ष्यपूर्वक ऐकणें व लक्ष्यपूर्वक पहाणें ह्या ज्या दोन महत्त्वाच्या क्रिया, ज्यांच्या योगानें मोठमोठाले शोध होऊन सुधारणेस साहाय्य होत आहे, त्यांचा प्रादुर्भाव लहानपणीं होत असतो. एकाग्रतेशिवाय शिक्षण निर्फळ होतें. ही एकाग्रता लहान मुलांच्या अंगीं असते; लक्ष्यपूर्वक ऐकण्याचा व लक्ष्यपूर्वक पाहण्याचा त्यांनां नाद असतो; परंतु ह्या दोन गोष्टींची त्यांनां संवय लावणें हें आपलें कर्तव्य आहे; व कोणता चमत्कारिक ध्वनि त्यांच्याकडून ऐकवावयाचा व कोणत्या चमत्कारिक गोष्टी त्यांच्याकडून लक्ष्यपूर्वक पाहवावयाच्या, व यामुळें एकाग्रता या गुणाची वृद्धि करवावयाची, हें आपल्याकडे आहे.

एखादी नवीन व चमत्कारिक वस्तु मुलांच्या दृष्टी पडली असतां तीं नानाप्रकारचे प्रश्न विचारतात. या प्रश्नांचीं योग्य उत्तरें देऊन त्यांची जिज्ञासा अधिक न वाढवितां पुष्कळ स्त्रिया अथवा पुरुष त्यांनां उलट दापतात, त्यांच्या अंगावर येतात व त्यांनां झिटकारून टाकतात. हा असमंजसपणा आहे असें आनंदीबाईस वाटत असे. जो चौकसपणा सुधारणेचें बीज आहे व ज्याच्या अभावीं ज्ञानाची वृद्धि होत नाहीं, तो आपोआप मुलांमध्यें प्रथम दृष्टीस पडत असतां त्याचा कंटाळा करावा, व तो त्यांच्यामध्यें यावा ह्मणून नंतर अनेक कृत्रिम उपाय करित बसावें, व तो दृष्टीस पडला नाहीं ह्मणजे शीण मानावा, ह्यांत अर्थ नाहीं. हें वर्तन कांहीं अंशीं हातचें सोडून पळत्याच्या मागें लागण्यासारखें आहे,

असें त्या समजत असत. यासंबंधानें जी मुख्य गोष्ट लक्ष्यांत ठेवावयाची ती ही, कीं, मुलें तरकटी होणार नाहींत, एवढ्याविषयीं जपलें पाहिजे.

मुलांच्या अंगीं चळवळ फार असते. हें घे, तें घे; हें नास, तें नास; हें पहा, तें पहा; खडे गोळा कर, चिंचोके जमा कर, टाटोळ्याचा हौद कर; फरेमारें काढ वगैरे शतशः कृति तीं करित असतात. त्यांच्या हाताला नेहमीं चाळा असतो. उगीच स्वस्थ बसण्याचा त्यांनां कंटाळा वाटतो. कांहींच करावयास न सांपडलें, तर इकडून तिकडे दिवसांतून त्यांच्या किती खेपा होत असतात, हें सांगतां येत नाहीं. ह्या सर्व कृति चांगल्या असतात, असें नाहीं; परंतु ह्यांनां चांगलें वळण लावणें हें आपलें काम आहे.

एकटें राहणें ही मुलांनां मोठी शिक्षा वाटते. तुह्मी त्यांनां मारा, ह्मणा, तीं दुसऱ्या मुलांत मिसळण्यास एका पायावर तयार असतात ! जवळ कोणी नसलें, ह्मणजे तीं बावरल्यासारखीं होतात व त्यांनां चैन पडत नाहीं. ह्यावरून संगतीची त्यांनां फार आवश्यकता असते, हें उघड आहे. सोबतीची त्यांनां इतकी प्रबल इच्छा असते, कीं, कुत्रींमांजरेंसुद्धां त्यांनां चालतात. त्यांच्याशीं तीं सलगीनें वागतात. सारांश, मुलांचें मन कसें व्यापृत ठेवावें, हा विचार महत्त्वाचा आहे. कित्येक लोकांचा असा समज आहे, कीं, मुलांनां फक्त मुलांच्याच संगतीची आवड असते; परंतु हा कांहीं अंशीं चुकीचा समज आहे. मुलें खोड्या करितात, हें मोठ्या माणसांनां आवडत नाहीं. तीं त्यांनां दापतात, रागें भरतात व आपल्याजवळ उभीं राहूं देत नाहींत. केव्हां केव्हां कामामुळें मुलांशीं बोलण्यास त्यांनां सवड होत नाहीं, ह्मणून ज्या ठिकाणीं मुलांनां विशेष मोकळीक मिळते अशा ठिकाणीं जाऊन तीं आपली करमणूक करतात. जर त्यांनां घरीं मोठ्या माणसांपासून करमणूक होईल, तर तीं बाहेर खेळावयास जाण्याचा संभव कमी आहे. मुलांनां कांहीं तरी उद्योग लागतो व त्यांनां कांहीं तरी करमणूक पाहिजे असते. हा उद्योग व ही करमणूक कोणती असावी, हा विचार करणें जरूर आहे.

ज्यांच्याकडे शिक्षण देण्याचें काम आहे, त्यांचें वर्तन कांहीं अंशीं माळ्यासारखें असलें पाहिजे. झाडांची वाढ भलत्याच दिशेला जाऊं लागून त्रास होऊं लागला, तर माळी तसें करूं देत नाहीं; तथापि एरवीं तो त्यांच्या वृद्धीस प्रतिबंध करित नाहीं; इतकेंच नाहीं, तर त्यांनां वेळचे वेळेवर पाणी घालतो, त्यांच्या

शेजारील तृण अथवा घाण काढून सभोंवतालची जागा साफ ठेवतो, त्यांच्यावर नेहमीं सावली पडून तीं पिकुटणार नाहींत अथवा अतिशयित ऊन लागून करपून जाणार नाहींत अशाविषयीं खबरदारी घेतो, व ज्याच्या योगानें त्यांचे सर्व अवयव सारखे वृद्धि पावतील तें तें नेहमीं करित असतो. त्याचप्रमाणें मुलांच्यासंबंधानें आपलें आचरण असलें पाहिजे. त्यांच्या अवयवांची वाढ सारखी होत गेली पाहिजे व त्यांच्या मानसिक शक्ति जागृत होऊन त्यांचा विकास झाला पाहिजे. त्यांनां भलती दिशा लागत चालली आहे कीं काय, ह्मणजे ज्या मार्गानें त्यांनीं जाऊं नये असें आपणांस वाटतें त्या मार्गानें तीं जात आहेत कीं काय, ह्याविषयीं विचार करून त्यांनां असन्मार्गानें जाऊं न देणें ही पहिली गोष्ट आहे. दुसरी गोष्ट ही कीं, त्यांच्या शारीरिक अथवा मानसिक शक्ति ज्या हळुहळू विकास पावत असतात त्यांनां प्रतिबंध न करितां त्यांनां उलट साहाय्य केलें पाहिजे. ज्या योगानें ह्या शक्ति विशेष जागृत होतील व विशेष विकास पावतील, तें तें केलें पाहिजे. ह्मणजे त्यांच्यापुढें निरनिराळे पदार्थ व निरनिराळीं चित्रें ठेवून व सृष्टींतील निरनिराळे देखावे त्यांच्याकडून अवलोकन करवून त्यांच्यामध्यें जिज्ञासा उत्पन्न केली पाहिजे. त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरें दिलीं पाहिजेत. अशा रीतीनें त्यांच्या करमणूकीस व त्यांच्या उद्योगास वळण लाविलें पाहिजे.

शिक्षण देण्याच्या बाबतींत घाई, अथवा हावरेपणा बिलकूल उपयोगीं नाहीं. लहान झाडांच्यासंबंधानें माळ्याच्या मनाची जी स्थिति असते, तशी लहान मुलांच्यासंबंधानें आपल्या मनाची असली पाहिजे; क्रम कधींहि सोडतां नये. क्रमाक्रमानें व सावकाशपणानें शिक्षण चाललें तरी कांहीं हरकत नाहीं. ह्या योगानें दोन दिवस जास्त लागतील, परंतु हे दिवस व्यर्थ गेले असें मानणें चूक आहे. कोंवळ्या फांदीवर मोठें ओझें घातलें ह्मणजे ती वांकून जाते व कधीं कधीं तिला अपाय होतो. त्याचप्रमाणें कोंवळ्या शरीरावर अथवा मनावर भलताच भार घातला असतां, तें पिचण्याची भीति असते. अशीं उदाहरणें अलीकडे फार दृष्टीस पडतात. थोडक्या कालांत पुष्कळ आलें ह्मणजे लोक बरें ह्मणतात, व मुलें तरतरीत आहेत असें लोक समजतात, यामुळें कित्येकांनां हावरेपणा सुटतो. कित्येकांनां मुलांच्या शरीराची व मनाची काय स्थिति होत आहे, हें समजत नसल्यामुळें त्यांच्या हातून चालढकल होऊन

मुलांस अपाय होतो. ही गोष्ट चांगली लक्ष्यांत ठेविली पाहिजे. मुलें अल्पायुषी होतात," ह्मणून प्रारब्धाला दोष देण्यांत शहाणपणा नाहीं. ज्या कारणांमुळें अलीकडील कांहीं मुलें अल्पायुषी होतात त्यांपैकीं शिक्षणाच्या बाबतींत बापाचा अथवा शिक्षकाचा हावरेपणा हें एक होय. ह्या हावरेपणामुळें जें अनिष्टकार्य होत असतें तें हळुहळू होत असतें; अर्थात्, तें नजरेस लवकर येत नाहीं; परंतु ह्या बाबतींत हेळसांड करणें अविचाराचें आहे. ज्या वेळेस शरीर व मन हीं दृढ होतात, त्या वेळेस त्याच्यावर जास्त भार पडला असतां एक वेळ चालतें; परंतु लहानपणीं, कोंवळ्या शरीरावर व मनावर फाजील भार कधींहि असतां कामा नये; फाजील घाई कधींहि असूं नये; क्रम सुटतां कामा नये व फाजील सक्ति तर बिलकूल असूं नये. लहानपणीं शारीर व मानसिक यंत्रास फाजील गति देणें व त्याच्याकडून जें काम होण्यासारखें नाहीं तें करविणें, हा मोठा अविचार आहे, हें लक्ष्यांत ठेवून मुलांनां शिक्षण देणें महत्त्वाचें आहे. ह्या बाबतींत शहाणे व अज्ञानी ह्या दोहोंच्याहि हातून चूक होत असते. याबद्दल पुष्कळ समंजस व असमंजस आईबाप, शिक्षक व परीक्षक हे कांहीं अंशीं दोषास पात्र आहेत. परीक्षकांच्या कृतींचा शिक्षकांच्या कृतीवर, शिक्षकांच्या कृतींचा आईबापांच्या कृतीवर, व त्याचप्रमाणें आईबापांच्या कृतीचा शिक्षकांच्या कृतीवर व शिक्षकांच्या कृतीचा परीक्षकांच्या कृतीवर परिणाम होऊन मुलांनां त्रास होतो. या सर्वांचा खेळ होतो, परंतु मुलें मधल्यामध्यें चेंगरतात.

मुलें रोज अनेक पदार्थ पाहतात, अनेक कृति करतात व अनेक खेळ खेळतात. ह्या योगानें त्यांच्या मनास संस्कार होत असतो. गुरुमुखानें ते जें ऐकतात त्याचा, अथवा पुस्तकांतून ते जें वाचित असतात त्याचाहि परिणाम त्यांच्या मनावर होत असतो; परंतु प्रत्यक्ष पदार्थ पाहून अथवा हातानें कृति करून जसें त्यांनां लवकर ज्ञान प्राप्त होतें, तसें इतर रीतीनें होत नाहीं. पदार्थ मांडून अंक मोजण्यास शिकविणें, त्रिकोण चौकोन, वगैरे आकृति पुढें ठेवून त्यांविषयीं माहिती सांगणें व तशा आकृति त्यांच्याकडून काढविणें, ह्यामुळें मुलांनां एका प्रकारची करमणूक होऊन हातून क्रिया होते व सांगितलेली गोष्ट चांगली लक्ष्यांत राहते.

ह्या सर्व गोष्टी लक्ष्यांत आणून त्या धोरणानें आनंदीबाईनीं बाळ्याचा शिक्षणक्रम चालविला होता. शिक्षणाचा कंटाळा न येतां त्याची गोडी लागावी

व त्यापासून आनंद व्हावा, ह्मणून त्यांनीं त्याला गोष्टींचीं पुस्तकें, थोर पुरुषांचीं लहान लहान चरित्रें, निरनिराळ्या जनावरांचीं चित्रें, नकाशे, लहान यंत्रें व हत्यारें, निरनिराळें बीं व धोंडे ह्यांचे नमुने, तसबिरी वगैरे घेऊन दिलीं होतीं. तात्पर्य, शिक्षण देण्यासाठीं जीं बाह्यसाधनें थोडक्यांत उपलब्ध होतीं तीं सर्व त्यांनीं विकत घेऊन दिलीं होतीं. आनंदीबाईंना माहीत होतें, कीं, ह्या साधनांनीं शिक्षण सुलभ होऊन शिकणारास आनंद वाटतो व त्याच्या बुद्धीस वळण देण्यास सवड सांपडते. या साधनांचा उपहास करणारे कांहीं असतात हें त्यांना माहीत होतें; परंतु लहान मुलांच्या बाबतींत स्मरण व मननक्रिया ह्यांपेक्षां प्रेक्षणक्रिया जितकी प्रथम जास्त चालते व त्यांना निवड करण्याची संवय जितकी जास्त असते तितकें विशेष हित असतें, व हीं बाह्यसाधनें मुलांच्या बुद्धीचा विकास करण्यास चांगल्या शिक्षकांस विशेष साहाय्यभूत असतात, हें त्यांना माहीत होतें; ह्मणून या बाह्यसाधनांचा त्यांनीं विशेष उपयोग केला होता. यामुळें बाळयाची खोली एक लहानसें पदार्थसंग्रहालयच बनलें होतें. तींतील तसबिरी पाहून रमाबाईंच्या मुलींस कौतुक वाटलें. तें पाहून आनंदीबाई ह्मणाल्या " ज्यांच्या ह्या तसबिरी आहेत, त्यांचीं चरित्रें थोडक्यांत लिहून ठेविलीं आहेत व जीं वचनें तुमच्या दृष्टीस पडत आहेत त्यांविषयीं गोष्टीच्या रूपानें खुलासा करून लहान लहान पुस्तकें लिहून ठेविलेलीं आहेत. हीं तुह्मीं वाचिलीं असतां या तसबिरींचा उपयोग काय आहे, हें तुह्माला समजून येईल. मुलांच्या डोळ्यांपुढें ज्या तसबिरी असावयाच्या, व जीं चरित्रें त्यांनीं वाचावयाचीं त्यांमधें चांगली निवड केली पाहिजे. असल्या चरित्रांत उगीच सर्व गोष्टींचा पाल्हाळ करण्यांत अर्थ नाहीं. चरित्रनायकाच्या चरित्रांतील महत्त्वाच्या चार गोष्टींविषयीं दिग्दर्शन केलेलें असून त्यांत जो विशेष गुण असेल व ज्याचें अनुकरण मुलांनीं करावयाचें, त्याविषयीं विशेष खुलासा केलेला असावा."

रमाबाई व त्यांच्या मुली ह्यांनीं राम, हरिश्चंद्र, बुद्ध, शिवाजी, वार्सिंग्टन, ग्यारिबाल्डी, ग्ल्याडस्टन वगैरे थोर पुरुषांच्या तसबिरी पाहिल्या; व बाळयानें लक्ष्यांत ठेवावींत ह्मणून थोर पुरुषांचीं वचनें मोठ्या अक्षरांनीं लिहून आरशांत ठेविलीं होतीं तीं द्वारकानें मोठ्यानें वाचिलीं. तीं वचनें अशीं:—

नाहीं संतपण मिळत हें हाटीं । हिंडता कपाटीं रानीं वनीं ।
नये मोल देतां धनाचिया राशी । नाहीं तें आकाशीं पाताळीं तें ।
तुका ह्मणे आहे आपल्या तें अंगीं । गवसेना जगीं दुजे ठायीं ॥१॥

दिली मान तरी नेघावी शत्रूची । शरण आलें त्यासी जतन जीवें ।
समर्थासी असे विचाराची आण । भलीं पापपुण्य विचारावें
काकुळतीसाठीं सत्याचा विसर । पडिलें अंतर न पाहिजे ।
तुका ह्मणे यश कीर्ति आणि मान । करितां जतन देव जोडे ॥ १

मना श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें
मना बोलणें नित्य सोसीत जावें ।
स्वयें सर्वदा नम्रवाचे वदावें
मना सर्व लोकांसि रे नीववावें ॥ १ ॥

तनु त्यागितां कीर्ति मागें उरावी
मना सज्जना हेचि क्रीया धरावी ।
मना चंदनाचे परी त्वां झिजावें
परी अंतरीं सज्जना नीववावें ॥ १ ॥

नित्य नेम सोडूं नये । अभ्यास बुडों देऊं नये
परतंत्र होऊं नये । कांहीं केल्या ॥
स्वतंत्रता मोडूं नये । निरापेक्ष तोडूं नये ।
परापेक्ष होऊं नये । क्षणक्षणा ॥ १ ॥

दे दान गुप्त, उपकार करी न बोले,
मानी प्रमोद जरि मान्य घरास आले; ।
दावी न गर्व विभवें, गुण घे पराचे,
खड्गाग्र-तुल्य विषमव्रत हें भल्याचें. ॥ १ ॥

आलस्य जें कार्यविघातकारी
असूं नये तो रिपु या शरीरीं ।
उद्योग सद्बंधु तया न टाकीं
त्या सेवितां पावसि सौख्य लोकीं ॥ १ ॥

धन्यात उत्तम दक्षता । धनात उत्तम तो ज्ञातृता ।
लाभ तो शरीर-आरोग्यता । तुष्टी तेचि सुख जाणा ॥ १ ॥

सत्यापरता नाहीं धर्म । सत्य तेंचि परब्रह्म ।
सत्यापाशीं पुरुषोत्तम । सर्वकाळ तिष्ठत ॥ १ ॥

उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मी-
र्दैवेन देयमिति कापुरुषा वदंति ।
दैवं निहत्य कुरु पौरुषमात्मशक्त्या
यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः ॥ १ ॥

आत्मा नदी संयमपुण्यतीर्था सत्योदका शीलतटा दयोर्मिः ।
तत्राभिषेकं कुरु पांडुपुत्र न वारिणा शुध्यति चांतरात्मा ॥ १ ॥

सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम् ।
वृणुते हि विमृश्यकारिणं गुणालुब्धाः स्वयमेव संपदः ॥ १ ॥

यस्मिन्कुले यः पुरुषः प्रधानः स सर्वयत्नैः परिरक्षणीयः ।
तस्मिन् विनष्टे स्वकुलं विनष्टं न नाभिभंगे ह्यरका वहंति ॥ १ ॥

यत्र नार्यस्तु पूज्यंते रमंते तत्र देवताः ।
यत्रैतास्तु न पूज्यंते सर्वास्तत्राफलाः क्रियाः ॥ १ ॥
एकोऽहमस्मीत्यात्मानं यत्त्वं कल्याण मन्यसे ।
नित्यं स्थितस्ते हृद्येषः पुण्यपापेक्षिता मुनिः ॥ १ ॥

पापान्निवारयति योजयते हिताय
गुह्यं च गूहति गुणान्प्रकटीकरोति ।
आपद्गतं च न जहाति ददाति काले
सन्मित्रलक्षणमिदं प्रवदंति संतः ॥ १ ॥

यावत् स्वस्थमिदं कलेवरगृहं यावच्च दूरे जरा
यावच्चेंद्रियशक्तिरप्रतिहता यावत्क्षयो नायुषः ।
आत्मश्रेयसि तावदेव विदुषा कार्यः प्रयत्नो महान्
प्रोद्दीप्ते भवने तु कूपखननं प्रत्युद्यमः कीदृशः ॥ १ ॥

सतां सकृत्संगतमीप्सितं परं ततः पुरं मित्रमिति प्रचक्षते ।
न चाफलं सत्पुरुषेण संगतं ततः सतां सन्निवसेत्समागमे ॥ १ ॥

ह्या सर्व तसबिरी पाहून रमाबाई ह्मणाल्या " राम देव होता ह्मणून त्याची तुह्मीं तसबीर जवळ ठेविली आहे; परंतु ह्या बाकीच्या तसबिरी ठेवण्यांत तुमचा हेतु काय आहे, हें समजत नाहीं."

हें ऐकून आनंदीबाईनीं उत्तर केलें " मुलांच्या डोळ्यांपुढं कित्ता पाहिजे. त्यांनीं नेहमीं कोणतीं वचनं लक्ष्यांत ठेवावयाचीं तीं त्यांच्या डोळ्यांपुढं पाहिजेत. कोणत्या थोर पुरुषांच्या अंगचा कोणता गुण त्यांनीं घ्यावयाचा व त्यांच्या वचनांतील कोणतं तत्त्व लक्ष्यांत ठेवायचं, हें त्यांना समजून सांगितलं पाहिजे, व ह्या हेतूनं ही सर्व व्यवस्था केली आहे. रामाच्या अंगीं पुष्कळ गुण होते, परंतु त्यांपैकीं पितृभक्ति व एकपत्नीव्रत हे दोन मोठे होते. पित्यानं जें वचन दिलं तें आपणच दिलं, असं समजून त्यानं वनवास भोगण्याचं कबूल केलं; परंतु पित्याची आज्ञा मोडिली नाहीं ! ऐश्वर्य, तारुण्य, सौंदर्य वगैरे सर्व गोष्टींची अनुकूलता असतां, शास्त्र, व रूढि यांची संमति असतां व आपल्या पत्नीविषयीं जो व्यर्थ लोकापवाद होता त्याला न भितां मरेपर्यंत त्यानं एकपत्नी-व्रत कडकडित रीतीनं पाळिलं. ऐश्वर्याच्या मदामुळं, तारुण्याच्या भरामुळं, अथवा सौंदर्याच्या गर्वामुळं बेफाम होऊन कित्येक लोक आपल्या पत्नीस दिलेल्या वचनावर पाणी सोडितात; कित्येक क्षुल्लक कारणांवरून त्यांचा त्याग करितात व कित्येक पुत्रप्राप्तीसाठीं दुसरं लग्न करितात. ज्याप्रमाणं स्त्रियांमधें पातिव्रत्य हा गुण मोठा आहे, त्याप्रमाणंच पुरुषांमधें एकपत्नीव्रत हा मोठा गुण आहे. हा प्रायः फार थोड्या लोकांत दिसून येतो. या गुणाचा महिमा फार आहे, ह्मणून तो मुलांच्या मनावर ठसविणं हें चांगलं.

" हरिश्चंद्राच्यासंबंधानं पुराणकारांनीं अतिशयोक्ति केली आहे असं जरी मानिलं, तरी तो सत्यप्रतिज्ञ होता ही गोष्ट निर्विवाद आहे. कसंहि संकट पडलं व कितीहि नुकसान झालं, तथापि मनुष्यानं आपलं वचन पाळणं हें त्याचं कर्तव्य आहे. कित्येक लोक वचन देण्यास तयार असतात; परंतु त्याप्रमाणं आचरण करण्याचं त्यांच्या जिवावर येतं. सर्व गोष्टींची अनुकूलता असतां वचन पाळणं यांत विशेष पुरुषार्थ नाहीं; संकट ओढवलं असतांहि जे आपल्या वचनास जागतात, किंवा वचन पाळण्यासाठीं आपलं सर्वस्व जरी हरण होत असलं तरी डगत नाहींत, त्यांची थोरवी विशेष समजावयाची. वचनाची मातब्बरी मुलांना कळणं फार अगत्याचं आहे. बळाबळ न पाहतां वचन देणं

हा मूर्खपणा आहे, हें त्यांनां कळूं लागलं पाहिजे; आपल्या वचनावर लोकांचा भरवंसा नसणं हें आपणांस लांछन आहे, असं त्यांनां समजलं पाहिजे, व वचन पाळण्यासाठीं त्यांनीं नेहमीं तयार असलं पाहिजे.

" शिवाजीविषयीं विचार करितां ही गोष्ट दिसून येते कीं, अनेक अडचणी व अनेक संकटं आलीं असतांहि त्यांनां त्यानं जुमानलं नाहीं; इतकंच नाहीं, तर त्यांतून धिमेपणानं व शहाणपणानं पार पडून मराठी राज्याची स्थापना करणं हा जो त्याचा महत्त्वाचा हेतु, तो त्यानं सिद्धीस नेला. मोठालीं कृत्यं सुखानं होत नाहींत. त्यांनां शतशः अडचणी येतात; परंतु त्यांनां भिऊन हातपय गाळून बसणं हें दुर्बलतेचं लक्षण आहे; व अडचणींतून धिमेपणानं पार पडण्याचं सामर्थ्य असणं हें फार हितावह आहे, हें मुलांनां समजलं पाहिजे.

" बुद्ध हा थोर कुलांत जन्मला होता. त्याला कोणत्याहि गोष्टीची कमतरता नव्हती. त्याच्या वेळीं धर्माच्या बाबतींत फार बखेडा होता. त्या वेळीं लोकांत धर्मसंबंधीं जीं मतं प्रचलित होतीं त्यांहून त्याचीं मतं फार भिन्न होतीं. अशी स्थिति असतांहि तो लोकापवादाला भ्याला नाहीं; इतकंच नाहीं, तर त्यानं वेडगळ मतांचा व राज्यपदाचा धिक्कार केला, व आपणास जें खरं वाटलं त्याप्रमाणं चालण्याचा व लोकांनां उपदेश करण्याचा क्रम चालविला. हें लहानसहान मानसिकधैर्य नव्हे! अशा प्रकारच्या धैर्याची आपल्या लोकांत मोठी उणीव आहे. ही उणीव कायम राहील, तर सुधारणेस धक्का बसेल. अंगीं मानसिक धैर्य असणं हा गुण जरूर आहे.

" अलीकडे देशाभिमान ह्या शब्दाचा ध्वनि अनेक ठिकाणीं व अनेक प्रसंगीं ऐकूं येतो. जो उठला तो ह्मणतो 'मी देशाभिमानी!' देशस्थिति आहे तरी काय, याविषयीं दिखील ज्यांनीं कधीं विचार केला नाहीं, तेसुद्धां आपणांस देशाभिमानी ह्मणवून घेण्यास इच्छितात! परंतु या देशाच्या तीस कोटि प्रजेपैकीं पुष्कळ खरे देशाभिमानी आहेत किंवा नाहींत, याविषयीं संशय आहे. लोकांनां प्रिय तेवढेंच नेहमीं बोलणारा, हा कांहीं खरा देशाभिमानी नव्हे! कोत्या समजुती अथवा वेडगळ आचार व विचार घालविण्याविषयीं यत्न न करितां डोळे मिटून त्याप्रमाणं आचरण करणारा, अथवा आपले आचार-विचार मात्र चांगले व दुसऱ्याचे वाईट असं समजणारा, अथवा दुसऱ्याचे तेवढे चांगले व आपले सर्व वाईट असं ह्मणणारा, किंवा नेहमीं सरकाराविरुद्ध

बोलणारा, हा खरा देशाभिमानी नव्हे! असले देशाभिमानी शतशः सांपडतात. असल्या लोकांपासून देशाचं खरं हित होईल असं मानणं चूक आहे. आपणास भेसळ नाणं नको आहे, खरं नाणं पाहिजे आहे. आपणाला पोकळ अभिमानी नको आहेत! आह्मांला बरं वाटावं ह्मणून आमच्या तोंडापुरतं गोड बोलणारे लोक आह्मांला नको आहेत. देशाभिमानाचं मिष करून आपलं हित साधणारे स्वकार्यसाधु आपणास नको आहेत. ब्राह्मण व इतर ज्ञाति, हिंदु व मुसलमान, हिंदु व पार्शी ह्या परस्परांमध्यें द्वेष उत्पन्न करणारे आपणास नकोत. देशाभिमान हा गुण फुकट येत नाहीं. ज्याला देशाभिमानी ह्मणावयाचं त्याला देशाची स्थिति होती काय व आहे काय, हें समजून त्याचं खरं हित कोणत्या उपायांनीं होईल, हें समजलं पाहिजे. इतकंच नाहीं, तर, निरपेक्ष बुद्धीनं ते उपाय करण्यास तो प्रवृत्त असला पाहिजे; मग ते उपाय लोकांना प्रिय असोत अथवा अप्रिय असोत; ते उपाय सरकाराला रुचोत अथवा न रुचोत; ते उपाय करण्यासाठीं पदराला खार लागला तरी, अथवा देह झिजविण्याचं कारण पडलं तरी, अथवा प्रसंगवशात् हाल अपेष्टा सोसाव्या लागल्या! तरी त्याची तयारी असली पाहिजे. आपल्या देशांत चांगल्या गोष्टी कोणत्या व वाईट कोणत्या, सत्य कोणतं व असत्य कोणतं यांमधें निवड करून चांगल्याचं व सत्याचं दृढतर अवलंबन करणारा व आपल्या देशांतील चांगल्या गोष्टींविषयीं व सत्याविषयीं अभिमान बाळगून व त्यांचं रक्षण करून जें जें हितकर अथवा सत्य दुसऱ्या ठिकाणीं असेल त्याचा स्वीकार करणारा तो असला पाहिजे. ज्या ज्या समजुती पोरकट आहेत, व ज्या ज्या चाली अपायकारक आहेत त्या घालविण्याचा यत्न करून सुधारणा करणारा तो असला पाहिजे. तात्पर्य जें जें अहितकर व असत्य, त्याचा त्याग करणारा व जें जें हितकर व सत्य त्याचंच अवलंबन करणारा, हा खरा देशाभिमानी आहे असं समजावं. सत्य ही चीज आपल्याच देशांत आहे व दुसऱ्या देशांत नाहीं ही समजूत, अथवा ती आपल्या देशांत नाहीं व दुसऱ्या देशांत मात्र आहे ही समजूत चुकीची आहे. ही गोष्ट मनांत न आणितां व सत्ताधीशांस गोड वाटावं ह्मणून आपल्या सर्व गोष्टींचा उपहास करणारे, अथवा परकीयांपासून ग्रहण करण्यासारख्या पुष्कळ गोष्टी असतां केवळ लोकप्रियता संपादन करण्याच्या हेतूनं ह्या गोष्टींचा उपहास करणारे खरे देशाभिमानी नव्हेत. हे देशाचे हितकर्ते नसून देशाचं नुकसान करणारे आहेत

असं समजावं! वरील गुण ज्यांमधें आहेत तेच देशाभिमानी या नांवास पात्र आहेत. आणि असे देशाभिमानी थोडे सांपडतात. असले देशाभिमानी पूज्य आहेत असं समजावं. यांपैकीं इटलींतील प्रसिद्ध देशाभिमानी ग्यारिबाल्डी हा एक होय. स्वदेशांत अधिकाऱ्यांचा छळ होऊन त्याला स्वदेशत्याग करावा लागला; आप्त व इष्टमित्र ह्यांनां सोडून दूर जावं लागलं; तिथेंहि शत्रूपासून त्रास होऊं लागला; खाण्यापिण्याची पंचाईत पडूं लागली; प्रिय पत्नी निवर्तली. तात्पर्य, मनुष्यावर जे जे प्रसंग येऊन गुदरतात ते ते प्रसंग त्याच्यावर येऊन गुदरले; तथापि, धैर्य खचूं न देतां योग्य प्रसंग पाहून तो देशहिताकरितां आपला देह अर्पण करण्यास तयार झाला. ग्यारिबाल्डीच्या त्या कृत्याबद्दल लोकांनीं त्याला नांवं ठेविलीं, परंतु त्याकडे लक्ष्य न देतां त्यानं देशसेवा केली, व संपत्ति मिळवून अथवा मान मिळवून स्वकल्याण करण्याचे जरी त्याला अनेक प्रसंग आले, तरी त्यांपासून तो अलिप्त राहिला. असले पुरुष विरळा सांपडतात. असले पुरुष ज्या देशांत जन्मतात तो देश धन्य; असले पुरुष ज्या माउलीच्या उदरीं जन्म घेतात ती माउली धन्य; अथवा ज्या स्त्रियांस असले पति प्राप्त होतात त्या स्त्रिया धन्य होत! असल्या पुरुषांचं चरित्र मुलांनीं वाचणं व तें सतत आपल्या डोळ्यांपुढं ठेवणं हितकर नाहीं काय? त्यांची तसबीर डोळ्यांपुढं ठेवून त्यांच्या गुणांची आठवण होण्यास साधन असणं चांगलं नाहीं काय? ”

आनंदीबाई पुढें ह्मणाल्या “ह्या थोर पुरुषांच्या अंगांतील कोणते गुण मुलांनीं ग्रहण करावे, याविषयीं माझे विचार मीं आपल्याला कळविले. आतां द्वारकाबाईनीं जीं वचनं वाचलीं तीं डोळ्यांपुढं ठेवण्याचा हेतु काय असावा, हें समजून सांगण्याचं कारण नाहीं; तथापि, फक्त एकदोन वचनांविषयीं थोडंसं सांगत्यें. ‘नाहीं संतपण मिळत हें हाटीं, हिंडतां कपाटीं रानीं वनीं!’ असं साधु तुकारामांचं वचन आहे. त्यांतील तात्पर्य असं आहे, कीं, मोठेपणा हा विकत मिळत नाहीं; तो कुठं अरण्यांत जाऊन अथवा एकांतवासांत वसून मिळत नाहीं; तो नुसतं द्रव्य देऊन मिळत नाहीं; तो मनुष्याच्या अंगींच असावा लागतो. ज्याचं मन मोठं असून ज्याची कृतिहि तशीच आहे, तो मोठा असं समजावं. नाहीं तर, क्षणिकबुद्धीचे अथवा चंचलवृत्ति, आंत एक बाहेर एक, अधिकार व संपत्ति यांनीं उन्मत्त, तामसी, दुसऱ्याचं छिद्र तेवढं बारीक नजरेनं शोधून काढणारे

व स्वतः डोळ्यांवर कातडं ओढून झोंपा घेणारे व कांहीं एक न करणारे, असे लोकहि आपणांस मोठे ह्मणवून घेतात व मूर्ख लोक अशांसहि मोठे समजतात, हा केवढा प्रमाद आहे? या वेड्या लोकांच्या लक्ष्यांत ही गोष्ट येत नाहीं, कीं, ज्यांनां आपण मोठे समजून मान देतों, त्यांनां आपलीं मुलंहि मान देतात. खरोखर मोठे कोण, हलकट कोण, अथवा लुच्चे कोण ह्याविषयीं स्वतः निवड करून तें मुलांनां संभाषणाच्या द्वारं कळविणं चांगलं आहे. आतां द्वारकाबाईनीं जीं वचनं वाचलीं त्यांत 'न वारिणा शुध्यति चांतरात्मा' असं एक वचन आहे. या वचनांतील तत्त्व कितीजण लक्ष्यांत ठेवितात? स्नान केल्यानं अंग स्वच्छ होतं, मन शुद्ध होत नाहीं, ही गोष्ट लोकांनीं लक्ष्यांत ठेविली असती, तर ते ठिकठिकाणीं केवळ स्नान करण्यासाठीं जातेना! या बाबतींत लोकांची चमत्कारिक समजूत असल्यामुळं ते शेंकडों रुपये खर्च करित आहेत व मुलांनां तेंच वळण लावून देत आहेत. 'न जायेचि काशी न जाये गयेशी' असा समर्थांनीं जो उपदेश केला आहे, त्याचा हेतु काय आहे, हें ते लक्ष्यांत ठेवित नाहींत व देव जवळ असतां त्याला शोधण्यासाठीं लांब लांबचा प्रवास करतात, शेंकडों रुपये खर्च करतात, व देहास विनाकारण कष्ट देतात, हें आश्चर्य आहे. क्षेत्रीं जाऊन चित्तशुद्धि होते, हें मानणं असमंजसपणाचं आहे. चित्तशुद्धि होण्यास बाह्योपचार फारसे उपयोगी नाहींत. भागीरथी अथवा यमुना, कृष्णा अथवा गोदावरी, पुष्कर अथवा बिल्वतीर्थ, ह्यांत स्नान केलं ह्मणजे चित्तशुद्धि होत नाहीं. आत्मा हीच कोणी एक नदी, संयम हाच जिचा घाट, सत्य हेंच जिचं उदक, सच्छील हाच जिचा तट, दया हीच जिची लाट, त्या नदींत स्नान करित जा; दुसऱ्या नदींत स्नान केल्यानं अंतरात्मा शुद्ध होत नाहीं; हा जो उपदेश वरील श्लोकांत केला आहे तोच उपदेश मुलांनां करणं, व त्याप्रमाणं त्यांच्याकडून आचरण करविणं योग्य आहे. खरं तत्त्व लक्ष्यांत न ठेवून उगीच भलभलते विचार त्यांच्या डोक्यांत भरवून दिले, तर खरी शुद्धता प्राप्त न होतां त्यांचं नुकसान मात्र होण्याची भीति आहे."

घरांतील सर्व व्यवस्था दाखवून झाल्यावर आनंदीबाई खालीं गेल्या. त्यांच्या मागून सर्वजणें आलीं. रमाबाई व त्यांच्या मुली ह्यांनां कांहीं गोष्टींचें मोठें कौतुक वाटलें. त्या यशोदाबाईच्या घरीं थोडे दिवस राहून नंतर मुंबईस परत गेल्या. मुलींनीं आपल्या बापाला सर्व हकीगत सांगितली. रमाबाईनां ज्या ज्या

गोष्टी पसंत वाटल्या त्या त्या त्यांनीं आपल्या नवऱ्यास कळविल्या. त्यावरून आपल्या मुलींनां जसें शिक्षण मिळावें तसें मिळालें नाहीं, असें त्याला वाटूं लागलें; परंतु हा विचार जितका लवकर त्याच्या मनांत आला तितकाच त्याचा विसरहि लवकर पडला:! चंचलवृत्तीच्या लोकांची स्थिति अशीच असते.

आनंदीबाईंचा शिक्षणक्रम पूर्ववत् चालू होता. यशोदाबाईच्या वर्तनांत आतां पहिल्यापेक्षां पुष्कळच बदल झाला होता. जरुरीच्या कारणाशिवाय त्या उगीच बाहेर जात नसत. मुलांकडे आतां त्यांचें लक्ष्य जास्त असे. त्यांच्यावर त्या अधिक माया करूं लागल्या व त्यामुळें मुलांचेंही आईवर विशेष प्रेम दिसून येऊं लागलें. मुलांची आपणावर ममता आहे, हें पाहून यशोदाबाईस विशेष सुख वाटूं लागलें व आपण आतांपर्यंत मूर्ख मैत्रिणींच्या नादीं न लागतां आनंदीबाईसारख्या सुशील स्त्रियांच्या सहवासास असतों, तर आपली स्थिति हल्लींच्यापेक्षां निराळी असती, अशीहि त्यांच्या मनाची खात्री झाली. आपणास आनंदीबाईंचा सहवास घडला व त्यांची आपली गांठ पडली हें आपलें भाग्यच होय, आणि ह्मणूनच हे दिवस आज आपल्या दृष्टीस पडले; परंतु सर्वांनां आनंदीबाईसारख्या आस्थेवाईक व सुशिक्षित स्त्रियांचा सहवास कोठून घडणार? त्यांच्यासारख्या स्त्रिया निपजण्यास बराच काल लोटला पाहिजे. चांगला समागम नसल्यामुळें ज्याप्रमाणें आपली स्थिति होती, त्याप्रमाणें पुष्कळ स्त्रियांची झाली असेल, हा विचार मनांत येऊन त्यांनां आपल्या मैत्रिणींच्या आचरणाविषयीं फार वाईट वाटलें; व आनंदीबाईंच्या सहवासानें आपण लवकरच शुद्धीवर आलों व आपलें कर्तव्य काय आहे व आपणावर जबाबदारी काय आहे हें आपणास कळूं लागलें, याबद्दल त्यांनां समाधान वाटलें. आपण व्यर्थ कालक्षेप करूं, चैनींत दिवस घालवूं, वेड्या समजुतींप्रमाणें चालूं, अथवा असन्मार्गानें जाऊं, तर त्यामुळें आपलीच हानि होईल असें नाहीं, तर आपलीं मुलेंहि आपलें अनुकरण करतील व त्या योगानें त्यांचीहि हानि होईल, ही गोष्ट त्यांच्या मनांत चांगली बिंबली होती. हल्लीं आपणामध्यें जो बदल झाला आहे त्याला कारण आनंदीबाई आहेत, असें समजून त्या आनंदीबाईंचे उपकार मानूं लागल्या व आनंदीबाईंचें अनुकरण करण्याचा त्यांनीं निश्चय केला. आपण आनंदीबाई बनूं अशी जरी आतां आशा नाहीं, तरी त्यांनीं जो मार्ग दाखविला आहे त्या मार्गानें आपण गेलों असतां आपणास कांहीं गोष्टी तरी करितां येण्यासारख्या आहेत,

ह्यांत संशय नाहीं. इत्यादि विचार वरचेवर यशोदाबाईंच्या मनांत घोळूं लागले व त्या प्रपंचासंबंधीं सर्व कामांत विशेष दक्षतेनें व मुलांविषयीं विशेष आस्थेनें वागूं लागल्या.

यशोदाबाईंच्या स्थितींत अशा प्रकारें बदल झालेला पाहून आनंदीबाईसहि समाधान वाटलें. आपण राहिल्यासारखें आपणापासून यशोदाबाईस थोडा तरी उपयोग झाला, हें पाहून त्यांनां आनंद झाला. पूर्वीप्रमाणें मुलांच्या संगोपनाचा सर्व भार आपणावर न पडतां, यशोदाबाईंची आपणास सोडणूक होऊं लागली आहे, व यशोदाबाईंचें लक्ष्य प्रपंच व परमार्थ ह्या दोहोंतहि विशेष लागत चाललें आहे, ही आनंदाची गोष्ट आहे; यशोदाबाईंचा ह्राच क्रम सदोदित चालेल, तर मुलांचें विशेष हित होईल, असें त्या स्वतःशीं ह्मणूं लागल्या.

अशा रीतीनें कांहीं दिवस लोटले. एके दिवशीं आनंदीबाई निजल्या असतां आपला मुलगा व आपला पति हे जिवंत असून त्यांची आपली भेट झाली, आणि पति व आपण अशीं ओंकारेश्वर येथील नर्मदेचा रमणीय देखावा पाहत पाहत विश्रांतीकरितां बसलों आहों, व मुलगा पुरुषोत्तम हा त्या देखाव्याचें चित्र काढित आहे, असें त्यांनां स्वप्न पडलें. डोंगर फोडून नर्मदा मधून वाहत चालली आहे; हजारों भाविकलोक नदींत स्नान करित आहेत; थवेचे थवे, ब्रह्मपुरींत, विष्णुपुरींत व अमलेश्वराच्या आसपास उतरले आहेत; कित्येक 'नर्मदा माताकी जय' असा घोष करित येत आहेत; कित्येक होडींत बसून ओंकारेश्वराच्या दर्शनासाठीं चालले आहेत; कित्येक नदींतील माशांपुढें दाणे टाकून मौज पहात आहेत. हा सारा देखावा पाहून आनंदीबाई स्वप्नांत आनंदाच्या भरांत होत्या. इतक्यांत पुरुषोत्तमाचा पाय धोंड्यावरून निसरला व तो नदींत पडेल कीं काय, अशी त्यांनां भीति वाटली, त्या सरशी त्या एकदम दचकून जाग्या झाल्या; परंतु पाहतात तों काय! पुरुषोत्तम, आपला पति, नर्मदा, ब्रह्मपुरी अथवा शिवपुरी यांपैकीं कांहींच नसून आपण आपल्या खोलींत आहों, व आपणास स्वप्न पडलें, असें त्यांनां समजून आलें. या वेळीं त्यांनां फारच वाईट वाटलें, व मन अत्यंत उदासीन झालें. नंतर कांहीं केल्या त्यांनां झोंप ह्मणून येईना. स्वप्नावर त्यांचा विश्वास नसे; परंतु डोळ्यांपुढें पुरुषोत्तम मात्र दिसूं लागला. पहिल्यानें त्यांनां थोडेंसें भय वाटलें, ह्मणून दिवा लावून त्या वाचित बसल्या. परंतु वाचनहि गोड लागेना. मनांत नाना-

प्रकारच्या कल्पना येऊं लागल्या. आपला पति व पुत्र यांचा आपला वियोग होऊन तीन वर्षें झालीं. परंतु त्यांचा अद्याप पत्ता नाहीं; ही गोष्ट मनांत येऊन त्यांनां फारच दुःख झालें. ते जिवंत असतील का ? त्यांची व आपली पुनः भेट होईल का ? किंवा आपणास जन्मभर त्यांच्याशिवाय दुसऱ्याच्या घरीं दिवस काढावे लागतील ? आतां आपण राहावें किंवा त्यांचा तपास करण्यासाठीं कोठें जावें ? बरें, पण तपास तरी कोठें करावा ? जावें तरी कोठें ? यशोदाबाईपाशीं गोष्ट कशी काढावी ? त्या मुळींच जाऊं देणार नाहींत ! बरें येथेंच नेहमीं रहावें, तर तें आपल्या मनाला गोड वाटणार नाहीं. आतां यशोदाबाई आपल्या मुलांची काळजी घेऊं लागल्या आहेत, तेव्हां आपलें कारण दिवसेंदिवस कमी पडणार. शिवाय, यशोदाबाईनीं आपला पसारा आटोपून धरणें व मुलांची व्यवस्था ठेवणें, हें त्यांनां व त्यांच्या मुलांनांहि हितावह आहे. इतके दिवस मुलांसंबंधीं सर्व जबाबदारी माझ्यावर होती. आतां यशोदाबाईस कळूं लागलें आहे; त्यांची स्थिति सुधरली आहे; ती आई आहे, तेव्हां तिनेंच सर्व व्यवस्था आतां करावी हें चांगलें, असें आनंदीबाईस वाटूं लागलें. आज आपल्या मनाची अशी स्थिति कां होत आहे, हें त्यांनां समजेना. हें पुस्तक घे तें पुस्तक घे, हें उचल तें टाक, अशा रीतीनें मन शांत करण्यासाठीं त्यांनीं बराच यत्न केला; परंतु कांहीं केल्यानें त्याचें मन स्वस्थ ह्मणून होईना. शेवटीं त्यांनीं दिवा विझाविला व अंथरुणावर पडून झोंप आणण्याचा यत्न केला; परंतु झोंप आली नाहीं व कोणत्याहि उपायांनीं चैन पडलें नाहीं. त्या तशाच अंथरुणावर पडून राहिल्या; परंतु, पुढें काय करावें, याबद्दल निश्चय होईना. आपल्या जाण्यानें यशोदाबाईस तर वाईट वाटेलच; परंतु मुलांनां देखील फार वाईट वाटेल व आपण एकाएकीं जाण्याचा बेत केला याबद्दल यशोदाबाईच्या मनांत निरनिराळ्या कल्पना येऊन त्या आपणांस जाऊं देणार नाहींत. तेव्हां त्यांच्यापाशीं जाण्याची गोष्ट सवडीप्रमाणेंच काढावी, हें बरें. त्यांच्या मनांत हे विचार घोळत आहेत, तों त्यांची उठण्याची वेळ झाली, ह्मणून त्या उठून नित्याच्या उद्योगास लागल्या. परंतु आज त्यांनां उद्योग सुचेना.

आनंदीबाईच्या मनाची स्थिति नीट नाहीं, ही गोष्ट प्रथम यशोदाबाईच्या अथवा मुलांच्या लक्ष्यांत आली नाहीं; परंतु दोनतीन दिवसांनीं काशी

आईस ह्मणाली "आई, मावशीबाईंना चैन पडत नाहीं का? जेव्हां जेव्हां त्यांच्या खोलींत जावं, तेव्हां तेव्हां त्या आपल्या विचारांत असतात; त्यांचं तोंड उतरल्यासारखं दिसत आहे; त्यांना कांहीं तरी होत असावं, असं मला वाटतं."

यशोदाबाईनांहि अशीच थोडीशी शंका येऊन चुकली होती व त्या आनंदीबाईस विचारणारहि होत्या; काशीनें गोष्ट काढतांच त्या आनंदीबाईकडे लागलीच गेल्या व कांहीं वेळ इकडल्या तिकडल्या विषयांवर भाषण केल्यानंतर आनंदीबाईस ह्मणाल्या "तुह्माला अलीकडे बरं वाटत नाहीं असं दिसतं."

त्यावर आनंदीबाईनीं उत्तर केलें "मला कांहीं आजार आहे, असं मला वाटत नाहीं."

यशोदाबाईनीं विचारलं "तर मग तुमचं मन स्वस्थ नसावं असं मला वाटतं."

हें ऐकून आनंदीबाई स्वस्थ बसल्या. काय सांगावें, याविषयीं त्यांनां मोठा विचार पडला. शेवटीं त्या ह्मणाल्या "यशोदाबाई, तुह्माला काय सांगूं! मला रोगराई कांहीं एक नाहीं; परंतु दोनतीन दिवसांपासून मनाला स्वस्थता वाटत नाहीं."

"तुह्माला कुणी बोललं नाहीं ना? घरांत तुमचा कुणीं अपमान केला नाहीं ना? मुलांनीं तुमची अवज्ञा तर नाहीं ना केली? मजकडून नकळत कांहीं चूक झाली कीं काय?"

"छे, छे, असं कांहीं एक नाहीं!"

"तर मग, तुह्माला कोठली दुःखकारक वार्ता समजली आहे का?"

"तसाहि प्रकार नाहीं."

"मग ती गोष्ट मला सांगण्यासारखी नाहीं का!"

आनंदीबाई ह्मणाल्या "असं कसं होईल? तुह्मी मजपासून कोणतीहि गोष्ट गुप्त ठेवित नाहीं, तर मी एखादी गोष्ट कशी छपवून ठेवीन? असं करणं मूर्खपणाचं वर्तन नाहीं का? असं वर्तन मजकडून कसं होईल? अलीकडे माझ्या मनांत कांहीं विचार येऊन मन फार अस्वस्थ झालं आहे. हे विचार पूर्वींहि येत होते; परंतु दोनतीन दिवसांपासून अगदीं चैन पडत नाहीं. तुह्माला सांगितलं असतां वाईट वाटेल, ह्मणून तुमच्यापाशीं गोष्ट काढावी किंवा नाहीं, याविषयीं मी विचारांत होत्यें."

"अशी गोष्ट कोणती?"

" यशोदाबाई, मी तुमच्या घरीं कोणत्या स्थितींत आल्यें, हें तुह्माला माहीतच आहे. आज तीन वर्षें झालीं, घरच्यांची व मुलाची काय स्थिति आहे, हें मला मुळींच समजलं नाहीं. त्यांचा शोध लागत नाहीं, यामुळं मन स्वस्थ नाहीं. आज शोध लागेल, उद्यां लागेल, या आशेवर मीं इतके दिवस काढिले. यशोदाबाई ! माझं काळीज पोळून करपलं आहेहो ! मी बाह्यात्कारीं आनंद दाखवित्यें; मुलं जवळ असलीं ह्मणजे माझा वेळ कसा तरी जातो; परंतु एकटी असल्यें ह्मणजे नानाप्रकारचे विचार मनांत येतात व एकांतवास दुःसह होतो. आतां मुलाचा व त्यांचा तपास करण्यासाठीं आपणच जावं असं मला वाटत आहे. "

हें ऐकतांच यशोदाबाईस वाटलें, कीं, ज्या अर्थीं आनंदीबाईच्या मनाची अशी स्थिति झाली आहे, त्या अर्थीं त्या बहुशा लवकरच जातील. हा विचार मनांत येऊन त्यांनां धसका बसल्यासारखें झालें. आनंदीबाईच्या जाण्यानें आपला मोठा आधार नाहींसा होईल, व मग सर्व भार आपणावर पडेल, मग आपलें कसें होईल या विचारांत त्या आहेत, तोंच आनंदीबाई ह्मणाल्या " यशोदाबाई, तुह्मी कांहीं विचारांत आहां, असं दिसतं. "

यशोदाबाईनीं उत्तर केलें " विचार दुसरा कशाचा असणार? तुह्मीं जाण्याचा विचार मनांत आणिला हें मुलांनां समजलं, तर त्यांनां चैन पडणार नाहीं. तुमच्याप्रमाणं मजकडून त्यांची व्यवस्था होईल, असं मला वाटत नाहीं. तुह्मी होतां, ह्मणून मला कोणत्याहि गोष्टीची काळजी वाटत नव्हती. माझ्या घरीं कांहीं झालं असतां पुष्कळ मैत्रिणी जमा होतील; माझ्या तोंडापुरतं चांगलं ह्मणण्यास पुष्कळ निघतील; परंतु मजविषयीं खरी कळकळ बाळगणारी व माझं खरं हित सांगणारी तुमच्यासारखी मिळणं कठीण आहे ! तुह्मी माझ्या घरीं येऊन राहिलां, यामुळं मी वेळेवर शुद्धीवर आल्यें. तुह्मी आलां नसतां, तर मी लोकांच्या नादीं लागून पैसा घालवून बसल्यें असत्यें व कदाचित् मला व मुलांनां भीक मागण्याचा प्रसंग आला असता. हा प्रसंग तुमच्या योगानं टळला, असं मला वाटतं. अलीकडे मुलांपासून मला फक्त आनंद होत आहे इतकंच नाहीं, तर त्यांच्यापासून करमणूक व उपयोगहि होत आहे. हिशेबठिशेब ठेवण्याचे वगैरे हरएक गृहकृत्यांत काशीपासून मला बराच उपयोग होत आहे. बाळ्या पूर्वीं मनस्वी हूड व तिरसट होता, तो आतां पुष्कळ निवळला आहे.

माझी मर्जी संपादन करणं व जी गोष्ट मला अप्रिय आहे ती न करणं हें आपलं कर्तव्य आहे, असं त्याला समजूं लागलं आहे. हें सर्व तुमच्या श्रमांचं फल आहे. तुह्माला जाऊं द्यावं, तर माझं कसं होईल, व जाऊं नको ह्मणावं तर तेंहि गैर दिसेल, ह्मणून काय उत्तर द्यावं या विचारांत मी आहें."

आनंदीबाई ह्मणाल्या "यशोदाबाई, मीं काय केलं असेल तें असो, त्याविषयीं आतां कांहीं बोलण्याचं कारण नाहीं. ज्याप्रमाणं तुह्माला वाईट वाटत आहे त्याप्रमाणंच मलाहि वाटत आहे; परंतु ज्याला मीं जन्म दिला त्या मुलाचा, व ज्यांनीं मला शिक्षण दिलं व सर्व प्रकारं माझा सांभाळ केला त्यांचा शोध करण्यासाठीं न जाणं, हें मनाला दुःख देण्यास कारण नाहीं का ? बरं जावं, तर ज्यांनां आपण पोटच्या पोरांप्रमाणं समजून शिक्षण दिलं, त्यांनां व प्रसंगीं जी आपल्या उपयोगास आली तिच्या ऋणांतून आपण मुक्त न होतां तिला सोडून जावं लागत आहे, ह्मणून माझं मन द्विधा होतं. एकटी बसल्यें, ह्मणजे पुरुषोत्तमाकडे मन धाव घेतं, व मुलं दृष्टीस पडलीं ह्मणजे त्यांच्याकडे मन ओढवतं, अशी सध्या माझी चमत्कारिक स्थिति झाली आहे; परंतु, पुनः विचार मनांत येतो, कीं, तुमच्या इथं तरी किती दिवस रहावं.तुह्माला मी नकोशी नाहीं, हें खरं आहे; परंतु माझा मीं विचार करणं योग्य आहे. माझं कारण पराकाष्ठा वर्षभर किंवा दोन वर्षं आहे; परंतु इतके दिवस आतां माझ्यानं काढवतील, असं मला वाटत नाहीं.मुलं सज्ञान होत चाललीं आहेत,व तुमचं हिताहित तुह्माला कळूं लागलं आहे. एकटीवर भार पडला असं वाटून तुह्माला प्रथम अवघड वाटेल; परंतु संवयीच्या योगानं यांत विशेष कांहीं नाहीं असं दिसून येईल. मुलांच्या संगोपनाचं काम तुमचं तुह्मीं करणं हेंच योग्य आहे."

यशोदाबाई ह्मणाल्या "तुह्माला काय उत्तर द्यावं,हें मला कांहीं सुचत नाहीं. तथापि, तुमच्या मुलाविषयीं व तुमच्या पतीविषयीं आणखी शोध करून पाहूं व नंतर तुह्माला काय करायचं असेल तें करा, हें मला बरं वाटतं."

हें ऐकून हो ह्मणणें आनंदीबाईस भाग पडलें. आपण इतके दिवस राहिलों व थोड्यासाठीं यशोदाबाईंचें मन मोडणें हें योग्य नाहीं, असें त्यांनीं ठरविलें. तथापि आतां त्यांचें सारें लक्ष्य मुलाकडे व पतीकडे लागलें होतें.

यशोदाबाईंनीं विनायकराव डाक्तर यांनां सांगून अनेक ठिकाणीं शोध करविला. महिना झाला, दोन महिने झाले, चार महिने झाले, तथापि कांहींच शोध

लागेना. यशोदाबाई फार खिन्न झाल्या. शोध लागत नाहीं, हें आनंदीबाईस सांगण्याचें त्यांच्या जिवावर आलें. त्यांच्या मनाची अशी स्थिति असतां काय करावें हें त्यांनां सुचेना. कांहीं दिवस लोटल्यावर एके दिवशीं विनायकराव अमेरिकेंतील एक वर्तमानपत्र वाचित असतां जनार्दनपंत हे हिंदुस्थानांतील एतद्देशीय संस्थानें या विषयावर, व त्यांचे चिरंजीव फरदापूरचीं लेणीं या विषयावर व्याख्यान देणार आहेत, अशी जाहिरात त्यांच्या वाचण्यांत आली. प्रथम त्यांनां त्याचें विशेष वाटलें नाहीं. बाप व मुलगा असे दोघे अमेरिकेंत कोण गेले असावेत, याविषयीं बराच वेळ त्यांनीं विचार केला; परंतु त्यांनां असें वाचल्याचें व ऐकल्याचें स्मरलें नाहीं. पुढील आठवड्यांत या व्याख्यानांचा गोषवारा त्यांनीं वाचला. तेव्हां त्यांनां वाटूं लागलें, कीं, ज्यांच्या शोधांत यशोदाबाई आहेत, ते तर हे नसतील? असें ह्मणून त्यांनीं तो गोषवारा पुनःपुनः वाचिला, व त्या वेळेस त्यांनां वाटावयास लागलें, कीं, हे तेच असावेत. तें वर्तमानपत्र घेऊन ते लागलीच यशोदाबाईकडे आले. यशोदाबाई यावेळीं आनंदीबाईच्या खोलींत होत्या. विनायकराव आल्याचें वर्तमान समजतांच लागलीच त्या खालीं आल्या. विनायकरावांनीं सांगितलेला मजकूर ऐकून प्रथम त्यांनां फार आनंद झाला; परंतु पुनः कांहीं शंका आली. आनंदीबाईस खुद्द विचारल्याशिवाय या शंकेचें निवारण व्हावयाचें नाहीं असें समजून त्या उदास झाल्या. कारण, चांगला शोध लागल्याशिवाय गोष्ट काढून आनंदीबाईस त्रास द्यावयाचा नाहीं, असा त्यांचा हेतु होता; परंतु आनंदीबाईस विचारल्याशिवाय गत्यंतरच नाहीं, असें पाहून त्या व विनायकराव मिळून आनंदीबाईच्या खोलींत गेलीं. आनंदीबाई या वेळीं भगवद्गीतेवरील टीका वाचित बसल्या होत्या. यशोदाबाई व विनायकराव आलेलीं पाहून त्यांनीं पुस्तक एकीकडे ठेविलें. विनायकरावांच्या येण्याचें कारण न समजून त्यांनां किंचित् आश्चर्य वाटलें. त्यांनीं यशोदाबाईस विचारिलें "आज आपल्या इथं कुणी आजारी आहे का? आज डाक्तरसाहेब या वेळीं इथं कसे आले?"

हें ऐकून विनायकराव ह्मणाले "मी आज कोणाची प्रकृति पाहण्यासाठीं आलों नाहीं. मला तुह्माला कांहीं माहिती विचारायची आहे, ह्मणून मुद्दाम आलों आहें."

विनायकरावांच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच आनंदीबाई स्वस्थ बसल्या. त्यांच्या मनांत भलभलते विचार येऊं लागले. विनायकराव जी माहिती विचारणार, ती आपल्या मुलाच्यासंबंधानें तर नसेल ना? परंतु हें कसें होईल? त्यांनां या माहितीचें या वेळीं काय कारण आहे? अशा विचारांत त्या असतां, विनायकरावांनीं त्यांनां सर्व माहिती विचारली. आनंदीबाईनीं ती इत्थंभूत सांगितली. तेव्हां त्यांच्या मनाची खात्री झाली, कीं, यशोदाबाई आज चार महिने ज्यांचा तपास करित आहेत, ते जिवंत असून अमेरिकेंत आहेत. असें समजून त्यांनीं खिशांतून वर्तमानपत्र काढिलें व तें आनंदीबाईपुढें ठेविलें. आनंदीबाईनीं तें हातांत घेतलें. त्यांच्या हाताला कंप सुटला, छातींत धडधड करूं लागलें, तोंडावरचा तजेला नाहींसा झाला, व सर्वांग घामानें भिजून गेलें. हें पत्र आपणास काय सांगणार? विनायकरावांनीं खोदखोदून प्रश्न केले, त्यावरून त्यांनां मुलाविषयीं कांहीं तरी विलक्षण तर कळलें नसेल ना? परंतु त्यांनां तसें कांहीं कळलें असेलसें त्यांच्या मुद्रेवरून तर दिसत नाहीं. मग माझ्या मनाला हुरहुर कां वाटते? बरें, चांगलें वर्तमान असतें, तर तें ते अगोदर बोलून दाखविते; पत्र हातीं देण्याचें त्यांनां कारण नव्हतें. असे विचार येऊन आनंदीबाईचें मन गोंधळून गेलें व डोळ्यांपुढें अंधेरी आली. त्यांच्या मनांत काय चाललें होतें, हें यशोदाबाई व विनायकराव ह्यांनां माहीत नव्हतें; तथापि आनंदीबाई खिन्न झाल्या आहेत हें त्यांच्या लक्ष्यांत आल्याशिवाय राहिलें नाहीं दोघांपैकीं कोणीहि कांहींच बोललें नाहीं. व्याख्यानाचा गोषवारा वाचून आनंदीबाईच्या तोंडावर टवटवी दिसूं लागली; परंतु पुनः त्यांनां शंका येऊन त्या निस्तेज दिसूं लागल्या. आपलें एवढें भाग्य कोठचें? आपण स्वप्न तर पहात नाहीं ना? आपण जागया आहों, तेव्हां अशी कल्पना मनांत आणण्याचें कारण नाहीं. आपण जें वाचिलें तें खरें असेल, तर आपला पति व आपला मुलगा हे जिवंत आहेत यांत शंका नाहीं. असें वाटून त्यांनां फार आनंद झाला. परंतु त्यांची व आपली गांठ कशी पडावी? बोलूनचालून आपण बायको माणूस, आपल्याच्यानें इतका लांबचा प्रवास कसा होईल? बरें आपण गेलों, तर ते एके ठिकाणीं राहतील, असें थोडेंच आहे. एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं ते फिरत असतील. ज्याप्रमाणें त्यांच्याविषयीं शोध करून आपण दमलों व शेवटीं निराश झालों, त्याप्रमाणें त्यांचीहि स्थिति झाली असेल. त्यांची भेट घेण्याचें

मनांत आणिलें, तरी महिना दीड महिना पाहिजे. दिवसेंदिवस आपली प्रकृति क्षीण होत चालली आहे; तेव्हां समुद्र लागून जास्ती क्षीण होईल, व आपला हेतु सिद्धीस जाईलच याचा काय भरंवसा! अशी शंका मनांत येऊन त्यांनां फार वाईट वाटलें. त्यांनीं पुनः तें पत्र वाचिलें, तेव्हां सर्व खुणा पटल्या व त्यांच्या मनाची खात्री झाली. फरदापूर येथील लेणीं पाहणें झाल्यावर पुरुषोत्तमानें जे उद्गार काढिले होते त्यांची, व एतद्देशीय संस्थानांच्या संबंधानें जो अभिप्राय आपल्या पतीचा होता त्याची त्यांनां आठवण झाली. "या संस्थानांत ज्यांनीं पूर्वीं कारभार पाहिला, अथवा हल्लीं जे पाहतात त्यांपैकीं बहुतेक आपणांस मुत्सद्दी ह्मणवून घेतात; परंतु ह्यांनीं मुत्सद्दी या नांवांस शोभण्यासारखें काय केलें आहे? दहावीस शाळा घातल्या, पांचसहा कोडतें स्थापन केलीं, तीनचार लायब्ऱ्या स्थापन केल्या, पांचसहा इमारती बांधल्या व वार्षिक रिपोर्ट चांगला लिहिला, ह्मणजे मुत्सद्दी बनला, हें मानणें चूक आहे." हे उद्गार वाचून आपल्या पतीच्या उद्गारांची त्यांनां आठवण झाली व आपला पति व मुलगा हे अमेरिकेंत जिवंत आहेत व त्यांची स्थितिहि बरी आहे, हें समजून त्यांनां हुशारी वाटली. त्यांनीं तें पत्र एकीकडे ठेविलें व विनायकरावांनां ह्मटलें "डाक्तरसाहेब! तुमचे आभार मीं मघाशींच मानावयाचे असून आतां मानित्यें, याबद्दल मला क्षमा करा. माझ्या मनांत नाना प्रकारचे विचार येऊन मन अगदीं गोंधळून गेलं होतं. यशोदाबाईनीं चार महिने शोध लावण्याविषयीं उद्योग चालविला, याबद्दल त्यांची तर सर्वांशीं मी ऋणी आहेंच; परंतु तुह्मींहि त्यांनां मदत केली व ही आनंदाची खबर आणिली, याबद्दल तुमचेंहि मजवर फार उपकार आहेत."

विनायकराव ह्मणाले "तुह्मी माझे उपकार मानणार असाल तर खुशाल माना; त्या तुमच्या इच्छेआड येण्यास मी इच्छित नाहीं. मात्र एवढी गोष्ट खरी आहे, कीं, या बाबतींत मीं कांहीं एक केलेलें नाहीं, किंवा मला यत्किंचितहि श्रम पडलेले नाहींत. ज्यांच्याबद्दल तुह्मांला काळजी वाटत होती ते खुशाल आहेत हें ऐकून मला अत्यंत संतोष झाला आहे, व यशोदाबाईसहि त्याप्रमाणें झाला असेल."

यशोदाबाई ह्मणाल्या "डाक्तरसाहेब, मला संतोष किती झाला आहे हें माझं मीच जाणूं शकेन. आनंदीबाई पत्र वाचून स्तब्ध बसल्या, तेव्हां माझ्या जिवांत जीव

नव्हता; त्या काय ह्मणतात याकडे माझं लक्ष्य होतं. जेव्हां त्यांच्या तोंडावर हुशारी दिसली, तेव्हां मला जो आनंद झाला, तो सांगून सांगतां येण्यासारखा नाहीं !"

आनंदीबाई ह्मणाल्या "यशोदाबाई, तुह्माला माझ्याकरितां फार श्रम पडले, याबद्दल मला फार वाईट वाटतं."

" मला कांहीं श्रम पडले नाहींत. आतां ज्याप्रमाणं आह्मीं ही आनंदाची खबर ऐकिली, त्याप्रमाणं तुमची व तुमच्या माणसांची हरिसत्तेनं गांठ पडून तुह्मीं सर्वांनीं माझ्या इथं कांहीं दिवस रहावं व मग जावं, एवढीच माझी इच्छा आहे."

हे शब्द ऐकून आनंदीबाईंचे डोळे पाण्यानें भरून आले. असा योग ज्या दिवशीं घडून येईल तो सुदिन, असें समजून त्या स्वस्थ राहिल्या. पुढें विनायकराव आणि यशोदाबाई आपापल्या कामास निघून गेल्यावर आनंदीबाई एकट्याच खोलींत राहिल्या. त्या पुनःपुनः तें पत्र वाचीत व पुढें काय करावें याबद्दल मनाशीं विचार करीत. शेवटीं, यशोदाबाईंचा निरोप घेऊन अमेरिकेस जाण्याचा त्यांचा निश्चय कायम झाला. यापुढें आपणास फार दिवस वियोग सहन होणार नाहीं असें वाटून, व आपण करतों हें आपलें कर्तव्य होय असें समजून, त्यांनीं लांबचा प्रवास करण्याचा हिय्या केला व आपण जो चांगला निश्चय केला तो कदाचित् बदलेल, ह्मणून यशोदाबाईंपाशीं लागलीच ती गोष्ट काढण्याचा विचार ठरवून त्या लगेच खालीं आल्या. या वेळीं यशोदाबाई स्नान उरकून पूजा करण्यास लागल्या होत्या, ह्मणून त्यावेळीं त्यांनीं गोष्ट काढिली नाहीं. दुपारीं जेवण झाल्यावर योग्य संधि पाहून त्यांनीं आपला निश्चय त्यांनां कळविला. यशोदाबाईंनीं पुष्कळ प्रकारें सांगून पाहिलें, परंतु आनंदीबाईंनीं एकच गोष्ट सांगितली, कीं, " मीं सर्व गोष्टींचा विचार करून शेवटचा निश्चय केला आहे. आतां मला जाण्याविषयीं तुह्मीं परवानगी द्यावी, एवढंच पदर पसरून माझं मागणं आहे. माझ्याबरोबर जो ब्राह्मण आला होता तो येण्यास तयार आहे; खर्चापुरतं मजजवळ साधन आहे; कुठं कसं रहावयाचं व काय काय गोष्टी करावयाच्या हें मला माहित आहे; व ज्या परमेश्वरानं आज हा सुदिन दाखविला, तोच मला अडचणीच्या वेळीं साहाय्य करील, अशी माझी खात्री आहे. पुष्कळ ठिकाणीं प्रवास करण्याचे व अनेक अडचणी सोसण्याचे

प्रसंग मला आल्यामुळं तुझाला या प्रवासाचं जितकं भय वाटतं तितकं मला वाटत नाहीं. मला जें वाईट वाटत आहे, तें एवढंच कीं, मुलांच्या शिक्षणाचं काम अर्धवट सोडून मला जावं लागत आहे. तुमच्या मुलांनां तुह्मीं शिक्षण देणं हें कर्तव्य प्रथम तुमचं आहे व तुमच्या पश्चात् माझं आहे; परंतु ज्या अर्थीं तुह्मीं आतां काळजी घेऊं लागलां आहां, त्या अर्थीं मजवरची जबाबदारी कमी झाली आहे. या सर्व गोष्टी मनांत आणून माझा जाण्याचा विचार झाला आहे. "

आनंदीबाईचें हें निश्चयाचें भाषण ऐकून यशोदाबाईंचा इलाज चालला नाहीं. पति व मुलगा ह्यांच्यासंबंधानें आनंदीबाईच्या मनाची जी स्थिति झाली होती, त्या स्थितींत त्यांनां आपल्या येथें रहा ह्मणून ह्मणणें प्रशस्त नव्हतें; शिवाय आनंदीबाईनीं विचारपूर्वक जो संकल्प केला आहे, तो कालत्रयीं फिरावयाचा नाहीं हें सतत तीन वर्षांच्या सहवासानें यशोदाबाईस माहीत झालें होतें; ह्मणून त्या ह्मणाल्या " बरं तर, तुमची मर्जी ! "

आनंदीबाई लवकरच जाणार हें वर्तमान मुलांनां समजतांच त्यांनां फार वाईट वाटलें. बाळया ह्मणाला "आई, मावशीबाई आतां कधींच यायच्या नाहींत का ? तुझी हरकत नसेल, तर मी त्यांच्याबरोबर जातों. "

काशी ह्मणाली " आई, तूं त्यांनां रहा ह्मणून नाहीं का ह्मटलंस ? तूं जर त्यांनां आग्रह केला असतास, तर त्या राहिल्या असत्या. त्यांनां एकाएकीं भीड तुटत नाहीं. "

यशोदाबाईनीं सांगितलें " मीं जेवढी पराकाष्ठा होती तेवढी केली; आतां त्यांनां राहण्याविषयीं आग्रह करण्यांत अर्थ नाहीं. "

यावर बाळ्या ह्मणाला "मावशीबाई माझें खास ऐकतील. मीच त्यांच्याकडे जाऊन त्यांनां राहवून घेतों; माझें ह्मणणें त्या कबूल करतील." असें ह्मणून तो आनंदीबाईच्या खोलींत गेला. आनंदीबाई या वेळीं पत्र लिहित असल्यामुळें तो बाजूस स्वस्थपणें उभा राहिला. बाळ्याला पाहिल्याबरोबर आनंदीबाईनीं हातची लेखणी एकीकडे ठेविली व त्याला विचारलें " बाळ, तुझा धडा झाला का ? "

हें ऐकून बाळ्या उगाच राहिला. बराच वेळ कांहींएक बोलला नाहीं. त्यानें कांहींएक उत्तर केलें नाहीं तेव्हां आनंदीबाई ह्मणाल्या "बाळ, तुला कुणी बोललं का ? तुझा धडा तयार झाला नाहीं का ? "

बाळया गहिंवरून ह्मणाला "मावशीबाई, मला कोणी बोललें नाहीं; परंतु आज धड्याकडे कांहीं माझें लक्ष्य लागत नाहीं."

"कां बरें ?"

"आई ह्मणाली, तुह्मी लांब कोठें जाणार आहां; व ताई ह्मणते, तुह्मी पुनः परत येणार नाहीं ! मावशीबाई, तुह्मी गेल्यावर आह्मांला कोण शिकविणार ? तुह्मी कधींच परत येणार नाहीं का ? जर तुह्मी रहात नसलां, तर मी तुमच्याबरोबर येतों. ताई व माई आईपाशीं राहतील."

बाळयाचें हें भाषण ऐकून आनंदीबाईस गहिंवर आला. डोळे भरून आले. तें पाहून बाळयासहि रडूं कोसळलें. बाळयाची समजूत कशी घालावी हा त्यांनां मोठा प्रश्न पडला. शेवटीं त्यांनीं आपल्या पदरानें त्याचे डोळे पुसले, व त्याच्या तोंडावरून हात फिरवून त्याला जवळ बसविलें. त्याच्याकडे पाहत असतां आनंदीबाईंच्या मनांत कांहीं चमत्कारिक कल्पना आल्या. आपल्या ठिकाणीं ज्या मुलाचें अशा प्रकारें प्रेम आहे, व ज्याच्यावर पोटच्या पोराप्रमाणें आपली ममता जडली आहे, त्याचा वियोग लवकरच होणार, व आपली पुनः गांठ पडेल किंवा नाहीं याविषयीं संशय आहे, ही गोष्ट मनांत येऊन त्यांनां फार वाईट वाटलें. आनंदीबाईंनीं आपलें दुःख आवरून बाळयास उगी केलें व ह्मटलें "बाळ, तुला टाकून मी गेल्यें नसत्यें; परंतु जाण्याची मला जरूरीच आहे." वगैरे गोष्टी सांगून त्यांनीं बाळयाची कशीबशी समजूत केली.

चारपांच दिवस लोटल्यावर आनंदीबाईंनीं जाण्याची तयारी केली. त्यांच्या प्रयाणाचा दिवस जों जों जवळ येत चालला, तों तों मुलांनां व यशोदाबाईंनां फार वाईट वाटूं लागलें. कोणालाहि कांहींच सुचेना. शेवटीं, ज्या दिवशीं जावयाचें तो दिवस आला. जेवणखाण आटोपलें; बोचकीं बांधून आनंदीबाई गाडीची वाट पाहत बसल्या; गाडीचा शब्द ऐकूं आला; गाडीहि दारापाशीं येऊन ठेपली; घरांत एकच धांदल झाली. ज्या बायका रोज आनंदीबाईकडे येत, त्यांचा निरोप घेतल्यावर आनंदीबाईंनीं यशोदाबाईचा निरोप घेतला. "मी आतां येत्यें; मुलांनां सांभाळा," हे शब्द उच्चारतांनां आनंदीबाईंचे डोळे भरून आले. यशोदाबाई धीर धरून रडें आवरून ह्मणाल्या "मी सांभाळणार कोण ? त्यांचा सांभाळ करणार ईश्वर आहे ! अन्नोदकाचा तुमचा ऋणानुबंध आज संपला. ह्यावर तुमच्याआमच्या गांठी पडतील तेव्हां खरं.

पण आतां गांठी कशाच्या पडतात! तुह्मी कांहीं कारणांनीं इथं आलां होतां; तुमची मी उतराई झाल्यें नाहीं; तुह्माला मजपासून जें सुख व्हावं तें झालं नाहीं! याबद्दल मला राहून राहून दुःख होतं; परंतु उपयोग काय? असो. मुलांची तुह्माला आठवण असूं द्या. तुह्मी लांबच्या प्रवासाला जात आहां; परंतु वरचेवर पत्र पाठवून समाचार घेत जा."

मनुष्य प्रवासास जाऊं लागला ह्मणजे रडूं नये, अशा समजुतीनें यशोदाबाईंनीं पुष्कळ वेळा रडें आवरून धरण्याचा यत्न केला; परंतु वर सांगितल्याप्रमाणें त्या बोलत असतां रडें कोसळलें. मुलेंहि रडूं लागलीं. आनंदीबाईसाहि कांहीं बोलवेना. शेवटीं त्यांनीं बाळ्याला पोटाशीं धरिलें व आपल्या पदरानें काशी व माई ह्यांचे डोळे पुसून धीर धरून त्या ह्मणाल्या "यशोदाबाई! आतां वारंवार तुमच्या उपकारांविषयीं बोलण्यांत अर्थ नाहीं. प्रसंग पडला असतां आपलीं माणसं आपणास विचारित नाहींत. पाहुणा झाला, तर एक दोन दिवसांचा असं ह्मणतात; परंतु तुह्मी तर सख्या बहिणीपेक्षां माझा जास्त समाचार घेतला व तो एक दिवस, दोन दिवस नाहीं, तर सतत तीन वर्षं एकसारखा घेतला. तेव्हां तुमचे उपकार किती ह्मणून सांगावे? देहांत जीव आहे तोंपर्यंत तुमच्या उपकारांची आठवण वारंवार झाल्यावांचून राहणार नाहीं! आतां जास्त बोलण्याचं हें स्थळ नाहीं, किंवा काळ नाहीं. तुमची माझी पुनः भेट होईल किंवा नाहीं, हें आतां सांगतां येत नाहीं; कारण, मी कांहीं अंशीं पराधीन आहें. जरी मी लांब जात आहें, तरी माझं मन या ठिकाणीं आहे, असं तुह्मी पक्कं समजा. आठचार रोजांनीं तुमची माझी भेट होत जाईल, यांत अंतर पडणार नाहीं. मी जात्यें याबद्दल तुह्माला वाईट वाटणं साहजिक आहे; परंतु तुह्मी आपलं कर्तव्य करित गेलां, तर दिवसेंदिवस तुह्माला व मुलांनां सुख होईल. सांप्रतच्या कालाविषयीं विचार केला, तर पुरुषांपेक्षां स्त्रियांवर मोठी जबाबदारी आहे. मुलांचं व त्यामुळं देशाचं हिताहित पुष्कळ अंशीं स्त्रियांच्या आचरणावर अवलंबून आहे. सुधारणा एकदेशीय असून उपयोगी नाहीं. नुसती पुरुषांचीच सुधारणा होऊन उपयोगीं नाहीं; स्त्रियांचीहि त्या बरोबर झाली पाहिजे. आपल्या स्त्रियांनां अज्ञानानं ग्रासून टाकिलं आहे. हें अज्ञान घालविणं हें मोठं काम आहे. तुह्मीं आपल्याच मुलांनां शिक्षण देऊन काम होणार नाहीं. ज्याप्रमाणं तुमच्यामधें जागृति उत्पन्न

झाली आहे, त्याप्रमाणं शेजाऱ्यापाजाऱ्या स्त्रियांमधें जागृति उत्पन्न झाली पाहिजे. तुमची कळकळ त्यांच्यांत उत्पन्न झाली पाहिजे. तुमच्या आचरणाचं त्यांनीं अनुकरण केलं पाहिजे; परंतु तुमचं अनुकरण करण्यास तुमचं वर्तन शुद्ध व सरळ पाहिजे. ही गोष्ट सुलभ नाहीं. तथापि स्थिरपणं, शहाणपणानं व निश्चयानं तुह्मी काम कराल, व त्याप्रमाणं मुलांनां करावयास लावाल, तर तुह्माला कठीण वाटणार नाहीं. उलट तुह्माला आनंद वाटेल. येत्यें मी आतां."

असें बोलून आनंदीबाईंनीं यशोदाबाईंचा निरोप घेतला. परंतु जेव्हां त्या मुलांकडे वळल्या, तेव्हां त्यांचा गळा दाटून आला व त्यांनां कांहींच बोलवेना. गाडीवाल्यानें तगादा केल्यावरून आनंदीबाईंनीं सर्वांनां पुन:पुन: विचारून चोहोंकडे नजर फेंकिली, व हातीं घेतलेलें काम अर्धवट सोडून जाण्याचें आपणास कारण उत्पन्न झालें, या विचारामुळें त्यांचा पाय घरांतून लवकर निघेना; शेवटीं गाडीवाल्याच्या तगाद्यास कंटाळून मोठ्या कष्टानें त्या गाडींत बसल्या व गाडी चालती झाली. ती दिसेनाशी होईपर्यंत मुलें तिच्याकडे पाहत होतीं.

आनंदीबाई मुंबईस जाऊन तेथून विलायतेस कशा गेल्या; वाटेंत त्यांची व एका युरोपिअन सभ्य स्त्रीची कशी गांठ पडली; तिचा त्यांनां उपयोग किती झाला; पुढें विलायतेहून त्या अमेरिकेंत कशा गेल्या; तेथें गेल्यावर त्यांनां किती शोध करावा लागला; किती वेळां त्यांची निराशा झाली; किती हाल सोसावे लागले; आणि शेवटीं मुलांची व पतीची ब्रेझिल देशांत कशी गांठ पडली; साडेतीन वर्षांनीं प्रिय माणसांची गांठ पडल्यावर त्यांनां किती आनंद झाला; पुढें अमेरिका सोडून पति व मुलगा ह्यांसह त्या जपान, चीन, ब्रह्मदेश पाहत पाहत पुन: हिंदुस्थानांत परत कशा आल्या; व कलकत्ता येथें कांहीं दिवस राहिल्यावर त्यांच्या पतीची, व ज्या संस्थानिकानें त्यांनां पूर्वी कामावरून दूर केलें होतें त्याची गांठ पडून त्यानेंच पुन: त्यांनां बोलावून आपल्या संस्थानीं कसें नेलें; तेथें आनंदीबाई आपल्या पतिपुत्रासह आनंदानें राहून त्यांनीं कसा कालक्षेप केला; वगैरे गोष्टी सांगत बसण्यास आह्माला अवकाश नाहीं व हें स्थळहि नव्हे. तथापि एवढें सांगणें अवश्य आहे, कीं, तीं स्वस्थ बसलीं नाहींत. सामाजिक सुधारणा व राज्यव्यवहार या बाबतींत साधारण रीतीनें लोकांत थोडीबहुत तरी चळवळ सुरू आहे; परंतु गृहशिक्षणाच्या बाबतींत आमच्या लोकांची फारच अनास्था आहे; तेव्हां हा विषय हातीं घेऊन आपल्याकडून

होण्यासारखें आहे तें करण्याचा त्यांनीं निश्चय करून त्या उद्योगास तीं लागलीं, व या विषयाकडे लोकांचें लक्ष्य लावण्यासाठीं दृढ निश्चयानें त्यांनीं उद्योग आरंभिला. असो.

वर सांगितल्याप्रमाणें आनंदीबाई गेल्यावर यशोदाबाईंनां व त्यांच्या मुलांनां आठचार दिवस चैन पडलें नाहीं. आनंदीबाईंवांचून सर्व घर त्यांनां उदासीन दिसूं लागलें, सर्व वस्तु जेथल्या तेथें असून चालकशक्ति नसल्यामुळें निर्जीव दिसूं लागल्या; परंतु हळुहळू त्या गोष्टीचा विसर पडून यशोदाबाईंस वाटूं लागलें, कीं, आपण अशाच स्वस्थ बसलों, तर कांहींच व्हावयाचें नाहीं. मुलांची व्यवस्था पाहणें हें आपलें कर्तव्य आहे. हें कर्तव्य आपणासच केलें पाहिजे. आनंदीबाईंनीं कित्ता घालून दिला आहे; आपणासहि त्यांच्या सहवासानें थोडी माहिती झाली आहे व मुलांनां शिक्षणाची गोडी लागली आहे. तेव्हां आपणाला तें काम करण्यास फार अडचण पडेल असें नाहीं. दुसरें असें, कीं, या कामास मोठीशी बुद्धि लागते, असें नाहीं. कोणतेंहि महत्त्वाचें काम नुसत्या बुद्धीनें शेवटास जात नसून दृढ निश्चयानेंच तें शेवटास जातें, असें आनंदीबाईंच्या सहवासानें त्यांनां कळून आलें होतें. आपण दृढनिश्चयानें व शांतपणें आपलें कर्तव्य करूं, तर कालेंकरून आपलें व मुलांचें हित झाल्यावांचून राहणार नाहीं, हाच विचार यशोदाबाईंच्या व त्यांच्या मुलांच्या हितास कारण झाला. ज्या स्त्रिया समजूतदार असतात, व मुलांनां शिक्षण देण्याची ज्यांच्या मनामध्यें इच्छा उत्पन्न होऊन ज्या उल्हासानें या कामाकडे लागल्या असतात, त्यांचें मन मुलांच्या हिताच्या गोष्टी कोणत्या आहेत याच्या शोधांत असतें, व ज्या ज्या उपयुक्त गोष्टी त्यांच्या पाहण्यांत येतात त्यांचा त्या उपयोग करून घेतात. हाच प्रकार यशोदाबाईंच्या संबंधानें होता. प्रथम प्रथम त्यांनां अवघड वाटलें; परंतु जसजशी संवय होत चालली, तसतसा त्यांनां अधिक अधिक उत्साह वाटूं लागला.

समाप्त.